रामचंद्र गुहा

# जॅक कॅलिस एम. व्ही. पी.



**कोणालाही वॅली हॅमण्डची डॉन ब्रॅडमनशी तुलना करताना कॅलिस व सचिन तेंडुलकर यांचाही विचार करावासा वाटणे साहजिकच आहे. इतर कोणत्याही काळात हॅमण्ड हा त्याच्या कारकिर्दीतील सर्वोच्च दर्जाचा क्रिकेटपटू म्हणून प्रसिद्ध झालाच असता. तरीही ब्रॅडमनपेक्षाही काही बाबतींत तो अमूल्य खेळाडू होता, कारण त्याच्या अप्रतिम बॅटिंगबरोबर स्लिप फील्डर आणि मीडियम पेस बॉलर म्हणून तो फारच परिणामकारक ठरला. कॅलिसला हॅमण्डच्या क्रिकेटमधील कौशल्याची देणगी लाभली होती. त्याचबरोबर त्याच्या वर्तणुकीतील सौम्यपणाही आकर्षक होता. आता या वयात माझ्या खूपच कमी महत्त्वाकांक्षा राहिल्या आहेत– क्रिकेटबद्दल आणि व्यक्तिगत जीवनाबद्दलच्याही– त्यांतील एक शिल्लक आहे : बंगलोरमध्ये क्रिकेट कसोटी सामन्यामध्ये जॅक कॅलिसला खेळताना मला पाहायचे आहे!**

१९९७ मध्ये मी प्रथमच दक्षिण आफ्रिकेत गेलो. तेथील माझ्या पहिल्याच सफरीत काही मित्रांसमवेत मी केपटाऊनहून गार्डनरूट रस्त्याने पोर्ट एलिझाबेथला निघालो होतो. आमचा वाहनचालक हाच आमचा वाटाड्या आणि स्थलदर्शकही होता. रस्त्यावर एका ठिकाणी मध्ये थांबून तो आम्हांला म्हणाला की, जर आमची शे-दोनशे किलोमीटर वळण घेण्याची तयारी असेल, तर तो आम्हांला आफ्रिका खंडाचे अगदी दक्षिणेकडचे टोक-केप ॲग्युल्हस येथे- हिंदी महासागर आणि अटलांटिक एकमेकांना मिळालेले दिसतात तेथे- घेऊन जाऊ शकेल. (केप ऑफ गुड होप हे आफ्रिका खंडाचे दक्षिण टोक आहे असे बरेच लोक मानीत असले तरी ते चुकीचे आहे, हेही आम्हांला तेव्हा कळले) आम्ही त्याच्या सूचनेला लगेच होकार दिल्यावर त्याने आपली गाडी त्या मोठ्या महामार्गावरून उतरवून एका आडवाटेला लावली आणि विशेष रम्य नसलेल्या एका माळरानातून काही अंतर कापल्यावर आम्हांला समुद्रदर्शन झाले. त्या सागराचे दिसणारे निळे-हिरवे पाणी पाहतच आम्ही गाडीतून त्या लहानशा किनाऱ्यावर उतरलो. किनारा निर्जन होता. पुढे-मागे होणारे सागराचे पाणी आणि किनाऱ्यावर येऊन फुटणाऱ्या लाटा पाहत आम्ही काही वेळ (दृष्टी निवेपर्यंत) उभे राहिलो. त्या वेळी दूर क्षितिजावर एक जहाज दिसले आणि पाहता पाहता आले तसे अचानक लुप्तही झाले.

आम्ही पुन्हा गाडीत बसलो आणि गाडी सुरू केली, तेवढ्यात समोर 'सदर्नमोस्ट कॅफे'ची दिशा दाखवणारा फलक समोर आला. त्या दिशेकडे आम्ही आपोआपच ओढले गेलो. कारण अनेक तासांच्या प्रवासामुळे आम्हांला सपाटून भूक लागली होती आणि ती शांत करू शकणारे ते ठिकाण आम्हांला खुणावत होते. आम्ही त्या उपाहारगृहाजवळ गेलो, तेव्हा तीन धिप्पाड, गोरी आणि हसतमुख माणसे बाहेर आली आणि रस्त्याने चालत दूर गेली. त्या धष्टपुष्ट माणसांच्या हातापायांचे पीळदार स्नायू त्यांच्या टी-शर्टस् व शॉर्टस्‌मधून दिसत होते. त्यांच्या गोऱ्या कातडीवर गुलाबी तजेला होता आणि नुकत्याच घेतलेल्या रुचकर भोजनामुळे झालेला संतोष किंवा त्यांचा मूळचाच आनंदी स्वभाव, त्यांच्या त्या स्मितहास्यातून प्रकट होत होता.

एकूण सारी चिन्हे आम्हांला सुखदायक, आशादायक वाटत होती. पण प्रत्यक्षात मात्र केवळ आमचा वाहनचालकच त्या भोजनाने तृप्त झालेला दिसला. कारण बाकीचे आम्ही निव्वळ शाकाहारी होतो आणि बहुतेक सर्व अन्नपदार्थ जंगली प्राणी, रानडुक्कर, रानरेडे, म्हशी यांच्या मांसापासून तयार केलेले असल्यामुळे आमच्यासारख्या मद्रासी शाकाहारींना पाव, तळलेल्या काचऱ्या (चिप्स) आणि थंडगार कोक यांच्यावरच आपली भूक भागवावी लागली.

या केप ॲग्युल्हसच्या आमच्या सफरीची आठवण, मी ज्या ज्या वेळी जॅकस् कॅलिसला बॅटिंगसाठी मैदानावर झोकत चालत येताना टीव्हीवर पाहतो, तेव्हा तेव्हा आल्याशिवाय राहत नाही. केप ॲग्युल्हसच्या त्या 'सर्दन मोस्ट कॅफे'मधून त्या दिवशी ज्या तिघांना बाहेर पडताना मी पाहिले होते, त्यांच्याशी कॅलिसचे साम्य जाणवते. तसाच भव्य, धिप्पाड आणि शांत चेहऱ्यावरील स्मितही तसेच! सगळ्याच दृष्टीने त्याचे समतोल




व प्रसन्न व्यक्तिमत्त्व लक्षात आल्याखेरीज राहत नाही. आपल्या विरोधकांना शिवीगाळ करताना, अंपायरशी हुज्जत घालताना किंवा टीममधील एखाद्या सहकाऱ्याची कुचेष्टा करताना तो कधीच दिसलेला नाही. क्रिकेट या खेळप्रकारातला तो एक उमदा खेळाडू आहे आणि जगातल्या थोर खेळाडूंपैकी एक तो निश्चितच आहे.

आपल्या 'मास्टर्स ऑफ क्रिकेट' या पुस्तकात जॅक फिंगलटन याने लिहिले आहे, 'मी जितका अधिक जगतो आहे, तितकी माझी राष्ट्रनिष्ठा मवाळ होत चाललेली आहे. कोणत्याही सामन्याचा निकाल हा मनोवेधक असतोच; पण तो एखादी वेळ किंवा महत्त्वाचा क्षण, या कसोटीवर पारखता येत नाही. महत्त्वाचे हे आहे की एखादी स्पर्धा आपल्या पुढील पिढ्यांसाठी स्वीकारून जिंकण्यासाठी कोणती आव्हाने समोर ठेवीत आहे, किंवा खेळाच्या समृद्धीसाठी बॉलिंग किंवा इनिंगचे तंत्र अधिक अद्ययावत आणि सफाईदार करण्याचा किती प्रयत्न करीत आहे हे महत्त्वाचे आहे. म्हणजेच पुढे-मागे या खेळाचा एखादा षौकीन अभिमानाने म्हणू शकेल की, 'होय, मी तो खेळ पाहिलेला आहे.'

मी स्वत: हिंदू असल्यामुळे माझा भक्तिपंथ खूपच विस्तृत आहे. मी लहान असल्यापासून माझी दैवते देशी होती तशी विलायतीही होती. पण क्रिकेट प्रेक्षक म्हणून माझे एक लहानसे दु:ख होते ते असे की, दक्षिण आफ्रिकेच्या संघाचा खेळ प्रत्यक्ष पाहण्याचे भाग्य मला लाभलेले नाही. मी माझ्या आयुष्यात जवळ जवळ बहुतेक सर्व (आजकालच्या) थोर क्रिकेटपटूंना मैदानावर प्रत्यक्ष पाहिलेले आहे. वासीम, वकार, इम्रान, मियाँदाद, इंझमाम, लॉइड, कालीचरण, रिचर्डस्, ग्रीनीज रॉबर्टस्, होल्डिंग, मार्शल, लारा, बोथम, नॉट, गूच, पाँटिंग, वॉर्न, स्टीव्ह वॉ, बोर्डर, मॅकग्रा, गिलख्रिस्ट, मार्टिन क्रो, अँडी फ्लावर या सर्वांचा खेळ मी स्टेडियममध्ये बसून पाहिला आहे. पाहिला नाही तो फक्त दोघांचा. ॲलन डोनाल्ड आणि जॅक कॅलिस. या दोघांनाही बॉलिंग अगर बॅटिंग करताना मी प्रत्यक्ष पाहिलेले नाही, पण आपल्याकडील छायाचित्रकारांच्या पिढ्यान्‌पिढ्यांची तपस्या मात्र मला फळली. डोनाल्ड व कॅलिस यांचा खेळ टीव्हीवर मी भरपूर पाहिला आहे.

कॅलिसने आंतरराष्ट्रीय सामन्यांच्या क्षेत्रात पाऊल टाकले तेव्हा तो मुळात एक ऑफ साइड खेळाडूच होता. त्याने खेळलेले एकदिवसीय सामने मी पाहिले आहेत. त्यांपैकी एक मला आजही

आठवतो. चार-पाच विकेटस् पडल्यानंतर तो मैदानात उतरला तेव्हा आठ ओव्हर्समध्ये द.आफ्रिका संघाला चाळीसच्या जवळपास रन्स हव्या होत्या. कॅलिसने त्या वेळी मारलेले बॅकफूट ड्राइव्ज् डोळ्यांचे पारणे फेडणारे होते. एकामागून एक मारलेल्या फटक्यांनी त्याने स्कोअर पूर्ण करून संघाला विजय मिळवून दिला होता. काही वर्षांनंतर चँपियन्स ट्रॉफीसाठी झालेल्या श्रीलंकेबरोबरील उपांत्य सामन्यात मी कॅलिसच्या बॅटिंगचे अधिक आक्रमक स्वरूप अनुभवले. हा सामना बांगला देशामध्ये झाला होता. मुरलीधरनचे मिडविकेटच्या रोखाने बाणासारखे येणारे चेंडू (एकूण ओळीने पाच) बॅटने फटकावले तेव्हा कॅलिसचा डुकराच्या मांसाचा जंगली आहार पूर्णपणे सार्थकी लागल्यासारखा वाटला.

दर्जेदार पास्ट पॉइंट ड्राइव्ज आणि त्याबरोबरच पायाच्या बळकट स्नायूंना बसणारे झटके हे दृश्य अलीकडच्या काळात प्रत्यक्षात कमीच दिसू लागले आहे. इनिंग्ज बिल्डरची भूमिका निभावताना पायांची सफाईदार हालचाल आणि ऑफ ड्राइव्हज् यांबरोबर त्याच्या रन्सची संख्या वाढत चाललेली असे. तो एक सुसंस्कारित बॅटस्मन होताच, पण भरपूर धावांचे दानही देणारा होता. आता तरी असे दिसते की, तेंडुलकरचा कसोटी सामन्यांतील शतकांचा उच्चांक ओलांडणारा विक्रमवीर फक्त कॅलिसच होऊ शकेल!

घरी माझ्याबरोबर माझा मुलगा जर सामना पाहत असेल तर कॅलिस बॅटिंगसाठी येताना पाहून आम्हा दोघांपैकी एक दुसऱ्याला म्हणणार, 'हा आला एम.व्ही.पी!' (MVP : Most Valuable Player) हे त्याचे आमच्या घरचे नाव (टोपण नाव) बेसबॉलवरून घेतलेले आहे. माझ्या मते गॅरी सोबर्स या असामान्य खेळाडूनंतर हे नाव कॅलिस यालाच शोभते. गेल्या दहा वर्षांत या खेळातील तीन किंवा चार सर्वोत्कृष्ट बॅटस्मन्सपैकी तो एक आहे. टेस्ट क्रिकेटमध्ये जवळजवळ १३००० रन्स आणि ४४ सेंच्युरीज त्याच्या खात्यावर जमा आहेत. शिवाय २८२ विकेटस् आणि १९२ कॅचेस यांचेही श्रेय त्याच्याकडे आहेच. जॅक हेन्री कॅलिस हा जागतिक क्रिकेटमधला एक अमूल्य खेळाडू आहे, हे आतापर्यंत सिद्ध झालेच आहे.

त्याच्या करिअरच्या सुरुवातीला कॅलिसने टाकलेला बॉल आश्चर्यकारक रीतीने वळत जायचा. आत आणि बाहेर दोनही बाजूंनी. मला इंग्लंडमधील एक मालिका आठवते, त्यामध्ये त्याला नवीन बॉल दिला जायचा. नंतर जसजसे तो वयाने वाढत गेला आणि त्याचे शरीरही थोडे स्थूल झाले तेव्हा कॅलिसची गतीही मंदावली. धडाक्याने हालचाली करण्याची क्षमताही कमी झाली, पण त्याची बॉलिंग मात्र तशीच तेजदार राहिली. बॅटस्मनना उत्तेजित करत आणि प्रसंगी त्यांच्या जमलेल्या जोड्या फोडीत तो बॉलिंग करीत राहिला.

कॅलिस हा चांगल्यापैकी फील्डर (क्षेत्ररक्षक)ही होता. तो बहुधा सेकंड स्लिपमध्ये उभा असे. बॅटस्मनने जोरात टोलवलेला बॉल एखाद्या बाणासारखा सण्णकन् या दिशेने येत असे आणि बॅटिंग करायला डोनाल्ड, एन्टिनी अगर स्टेन यांच्यापैकी कोणी असतील तर बॉलची गती आणखीच धोक्याची. किती तरी वेळा आपण सर्वांनी कॅलिसच्या दिशेने येणारी एज बॉल पकडताना त्याला मागे ढकलणारा त्याचा जोर आणि सुहास्य मुद्रेने जमिनीवरून उठताना हातात पकडलेला बॉल आणि तरीही डोक्यावरची न हललेली पांढरी हॅट पाहिली आहे.

१९९९ मध्ये बंगलोरला दक्षिण आफ्रिकेचा सामना माझ्याच शहरामध्ये खेळला गेला तेव्हा मी माझ्या कामासाठी बाहेरगावी होतो. अगदी अलीकडेच जॅक कॅलिस रॉयल चॅलेंजर्ससाठी एक-दोन वेळा खेळला. खरे तर चिन्नास्वामी स्टेडियमच्या जवळच्याच रस्त्यावर मी राहतो, पण ट्वेंटी-२० क्रिकेटबद्दलच्या माझ्या मनातल्या तिटकाऱ्याने कॅलिसबद्दलच्या माझ्या कौतुकावर मात केली. आणि अशा तऱ्हेने त्याला खेळताना मी पाहू शकलो नाही.

मागील दोन दशकांचा काळ हा क्रिकेट जगतात 'तेंडुलकर युग' म्हणून ओळखला जाणार आहे. त्याची तोडफोड करणारी फटकेबाजी, एकदिवसीय अगर कसोटी सामन्याचा नूर काही मिनिटांत बदलून टाकण्याची त्याची क्षमता, त्याची सदा सावध आणि चिवट उपजत बुद्धी या तर त्याच्या जमेच्या बाजू आहेतच, शिवाय, शंभर कोटींपेक्षा अधिक लोकसंख्येच्या देशातील क्रिकेट षौकिनांचे त्याच्यावर असलेले अपरंपार प्रेम यामुळे त्याची प्रतिमा त्याच्या समकालीन क्रिकेटपटूंपेक्षा अधिक नाट्यमय आणि परिणामकारक ठरली. पण माझ्या मनातली कॅलिसची एक अनमोल क्रिकेटपटू ही प्रतिमा कायम आहे.

कोणालाही वॅली हॅमण्डची डॉन ब्रॅडमनशी तुलना करताना कॅलिस व सचिन तेंडुलकर यांचाही विचार करावासा वाटणे साहजिकच आहे. इतर कोणत्याही काळात हॅमण्ड हा त्याच्या कारकिर्दीतील सर्वोच्च दर्जाचा क्रिकेटपटू म्हणून प्रसिद्ध झालाच असता. तरीही ब्रॅडमनपेक्षाही काही बाबतींत तो अमूल्य खेळाडू होता, कारण त्याच्या अप्रतिम बॅटिंगबरोबर स्लिप फील्डर आणि मीडियम पेस बॉलर म्हणून तो फारच परिणामकारक ठरला.

कॅलिसला हॅमण्डच्या क्रिकेटमधील कौशल्याची देणगी लाभली होती. त्याचबरोबर त्याच्या वर्तणुकीतील सौम्यपणाही आकर्षक होता. आता या वयात माझ्या खूपच कमी महत्त्वाकांक्षा राहिल्या आहेत- क्रिकेटबद्दल आणि व्यक्तिगत जीवनाबद्दलचाही- त्यांतील एक शिल्लक आहे : बंगलोरमध्ये क्रिकेट कसोटी सामन्यामध्ये जॅक कॅलिसला खेळताना मला पाहायचे आहे!

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

रामचंद्र गुहा

# लोकांमध्ये रमलेला लेखक



अनंतमूर्तींखेरीज भारतातील इतर कोणत्याही व्यक्तीला 'पब्लिक इंटलेक्च्युअल' असे म्हणता येणार नाही. कदाचित या बाबतीत त्यांची बरोबरी आणखी एक व्यक्ती करू शकेल; त्यांच्याचप्रमाणे वयातीत आणि अदम्य असलेल्या महाश्वेतादेवी. अनंतमूर्तींना लाभलेली सामाजिक व लौकिक प्रतिष्ठा या देशातील एकाही इंग्रजी लेखकाकडे नाही; त्यांचे वाचक आणि भोवतालची जनता यांच्याबरोबरचा त्यांचा अनुबंध सखोल आणि पूर्ण जीवनभराचा आहे. आमच्या लेखक जमातीपैकी एखाद्याचे निधन होते तेव्हा जास्तीत जास्त त्याची नोंद इंडिया इंटरनॅशनल सेंटरच्या बारमध्ये घेतली जात असावी. पण अनंतमूर्ती आपल्या निर्मात्याला भेटतील तेव्हा त्यांचे लिखाण आणि त्यांचा वारसा यांच्यावर कर्नाटकातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये चर्चा आणि वाद-विवाद चालू झालेले असतील.

एक प्रसिद्ध कादंबरीकार, ललित लेखक आणि राजकीय टीकाकार म्हणून यू.आर.अनंतमूर्ती देशभर विख्यात आहेत. त्यांचा ऐंशीवा वाढदिवस नुकताच येऊन गेला. बंगलोर येथील त्यांच्या घराचे नाव 'सुरागी' असे आहे. सुरागी (मराठी सुरंगी) हे असे एक फूल आहे की ते शिळे झाले आणि वाळून गेले तरीही त्याचा सुगंध दरवळत राहतो. अनंतमूर्तींच्या व्यक्तिमत्त्वाशी साम्य दर्शविणारे हे नाव आहे असे कोणाला वाटले तर ते मात्र साफ चूक आहे. अनंतमूर्तींचे वर्णन एक रूढिभंजक बंडखोर माणूस असेच करावे लागेल. त्यांच्या 'संस्कार' आणि 'भारतीपूर' या कादंबऱ्यांनी आधुनिक भारतीय साहित्याच्या प्रवाहाला वाट करून दिली आहे. कन्नड वर्तमानपत्रांमधील त्यांचे लेख आवडीने आणि अत्यंत जागरूकपणे वाचणाऱ्यांची संख्या फार मोठी आहे. सागर आणि म्हैसूर या दोन विद्यापीठांत इंग्रजी शिकवताना त्यांनी उत्कृष्ट प्राध्यापक हा लौकिक मिळवलाच, पण अनेक विद्यार्थ्यांना लेखन व अभ्यास यासाठी विशेष प्रेरणा दिली, आणि तसे योगदान देणाऱ्या अनेक पिढ्या निर्माण केल्या.

त्यांच्या या वाढदिवसाच्या समारंभाचे आमंत्रण मिळाल्यामुळे मी तिथे उपस्थित होतो. 'सुरागी'मध्ये जमलेले साहित्यिक, समीक्षक, शिक्षक, कवी, कादंबरीकार, नाट्यलेखक, चित्रपटनिर्माते, छायाचित्रकार आणि संगीतकार हे सर्व कानडी भाषिकच होते. कदाचित मीच एकटा इंग्रजीभाषिक लेखक त्यांच्यामध्ये होतो, पण आम्ही सर्वच अनंतमूर्तींना शुभेच्छा देण्यासाठी त्या समारंभात सहभागी झालो होतो. व्यक्तिमत्त्वातील गोडवा आणि वृत्तीतील औदार्य यांमुळे त्यांना मित्र भरपूर आणि थोडे शत्रूही होते, कारण त्यांचे विचार व भाषा एखाद्याबद्दल लिहिताना जितकी कोमल आणि प्रेमळ असे; तितकीच ती सौंदर्यास्वाद किंवा राजकारण यांसारख्या विषयांवरील तीव्र मतभेदांना वाट करून देताना धारदार व जहाल होत असे.

दिल्लीमध्ये १९८९ या वर्षांत पंडित जवाहरलाल नेहरूंच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने बोलावण्यात आलेल्या एका परिषदेच्या वेळी मी अनंतमूर्तींना प्रथम भेटलो. त्या वेळी आम्हा दोघांच्याही परिचयाचे एक समीक्षक टी.जी.वैद्यनाथन् यांनी अनंतमूर्तींच्याजवळ जाऊन त्यांची ओळख करून घेण्यास मला सुचवले. त्या वेळी अनंतमूर्ती ही साहित्यक्षेत्रातील एक फार मोठी व्यक्ती मानली जात होती आणि माझ्या नावावर एक साधे पुस्तकही नव्हते. आम्हा दोघांच्या दर्जामधली ही प्रचंड दरी ओलांडून त्यांच्यापर्यंत पोचणे मला अवघड वाटत होते. पण त्या दिवसांत मी टी.जी.व्हीं (वैद्यनाथन्)चा शब्द आणि इच्छा विनाअट पाळत होतो. टी.जी.व्हीं.नी पाठवल्यामुळे मी आलो आहे असे जवळ जाऊन अनंतमूर्तींना सांगितले, तेव्हा 'वैद्य, वैद्य' म्हणत त्यांनी माझा हात घट्ट धरला. त्यांचा आवाज आणि हावभाव यांवरून माझ्या लक्षात आले की टी.जी.व्हींचा कोणताही मित्र त्यांचाही मित्र होऊ शकतो.

त्या पहिल्या भेटीतच त्यांची उत्स्फूर्तता आणि त्यांच्या स्वभावातील सौजन्य लक्षात आले. त्याचबरोबर नावांबाबतचा त्यांचा विशिष्ट आग्रहही लक्षात आला. टी.जी.व्ही या नावाने त्याच्या मित्रांना आणि त्याच्या विरोधकांना परिचित असलेला माणूस त्यांच्या लेखी फक्त 'वैद्य' होता. मला सर्वजण राम म्हणून संबोधतात पण फक्त अनंतमूर्तींसाठी मी



नेहमीच 'गुहा' असतो. जमावापासून वेगळे होऊन राहण्याच्या आणि प्रत्येक व्यक्ती आणि जागा यांना संदर्भ लक्षात घेऊन योग्य नाव ठेवण्याच्या त्यांच्या उत्कट इच्छेतून आणि पुढाकारातूनच बंगलोरचे नाव 'बंगळुरू' असे करण्याची चळवळ यशस्वी झाली.

त्यानंतर काही वर्षांनी एकदा बोलता बोलता मी त्यांना प्रथम कसा आणि कधी भेटलो याची आठवण करून दिली तेव्हा अनंतमूर्तींनी मला सांगितले की, तरुण वयात त्यांना नेहरू कधीच आवडले नव्हते. ते त्या वेळी राममनोहर लोहिया या जहाल समाजवाद्याचे शिष्य होते. नेहरूंची उच्चवर्णीय, आंग्लाळलेली, नव-वसाहतवादी जीवनपद्धती पाहून भारतातील लोकांचे आणि भारतीय संस्कृतीचे प्रतिनिधित्व करायला देशाचे प्रधानमंत्री म्हणून नेहरू लायक नाहीत असेच लोहियांना वाटे. १९६७ साली लोहियांचे निधन झाले. वीस वर्षांनंतर भारतात 'अयोध्या कांड' झाले. ती घटना व त्यानंतर देशभर उसळलेल्या दंगलींचे वातावरण यांनी लोहियांच्या अनुयायांना धडा दिला की जातीय ऐक्याचा पुरस्कार या एका कळीच्या मुद्यावर स्वातंत्र्य चळवळीतील इतर अनेक नेत्यांपेक्षा नेहरूंवर गांधींचा प्रभाव अधिक होता. वास्तवात या बाबतीत ते गांधींचे पट्टशिष्य होते. नेहरूंनंतरच्या संक्रमण काळात मी अनंतमूर्तींना भेटलो. १९६९ किंवा १९७९ सालात नेहरूंच्या स्मृतीनिमित्त आयोजित केलेल्या सभा-समारंभांना ते कदाचित उपस्थित राहिलेही नसतील, पण १९८९ मध्ये नेहरूंवरील परिसंवादासाठी ते उपस्थित राहिले, त्यामागे काही विशिष्ट कारण होते असे मला वाटले.

नव्याने पुढे येणारे पुरावे पाहून आपले जुने समज अगर श्रद्धा तपासून त्यांच्यामध्ये बदल घडवून आणण्याची तयारी हा या माणसाचा एक विशेष होता. पहिल्याच भेटीत पाश्चिमात्त्य पद्धतीने समोर हात लांबवून, दुसऱ्याचा हात घट्ट पकडून औपचारिक हस्तांदोलन करण्याऐवजी भारतीय पद्धतीने शेजारी उभे राहून माझ्या हाताचा तळवा आपल्या हातात धरून ठेवून सहृदयतेने त्यांनी माझी ओळख करून घेतली; त्याच वेळी माझ्या मनात विचार आला की, दिल्ली आणि कलकत्ता येथे माझे जे वैचारिक प्रणेते (गुरू) आहेत त्यांपेक्षा अनंतमूर्ती वेगळे आहेत. ज्ञानपीठ, पद्मभूषण आणि साहित्य अकादमीचे अध्यक्षपद अशी मोठी पारितोषिके, पुरस्कार आणि सन्मान प्राप्त झालेली ही व्यक्ती उपदेश किंवा सल्ले देणारी भाषणे करीत बसत नाही. ते जेवढे बोलतात, तेवढे शांतपणाने ऐकतातही. दुसऱ्याचे- विशेषत: त्यांच्यापेक्षा लहान असलेल्या तरुणांचे- मत, प्रतिवादही ते शांतपणे ऐकून घेतात.

१९९४ साली मी बंगलोरला स्थायिक झालो. तिथे

डी.आर.नागराज या समीक्षकांशी माझी ओळख झाली आणि त्याचे पुढे दोस्तीत रूपांतर झाले. त्यांनी त्यांच्या गुरूबद्दलची हकीगत मला सांगितली. पूर्ण दहा वर्षे अध्ययन केल्यानंतर अनंतमूर्तींनी नागराजांना सांगितले, 'मला जेवढे येत होते तेवढे मी तुला शिकवले आहे, आता तुला दिल्लीला आशिष नंदीकडे पुढील शिक्षणासाठी पाठवावे लागेल.' मग अनंतमूर्तींनीच खटपट करून 'सेंटर फॉर द स्टडी ऑफ डेव्हलपिंग सोसायटीज्' या संस्थेची फेलोशिप नागराजना मिळवून दिली, जिथे त्यांनी पुढील काही वर्षे अत्यंत विधायक, उत्पादक असे काम भरभरून केले.

मी स्वत: दिल्लीहूनच बंगलोरला आलो होतो; आशिष नंदींना ओळखत होतो. जरी त्यांचे लिखाण मला आवडत होते तरी मला हे जाणवले होते की, आपल्या कोणत्याही विद्यार्थ्याला, 'मला जेवढे माहीत होते ते मी तुला शिकवले आहे; आता पुढील शिक्षणासाठी तुला बंगलोरला अनंतमूर्तींकडे पाठवतो' हे सांगणे त्यांना जमण्यासारखे नाही. खरे म्हणजे आमच्या आजच्या विविध विद्याशाखांमध्ये जी बुजुर्ग मंडळी आहेत त्यांच्यापेक्षा नंदी काही वेगळे नव्हते. विद्यार्थ्यांवर एक प्रकारचा मालकीहक्क आणि स्वमतांच्या अचूकपणाचा आग्रह हे सर्व सगळीकडे सारखेच होते.

१९९८ साली नागराज यांचे चाळिशीतच अकाली निधन झाले तेव्हा अनंतमूर्तींना शोक अनावर झाला होता. ते म्हणाले, 'नागराज माझा शिष्य आणि गुरू असा दोन्ही होता'. नागराज, देवनूर महादेव आणि सिद्दलंगय्या यांच्यासारख्या तरुण लेखकांमुळेच दलित साहित्य व चळवळ यांचा परिचय अनंतमूर्तींना झाला होता.

जे.एन.यु.मधील आमच्या प्रथम परिचयानंतर 'सुरागी'च्या मालकाला मी जवळपास वीस वेळा तरी भेटलो. बहुतेक वेळा बंगलोरमध्ये; पण मणिपाल, मॉस्को आणि वायव्य कर्नाटकात हेग्गोडू येथेसुद्धा. त्यांचे दिवंगत मित्र के.व्ही.सुबण्णा यांनी हेग्गोडू या लहानशा गावात एका वार्षिक सांस्कृतिक शिबिराचा उपक्रम सुरू केला होता. आता सुब्बण्णांचा मुलगा- अक्षर- हे चालवतो! अनंतमूर्तींची हुकमी उपस्थिती या समारंभाच्या अध्यक्षस्थानी असते.

त्यांच्याशी झालेल्या बहुतेक संवादांतून मी भारतातील राजकारण आणि समाजजीवन यांच्यासंबंधी काही मौलिक धडे घेतले. अनंतमूर्तींकडूनच मी ऐकले की, भारतीय लेखक पाश्चात्त्य लेखकांपेक्षा अधिक सुदैवी आहेत; कारण भारतीय लेखक एकाच वेळी १२ व्या आणि २१ व्या अशा दोनही शतकांत जगू शकतो; शिवाय तो त्या दोन शतकांमधील काळातही वावरू शकतो. केशरी रंगासारखा सुरेख रंग उजव्या धर्माभिमान्यांचा रंग म्हणून त्यावरचा हक्क आपण मुळीच सोडता कामा नये, असेही मला अनंतमूर्तींनीच बजावले.

सुमारे दहा वर्षांपूर्वी मणिपाल येथे व्हिजिटिंग प्रोफेसरशिप घेण्यासाठी अनंतमूर्तींनी बंगलोर सोडले, पण ते तिथे वरचेवर येतच राहिले; मी मजेत माझ्या बायकोला म्हणत असे की, हे प्रसिद्ध लेखक सागर किनाऱ्यावरील मणिपालहून राजधानीच्या शहरात कधी येतात ते मला अचूक कळते. वर्तमानपत्रातूनच त्यांची हालचाल जाहीर होत असते. अगदी दिवसा-दिवसाची! मणिपालमध्ये पुस्तकाचे प्रकाशन, बंटवालमध्ये व्याख्यान, पर्यावरण विषयावर कार्यकर्त्यांची सकलेशपूरला सभा, हसन येथे साहित्य सोहळ्याचे उद्घाटन... तो बहुधा शेवटचा कार्यक्रम असावा! कारण अनेक कार्यक्रमांसाठी अनेक ठिकाणी त्यांनी दिलेल्या व्याख्यानांनी श्रोत्यांना एवढी भुरळ घातलेली असते की कुनिगळ स्टड फार्ममध्ये या जुन्या समाजवाद्याचे स्वागत कसे केले जाते हे कोणालाही पाहणे शक्य होत नाही.

बंगलोरमध्ये या माझ्या मित्रासह विविध कार्यक्रमांत उपस्थित असताना मी पाहिले आहे की, तो जाईल तेथे कॅमेरा त्याचा पाठलाग करतो. अनंतमूर्तींच्या जवळ पोहोचण्यासाठी लोकांची गर्दी लोटलेली असते. त्या सर्व दृश्याच्या केंद्रस्थानी ते असतात. मी त्यांची मधून मधून चेष्टा करतो. (अर्थात् त्यांच्या अनुपस्थितीत) पण त्या चेष्टेमध्ये प्रेम आणि आदरभाव अध्याहृत असतो- थोडा हेवाही वाटतच असतो अर्थात! कारण आज अनंतमूर्तींखेरीज भारतातील इतर कोणत्याही व्यक्तीला 'पब्लिक इंटलेक्च्युअल' असे म्हणता येणार नाही. कदाचित या बाबतीत त्यांची बरोबरी आणखी एक व्यक्ती करू शकेल; त्यांच्याचप्रमाणे वयातीत आणि अदम्य असलेल्या महाश्वेतादेवी. अनंतमूर्तींना लाभलेली सामाजिक व लौकिक प्रतिष्ठा या देशातील एकाही इंग्रजी लेखकाकडे नाही; त्यांचे वाचक आणि भोवतालची जनता यांच्याबरोबरचा त्यांचा अनुबंध सखोल आणि पूर्ण जीवनभराचा आहे. आमच्या लेखक जमातीपैकी एखाद्याचे निधन होते तेव्हा जास्तीत जास्त त्याची नोंद इंडिया इंटरनॅशनल सेंटरच्या बारमध्ये घेतली जात असावी. पण अनंतमूर्ती आपल्या निर्मात्याला भेटतील तेव्हा त्यांचे लिखाण आणि त्यांचा वारसा यांच्यावर कर्नाटकातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये चर्चा आणि वाद-विवाद चालू झालेले असतील.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

('साधना'चा मागील अंक पुरस्कार विशेषांक असल्याने 'कालपरवा' या सदरातील लेख प्रसिद्ध होऊ शकला नव्हता, तो या अंकात प्रसिद्ध करीत आहोत.
**- संपादक**)

रामचंद्र गुहा

# तेंडुलकर ट्रॉफी



तेंडुलकरच्या नावाची ट्रॉफी अनेक पाकिस्तानी खेळाडूंनाही पसंत पडेल असे मला वाटते, कारण त्यांचे चाहते आणि खेळाडूही तेंडुलकरचा आदर करतात आणि त्याचा खेळ गौरवतात. १९९९ च्या वर्ल्ड कपनंतर बकिंगहॅम पॅलेसमध्ये आमंत्रित स्वागत समारंभातील हकीगत राजसिंग डुंगरपूर यांनी मला सांगितली होती, त्या समारंभात तरुण पाकिस्तानी खेळाडूंना फक्त सचिनचे आकर्षण होते. त्याची उपस्थिती, त्याचा स्पर्श आणि त्याच्याबरोबर घेतलेले फोटोग्राफ्स त्यांना मोहरून टाकत होते. पाकिस्तानी क्रिकेट बोर्डाच्या सदस्यांनाही हे माहीत आहे की, सचिन त्याच्याबरोबरच्या खेळाडूंइतकाच किंवा त्यांच्यापेक्षाही निष्णात असला तरी वैयक्तिक वर्तनाबद्दलही वादातीत आहे. मला वाटते तेंडुलकर ट्रॉफीचा हा पर्याय सर्वांनीच भारदस्तपणे स्वीकारणे योग्य ठरेल. त्यासाठीची घोषणा लवकरच व्हावी अशी अपेक्षा आहे.

भारत पाकिस्तानची एकदिवसीय क्रिकेट सामन्यांची मालिका प्रेक्षकांच्या उत्साही प्रतिसादासह (आणि कोणताही वाद अगर दुर्घटना न होता) नुकतीच संपली. नोव्हेंबर २००८ मधील मुंबईवरील अतिरेक्यांच्या हल्ल्यानंतर झालेले हे पहिलेच भारत-पाकिस्तान सामने. या सामन्यांनंतर पाकिस्तान क्रिकेट बोर्डाचे चेअरमन झाका अश्रफ यांनी असे सुचवले की, 'या दोन देशांमध्ये असेच सामने वरचेवर नियमितपणे होत राहावेत- 'जीना-गांधी' ट्रॉफीसाठी- असे म्हणू हवे तर!' हे वृत्त वाचून काही दशकांपूर्वी 'डॉन' वृत्तपत्रामध्ये अशाच प्रकारचा मजकूर वाचल्याचे आठवले. मी माझी जुनी टिपणे चाळली आणि मला खालील हकीगत सापडली.

१९५५ मध्ये विनू मंकडच्या नेतृत्वाखालील भारतीय संघ पाच कसोटी सामन्यांच्या माकिलेसाठी पाकिस्तानमध्ये गेला होता. त्या वेळी फाळणी होऊन सात वर्षे उलटलेली होती. फाळणीच्या जखमा सुकत चालल्या होत्या. कराचीमधील एका वृत्तपत्रात तेथील एका हिंदूने लिहिले, 'भारतीय संघाचे पाकिस्तानमध्ये झालेले स्वागत भारत आणि पाकिस्तान यांच्यामधील संबंध सुधारत चालल्याचे चिन्ह आहे. ही गोष्ट चांगली आहे; दोनही राष्ट्रांना उपकारक अशीच आहे.' या बदलत्या मनोवृत्तीचे प्रतीक म्हणून की काय, लाहोरचा कसोटी सामना पाहण्यासाठी १०,००० भारतीय प्रेक्षक वाघा सरहद्द ओलांडून पाकिस्तानात आले होते. त्यांत १९४७ साली पश्चिम पंजाबमधून भारतामध्ये निराश्रित होऊन आलेले शीख आणि हिंदू यांचाही मोठ्या प्रमाणात समावेश होता.

दुर्दैवाने ते क्रिकेट सामने तसे कंटाळवाणेच झाले. दोनही संघांच्या लढतींचा शेवट पाच रूक्ष 'ड्रॉ'मध्ये झाला. तरीसुद्धा सरहद्दीच्या दोनही बाजूंना असणाऱ्या क्रिकेटप्रेमींना भारत-पाकिस्तान संघांमधील सामने नियमितपणे चालू राहावेत याबद्दल प्रचंड कळकळ होती. स्वत:वर कायम खूष असलेले ऐटबाज भारतीय क्रिकेट कॉमेंटेटर 'विझी' यांनी भारत व पाकिस्तान यांना स्वत:चे 'ॲशेस' म्हणजे दोनही देशांमधील माती एकत्र करून बनविलेली ट्रॉफी बनविण्याची सूचना मांडली. शेख खान बहादूर या क्रिकेटप्रेमी प्रेक्षकाची सूचना याहीपेक्षा मूलगामी म्हणावी अशी होती. 'डॉन'मध्ये लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात, या दोनही संघांनी 'गांधी-जीना' ट्रॉफीसाठी खेळावे. ढालीच्या आकाराच्या या ट्रॉफीवर ह्या दोन थोर मुत्सद्द्यांच्या तैलचित्रांचे किंवा परस्परांबरोबरच्या त्यांच्या खास लकबीतील छायाचित्रांचे मुद्रण असावे.'

या शेख खान बहादुरांचे पत्र आणि त्यामागील संघर्ष यांचा उल्लेख मी माझ्या 'ए कॉर्नर ऑफ ए फॉरिन फील्ड' या पुस्तकात केलेला आहे. पण माझा अनुभव असा आहे की थोड्याच क्रिकेटपटूंना वाचनाचा नाद असतो आणि त्याहीपेक्षा कमी प्रमाण क्रिकेट व्यवस्थापकांचे असते. म्हणून झाका अश्रफनाही माहिती नसावे की त्यांचा हा प्रस्ताव ६७ वर्षांपूर्वीच मांडला गेला होता. काहीही असले तरी एक फरक सांगण्याजोगा आहे. पाकिस्तानी आम आदमी या ट्रॉफीला जेव्हा 'गांधी-जीना' ट्रॉफी म्हणतो, (कदाचित 'जी' हे अक्षर 'जे) या अक्षराच्या पूर्वी येते म्हणून...?) तेव्हा पाकिस्तान क्रिकेट बोर्डाचा चेअरमन त्या ट्रॉफीच्या नावात जीनांचा उल्लेख प्रथम करून त्याला 'जीना-गांधी' ट्रॉफी म्हणतो.



१९५० च्या दशकाच्या मध्यवर्षांत मांडलेला हा प्रस्ताव मग असाच वाऱ्यावर विरला. पाकिस्तानच्या संघाने १९६०-६१ मध्ये भारताला भेट देऊन सामने खेळले. त्यानंतर दोन देशांत दोन युद्धे झाली. १९७८ साली पुन्हा क्रिकेटचे धागे जुळले तरी दोन देशांमध्ये खोलवर दुष्मनी रुजल्यामुळे या खेळाची अवस्था ओलिताप्रमाणेच राहिली. १९८० व १९९० च्या दशकांत जेव्हा जेव्हा भारत-पाकिस्तान सामने झाले तेव्हा दोनही बाजूंच्या प्रेक्षकांनी आपली उदंड देशभक्ती दाखवत दुसऱ्या पक्षाला यथेच्छ गालिप्रदान जाहीरपणे केले. बंगलोरमधील एका सामन्याची घटना माझ्या स्मरणात आहे. त्या सामन्यात मी उभे राहून टाळ्या वाजवून जावेद मियाँदादची प्रशंसा केली होती; कारण आंतरराष्ट्रीय सामन्यांमधली ती त्याची अखेरची खेळी होती. मी बसलो होतो त्या स्टँडमध्ये त्याचे कौतुक करणारा मी एकटाच होतो. इतरांच्या भावना तेथील एका प्रेक्षकाच्या उद्गारातून प्रकट झाल्या. 'दया देवाची, की पुन्हा या अक्करमाशाचे (बास्टर्ड) थोबाड पहावे लागणार नाही!'' (मला या ठिकाणी मुद्दाम नमूद केले पाहिजे की, त्या वेळी म्हणजे १९९६ मध्ये जावेद दाऊद इब्राहिमचा 'संबंधी' झालेला नव्हता. तो फक्त एक उमदा क्रिकेटपटूच होता).

अलीकडील वर्षांत भारतीय क्रिकेटप्रेमी अधिक सुज्ञ झालेले दिसतात. कारण क्रिकेट हाच केवळ त्यांचा लक्ष्यबिंदू बनला आहे. राजकारणाचा किंवा संघर्षाचा पर्याय नव्हे. २००५ साली बंगलोरमध्ये पाकिस्तानने कसोटी सामना जिंकला तेव्हा चिन्नास्वामी स्टेडियममध्ये उपस्थित प्रेक्षकांनी इंझमाम आणि त्याचे साथी यांचे टाळ्या वाजवून मन:पूर्वक अभिनंदन केले. संजय मांजरेकर या माझ्या मते अत्यंत हुषार आणि स्वतंत्र वृत्तीच्या भारतीय खेळाडू निवेदकाने त्या वेळी असे म्हटले की, भारतीय आता त्यांच्या राष्ट्रीय अस्तित्वाबद्दल थोडेफार निश्चिंत झाले आहेत आणि त्यांच्या व्यक्तिगत भविष्याचीही त्यांना विशेष चिंता उरलेली नाही ही वस्तुस्थिती या घटनेमागे असावी. भारतीय संघराज्य पाकिस्तानच्या मत्सरी आणि घातक कारवायांमुळे तुटून जाईल ही भीती त्यांना राहिलेली नाही. खलिस्तान संपले आहे आणि काश्मीर मामलाही थंडावला आहे. मध्यंतरीच्या दशक-दीड दशकाच्या काळातील सातत्यपूर्ण आर्थिक विकासामुळे मध्यम वर्गात हजारो भारतीय नव्याने ओढले गेले आहेत.

मला वाटते मांजरेकरचे हे विश्लेषण विचार करण्यासारखे आहे, आताही पाकिस्तानने केलेला भारतीय संघाचा पराभव भारतीय प्रेक्षक आणि क्रिकेटप्रेमी लोकांनी ज्या शांतपणे स्वीकारला, त्यामुळे खेळ आणि राष्ट्रीय अभिमान या दोन गोष्टींचा अलगपणे

विचार करण्याची नवीन क्षमता लोकांमध्ये आली आहे असे म्हणावे लागते. धोनीच्या साथींना मिसबाहच्या संघाने खेळात हरवले ही घटना दूरान्वयानेही पाकिस्तानी सैन्याने भारतीय सैन्याचा पराभव केला असे सुचवीत नाही. बंद क्रीडांगणात खेळली जाणारी ही लढाई हिमशिखरांच्या परिसरातील नाही. तिची आयुधे बॅट आणि बॉल ही आहेत; बॉँब आणि रणगाडे नाहीत.

या बदलत्या वातावरणात दोनही बाजूंकडून नियमित दौऱ्यांची आखणी व्हायला हवी. साठ वर्षांपूर्वी भारत-पाकिस्तान कसोटी सामन्यांना सुरुवात झाली, आता त्यांचे अधिकृत व्यवस्थापन करणे आवश्यक आहे. त्यासाठी एका ट्रॉफीची योजनाही करणे जरुरीचे आहे, पण झाका अश्रफ यांच्याशी माझा या ट्रॉफीच्या नावाबाबत मतभेद आहे. या ट्रॉफीचे नाव आपल्या देशांच्या राष्ट्रपित्यांच्या नावावरून ठेवण्याची जी कल्पना आहे तिला दोन प्रकारच्या गंभीर हरकती आहेत. पहिली म्हणजे गांधी किंवा जीना या दोघांपैकी कोणालाही क्रिकेटमध्ये स्वारस्य नव्हते आणि दुसरी हरकत आहे ती राजकीय- ट्रॉफीत पहिले नाव कोणाचे घालायचे?

भारत-पाकिस्तानमधील क्रिकेट- हवे तर पाकिस्तान-भारतमधील क्रिकेट सामने चांगले खेळायला आणि त्यांचा आनंद अनुभवण्यासाठी त्यांच्यावरील राजकारणाचे सावट दूर झाले पाहिजे. म्हणून गांधी व जीना किंवा जीना आणि गांधी ही नावे दूर ठेवू या. मग या ट्रॉफीला नाव कोणते द्यायचे? 'लता-नूरजहाँ' हे दोनही देशांमधली त्यांची प्रगाढ लोकप्रियता व आपलेपणा व्यक्त करणारे नाव; की 'इक्बाल-टागोर' ट्रॉफी हे त्या दोन साहित्यिक विचारवंतांचा सन्मान करणारे नाव?

पाकिस्तान क्रिकेट बोर्डाच्या चेअरमनने सुचविलेल्या नावापेक्षा ट्रॉफीसाठी सुचवलेली वरील नावे कमी वादग्रस्त आहेत; पण ती पुरती समाधानकारक नाहीत. त्यामुळे क्रिकेटच्या ट्रॉफीसाठी क्रिकेटपटूचे नाव सुचविणेच अधिक उचित ठरेल. ऑस्ट्रेलिया-भारत सामना साखळीसाठी योजिलेले बोर्डर-गावस्कर; किंवा ऑस्ट्रेलिया-श्रीलंका सामन्यांसाठी सुचविलेले वॉर्न-मुरलीधरन ट्रॉफी ही दोनही नावे त्या त्या संदर्भात चपखल बसतात. मग त्याच धर्तीवर आपण 'इम्रान-कपिलदेव' ट्रॉफी किंवा 'कुंबळे-वासिम' ट्रॉफी अशी नामांकने का करू नयेत? भारत-पाकिस्तान सामन्यांतील या ट्रॉफीसाठी योजिलेले पहिले नाव त्या खेळातील थोर ऑलराऊंडरचे तर दुसरे नाव मॅचविनर ठरलेल्या बोलरचे आहे.

किंवा एखाद्या सर्वांगीण कुशल खेळाडूच्या नावानेही ही ट्रॉफी प्रदर्शित होऊ शकेल. ऑस्ट्रेलिया-वेस्ट इंडीज सामन्यांसाठी फ्रँक वॅरेलच्या नावाची ट्रॉफी किंवा इंग्लंड-साऊथ आफ्रिका सामना मालिकांसाठी 'बेसिल-डी-ऑलिव्हेरिया' ट्रॉफी अशी परंपरा अस्तित्वात आहेच. मला वाटते याचेच अनुकरण आपण सचिन तेंडुलकरच्या नावे ट्रॉफी ठेवून का करू नये? भारत-पाक क्रिकेटमधील नेमका फरक त्याच्याइतका कोणी ओळखू शकलेला नाही. १९८९ साली पाकिस्तानविरुद्ध तो पहिला सामना खेळला. मार्च २०११ मध्ये वर्ल्ड कप उपांत्य सामन्यामध्येही तो पाकिस्तानविरुद्ध खेळला. तब्बल बावीस वर्षे वेगवेगळ्या प्रकारच्या विकेटस्‌वर आणि खेळाच्या निरनिराळ्या फॉर्म्समध्ये तो जिंकत-धावांचा विक्रम करीत राहिला आणि मैदानातून परतताना सामन्याचा कलही निश्चित करत राहिला. पाकिस्तानविरुद्ध खेळताना त्याने काही अतिशय सुरेख इनिंग्स्‌ केल्या- पण बऱ्याचशा त्या सामन्यात हरण्यासाठी! मद्रासमधील एका सामन्यात त्याने एक ऐतिहासिक म्हणता येईल असे धावांचे शतक पूर्ण केले, पण वासिम व त्यांचा संघ यांनी केवळ तेरा धावांनी सामना जिंकून स्टेडियममधील प्रेक्षकांची मानवंदना घेतली.

तेंडुलकरच्या नावाची ट्रॉफी अनेक पाकिस्तानी खेळाडूंनाही पसंत पडेल असे मला वाटते, कारण त्यांचे चाहते आणि खेळाडूही तेंडुलकरचा आदर करतात आणि त्याचा खेळ गौरवतात. १९९९ च्या वर्ल्ड कपनंतर बकिंगहॅम पॅलेसमध्ये आमंत्रित स्वागत समारंभातील हकीगत राजसिंग डुंगरपूर यांनी मला सांगितली होती. की त्या समारंभात तरुण पाकिस्तानी खेळाडूंना फक्त सचिनचे आकर्षण होते. त्याची उपस्थिती, त्याचा स्पर्श आणि त्याच्याबरोबर घेतलेले फोटोग्राफ्स त्यांना मोहरून टाकत होते. पाकिस्तानी क्रिकेट बोर्डाच्या सदस्यांनाही हे माहीत आहे की, सचिन त्याच्याबरोबरच्या खेळाडूंइतकाच किंवा त्यांच्यापेक्षाही निष्णात असला तरी वैयक्तिक वर्तनाबद्दलही वादातीत आहे. मला वाटते तेंडुलकर ट्रॉफीचा हा पर्याय सर्वांनीच भारदस्तपणे स्वीकारणे योग्य ठरेल. त्यासाठीची घोषणा लवकरच व्हावी अशी अपेक्षा आहे.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

---

पुढील अंकात...
सदानंद मोरे यांचे नवे सदर
**उंबरठ्यावर**

---

रामचंद्र गुहा

# राहुल गांधींचा सद्भाव व त्यांचा राजकीय उथळपणा



प्रत्येक प्रश्न वरवर हाताळून सोडून देण्याची ही प्रवृत्ती, राहुल गांधी कॉलेजमध्ये असते किंवा एखाद्या खाजगी कंपनीत नोकरी करीत असते, अगर स्वत:चा एखादा व्यवसाय त्यांनी मांडला असता, तर तितकीशी घातक नव्हती. पण भारतातील एका जुन्या, मोठ्या आणि प्रभावशाली राजकीय पक्षाचे आज उपाध्यक्ष आणि त्याच पक्षाचा भावी एकमेव नेता आणि देशाच्या पंतप्रधान पदासाठी पुढील उमेदवार अशी त्यांची प्रतिमा तयार केली जात आहे; म्हणून त्यांची ही अर्धवट काम करण्याची धरसोड वृत्ती धोक्याची आहे. राहुल गांधींविषयी आपल्याला जे माहीत आहे, ते एक विचारवंत, कर्तव्यदक्ष राजकारणी व समाजसुधारक या सर्व भूमिकांमधून जे काही दिसतात, त्यावरून तरी पुढील निवडणुकीनंतर काँग्रेस पक्ष सरकार बनवू शकला व पंतप्रधान म्हणून राहुल गांधींची निवड झाली, तर त्यांच्या हाती देश सुरक्षित राहील असे वाटत नाही.

काँग्रेसच्या जयपूर चिंतन शिबिरात पक्षाचे उपाध्यक्ष म्हणून राहुल गांधी यांची निवड झाली आहे. याचा अर्थ असा की पुढील वर्षी म्हणजे २०१४ साली होणाऱ्या सार्वत्रिक लोकसभा निवडणुकीत काँग्रेस पक्षाला बहुमत मिळून केंद्रात सरकार स्थापनेची संधी मिळाली, तर राहुल गांधी त्या सरकारचे प्रमुख म्हणजे देशाचे पंतप्रधान होतील, त्यासाठी त्यांच्या राजकीय कारकिर्दीचा आढावा घेणे आवश्यक आहे. त्या संदर्भात काही गोष्टींचा विचार करू या.

१. राहुल गांधी गेली नऊ वर्षे लोकसभेचे सदस्य आहेत. या सर्व काळात लोकसभेचे कामकाज चालू असताना दर दहा दिवसांत राहुल गांधी फक्त चारच दिवस उपस्थित असत. खासदार म्हणून त्यांना जवळजवळ नऊ वर्षे मिळाली; पण दोनदा मिळालेल्या या संधीत त्यांनी चार-पाच प्रश्न लोकसभेत उपस्थित केले आणि तेवढीच छोटी भाषणे तिथे केली. त्यांचे कोणतेही प्रश्न किंवा भाषणे सरकारी धोरणांवर योग्य तो परिणाम करू शकली नाहीत किंवा त्यातून लोकभावनांना काही आवाहनही केले गेले नाही.

२. राहुल गांधींच्या नऊ वर्षांच्या खासदारकीच्या काळात त्यांचा पक्षच सतत सत्तास्थानी होता, त्यांना मंत्रिपदाची प्रत्यक्ष जबाबदारी कदाचित नको असावी, पण २००८ मध्ये काही तरुण खासदारांना उपमंत्रिपद अगर राज्यमंत्रिपद देण्यात आले, तेव्हाही शासनामध्ये ती जागा स्वीकारण्यास राहुल यांनी नकार दिला. इतकेच काय, पण २००९ साली काँग्रेसच्या नेतृत्वाखालील आघाडी पुन्हा सत्तेवर आल्यानंतरही मंत्रिमंडळात दाखल होणे त्यांनी नाकारले. ग्रामीण विकासाच्या प्रश्नांत त्यांना रस आहे असे म्हणत असतानाही ग्रामीण विकासखात्याचे मंत्रिपद स्वीकारण्याची विनंतीही त्यांनी नाकारली.

३. नऊ वर्षांच्या या राजकीय कारकिर्दीत राहुल गांधींनी निवडणूक प्रचारासाठी अनेक दौरे केले. त्यांनी गुजरातेत एक दिवस त्यासाठी घालवला, पण तेथे काँग्रेसची परिस्थिती दयनीय झाली. नंतर याच कामासाठी ते बिहार व उत्तर प्रदेशातही फिरले, पण अधिक वेळ देऊनसुद्धा तेथेही काँग्रेसचे पानिपतच झाले. २००९ सालच्या सार्वत्रिक लोकसभा निवडणुकांत प्रचारासाठी ते बरेच हिंडले, पण मतदान पृथक्करण करणाऱ्या अभ्यासकांच्या मते काँग्रेसची वाढलेली मते हा सोनिया गांधींनी पुरस्कार केलेला माहितीचा अधिकार व रोजगार हमी योजनेचा केलेला पाठपुरावा यांचा परिणाम होता; त्याचबरोबर डॉ.मनमोहनसिंग यांनी आर्थिक विकासासाठी टाकलेली पावले आणि त्यांचे निष्कलंक चारित्र्य यांचाही फार मोठा वाटा त्या यशात होता.

या वस्तुस्थितीचा अर्थ असा होतो की, राहुल गांधी थोड्या अनिच्छेनेच खासदार झाले आणि त्यामुळे संसदेत कोणताही प्रभाव टाकू शकले नाहीत. मंत्रिपदाची जबाबदारी स्वीकारण्यासाठी लागणाऱ्या आत्मविश्वासाचा अभाव आणि नाराजी त्यांच्या वर्तनात दिसली. निवडणूक राजकारणात किंवा प्रचारातही त्यांचा फार प्रभाव पडला असे दिसत नाही. त्यांच्यामुळे काँग्रेसला मिळणाऱ्या जागा व मते यांच्यात भर पडली असेही म्हणता येणार नाही. पण एखाद्याचे राजकीय कर्तृत्व किंवा सार्वजनिक जीवनाचा व्याप केवळ त्याच्या संसदीय व मंत्रिपदाच्या कारकिर्दीवरून मोजणे योग्य ठरणार नाही, म्हणून राहुल गांधींनी संसदेबाहेर पुढाकार घेऊन केलेल्या काही कामांची नोंद घेणे आवश्यक आहे.



माझ्या डोळ्यांसमोर त्यांनी घतेलेले असे पाच कार्यक्रम क्रमवार आहेत.

१. मार्च २००८ मध्ये राहुल गांधी यांनी ओडिशामध्ये नायमगिरी डोंगर परिसराला भेट दिली. त्या प्रदेशात हजारो डोंगरिया कोंड जमातीचे लोक एकत्र येऊन त्यांच्यासाठी पूज्य असणाऱ्या एका डोंगराचा विध्वंस करून चालू करण्यात येणाऱ्या बॉक्साइट खाण प्रकल्पावर बंदी आणावी, यासाठी निदर्शने करीत होते. त्या प्रकल्पाने त्यांच्या उदरनिर्वाहाच्या साधनांवरही गदा येणार होती. त्यांची बाजू घेत राहुल यांनी त्यांना वचन दिले होते की, 'मैं दिल्ली में आप का सिपाही हूं'. (म्हणजे थोडक्यात मी स्वत: दिल्लीमध्ये तुमच्या बाजूने प्रयत्न करीन. तुमची बाजू सरकारसमोर मांडेन.)
२. जानेवारी २००९ मध्ये डेव्हिड मिलिबँड या ब्रिटिश विदेश सचिवासह राहुल गांधींनी उत्तर प्रदेशातील एका खेड्याला भेट दिली. तिथे एका दलित कुटुंबात जवळजवळ टाकलेल्या दोऱ्यांच्या खाटांवर झोपून त्यांनी रात्र घालवली.
३. फेब्रुवारी २०११ मध्ये राहुल यांनी मुंबईतील लोकल ट्रेनमधून गर्दीच्या प्रवासाचा अनुभव घेतला.
४. मे २०११ मध्ये राहुल गांधी दिल्लीजवळच्या भट्टा-परसौल या खेड्यात पोहोचले. त्या खेड्यातील जमीन एका प्रकल्पाच्या उभारणीसाठी शेतकऱ्यांच्या परवानगीशिवाय आणि बाजारभावाच्या निम्म्यापेक्षा कमी दराने ताब्यात घेण्याची प्रक्रिया सुरू होती आणि त्यासाठी शेतकऱ्यांचा प्रतिकार चालू होता. या शेतकऱ्यांना भेटण्यासाठी राहुल गांधी तिथे गेले होते.
५. ऑक्टोबर २०१२ मध्ये, काही मोठ्या उद्योजकांना बरोबर घेऊन राहुल गांधींनी काश्मीरला भेट दिली. या उद्योजकांत रतन टाटा हेही होते. काश्मीर विद्यापीठात राहुल यांनी भाषण करून विद्यार्थ्यांशी संवाद साधला. काश्मीर खोऱ्यात कौशल्य वाढविणारे रोजगार पुरवण्यासाठी आणि तेथील गुंतवणूक वाढविण्यासाठी आपण मोठमोठ्या कंपन्या या प्रदेशात आणू असे अभिवचन राहुल गांधींनी येथील विद्यार्थ्यांना दिले होते.

वरील पाच ठिकाणी राहुल गांधींनी ज्या प्रश्नांसंदर्भात दौरे केले ते महत्त्वाचेच होते. विरोधी पक्षांनी त्यांना महत्त्व दिले नाही किंवा सार्वजनिक पातळीवर त्यांची व्यापक चर्चा झाली नाही. पण आदिवासींची आजची अवस्था दलित किंवा मुस्लिम यांच्यापेक्षाही वाईट आहे. स्वतंत्र भारतातील ६५ वर्षांच्या लोकशाहीत आणि विकासात त्यांच्या पदरात अत्यल्प पडले आणि ते बरेचसे गमावून मात्र बसले. वरिष्ठ राजकीय पदांवर त्यांचे प्रतिनिधित्व जवळजवळ अभावानेच दिसते; विधि (कायदा) आणि वैद्यकीय व्यवसायासारख्या प्रतिष्ठित व्यवसायांत त्याचप्रमाणे प्रशासकीय

अधिकारपदांवर आणि न्यायव्यवस्थेतील महत्त्वाच्या जागांवर आदिवासींना आजही स्थान नाही. आदिवासी आज आपली जमीन, जंगले मोठमोठ्या आर्थिक हितसंबंधांना आणि प्रकल्पांना देऊन बसले आहेत. त्याची परतफेड अत्यल्प किंमत किंवा हकालपट्टी या स्वरूपातच होत आहे. या आदिवासींची ही लुबाडणूक व शोषण यामुळेच मध्य भारतात माओवादी चळवळीचा फैलाव झाला आहे. राहुल गांधींनी ओडिशामध्ये जाऊन या शोषित आदिवासींची बाजू समजावून घेणे यात त्यांच्या विवेकी आणि संवेदनशील राजकीय प्रवृत्तीचे दर्शन घडले.

इतर प्रसंगांतील नेतृत्वामागेही राहुल गांधींचे हेतू उदात्त असल्याचे जाणवते. 'लाल दिवा गाडी' संस्कृतीने विटलेली सामान्य माणसे पाहत असताना आणि सर्व प्रकारचे हक्क आणि सुखसोयी यांना लालचावलेले खासदार व मंत्री यांच्या समूहात वावरत असतानासुद्धा 'आम आदमी'बरोबर मिसळण्याची, तो कसा व कुठे झोपतो, प्रवास कसा करतो हे जाणून घेण्याची त्यांची कल्पना स्वागतार्हच होती. त्याचबरोबर शेतजमिनी आणि त्यांच्यावरच्या झोपड्या व गुरांचे गोठे यांचा औद्योगिक उत्पादने आणि पायाभूत सुविधा प्रकल्प उभारण्यासाठी केलेला कब्जा या गोष्टी वरचेवर घडत आहेत आणि त्यामुळे विस्थापितांना असह्य शारीरिक व मानसिक दु:ख होत आहे याची जाणीवही त्यांना झाली. त्यांच्या काश्मीरभेटीत काश्मीर खोऱ्याला ऊर्वरित भारताशी एकरूप करण्यासाठी काही उद्योजकांनी तेथे व्यवसाय चालू करून तरुणांना काम मिळवून द्यावे यासाठी खटपट करण्याची त्यांनी दाखवलेली तयारीही उत्साहवर्धक होती.

म्हणजे राहुल गांधींनी वरील सर्व प्रकरणांत घेतलेला पुढाकार स्वागतार्ह होता; उदात्तही होता, पण खेदाची गोष्ट अशी की, त्याचा पाठपुरावा अजिबात (कोणत्याही पातळीवर) झाला नाही. श्रीयुत गांधी त्या आदिवासींचे 'सिपाही' फक्त तेवढाच एक दिवस होते, मुंबईच्या लोकल ट्रेनमधून त्यांनी फक्त एकदाच प्रवास केला, दलिताच्या झोपडीमध्येसुद्धा ते एकदाच राहिले. आता मोठ्या उद्योजकांना घेऊन ते काश्मीरमध्ये कधी जातात ते पाहायचे!

राहुल गांधी एकच विषय हाती घेऊन त्याचा पिच्छा शेवटपर्यंत का नाही पुरवत? संविधानाच्या पाचव्या शेड्यूलनुसार आदिवासींच्या मालकीची जमीन उद्योग किंवा खाणप्रकल्पासाठी हस्तगत करताना त्या प्रकल्पांमध्ये त्या आदिवासींना भागधारक करून घेण्याची विशेष तरतूद केलेली आहे. मग अशा मोठ्या औद्योगिक अगर खाणकंपन्यांनी अशा आदिवासींना त्या व्यवसायाचे २५ टक्के भाग (शेअर्स) मंजूर करून देण्यासाठी राहुल यांनी पाठपुरावा का करू नये! त्यातून त्यांना कौशल्यप्रशिक्षण आणि पुढे त्याच व्यवसायात रोजगार यासाठी योजना आखून त्याचा आदर्श इतर कंपन्यांसमोर ठेवण्यासाठी राहुल गांधींनी त्या आदिवासी प्रदेशात प्रकल्प उभारणाऱ्या कंपन्यांना किंवा खाणमालकांना (थोडाफार दबाव आणून) तयार का केले नाही? त्याचप्रमाणे १८९४ सालच्या प्राचीन झालेल्या भू-संपादन कायद्याची देशात सर्वत्र वादळी चर्चा चालू असताना त्यात राहुल गांधींचा आवाज कोठेही (संसदेत अगर संसदेबाहेर) उमटलेला का ऐकू येत नाही? काश्मीरमधील बंडखोरी ही माओवादाइतकीच देशाच्या सुरक्षेला धोकादायक आहे, हे माहीत असतानाही राहुल यांनी तेथील युवकांना शब्द दिल्याप्रमाणे रतन टाटांना काश्मीरमध्ये नेऊन टाटांचा किमान एक तरी प्रकल्प तेथे सुरू व्हावा, यासाठी काय प्रयत्न केले?

या सर्वांतून एकच तात्पर्य काढता येते, ते असे की राहुल गांधींचे विचार कितीही चांगले असले तरी ते कृतीत उतरविण्यासाठी लागणारी जिद्द त्यांच्यामध्ये नाही; धरसोडीच्या वृत्तीमुळे ते कोणतेच काम वा योजना पूर्णत्वाला नेऊ शकत नाहीत. त्यांनी कोणत्याही बाबतीत प्रशासनक्षमता दाखवलेली नाही. तसेच मोठ्या वा महत्त्वाच्या जबाबदाऱ्या अंगावर घेऊन त्या पार पाडण्याची क्षमताही त्यांच्यामध्ये कधी दिसली नाही. कोणतेही सामाजिक प्रश्न नीट ओळखून त्यांची सोडवणूक करण्याची दृढ इच्छा अगर संकल्प पार पाडण्याइतकी ऊर्जा स्वत:मध्ये असल्याचे त्यांनी कधी दाखवून दिले नाही.

प्रत्येक प्रश्न वरवर हाताळून सोडून देण्याची ही प्रवृत्ती, राहुल गांधी कॉलेजमध्ये असते किंवा एखाद्या खाजगी कंपनीत नोकरी करीत असते, अगर स्वत:चा एखादा व्यवसाय त्यांनी मांडला असता, तर तितकीशी घातक नव्हती. पण भारतातील एका जुन्या, मोठ्या प्रभावशाली राजकीय पक्षाचे आज उपाध्यक्ष आणि त्याच पक्षाचा भावी एकमेव नेता आणि देशाच्या पंतप्रधानपदासाठी पुढील उमेदवार अशी त्यांची प्रतिमा तयार केली जात आहे; म्हणून त्यांची अर्धवट काम करण्याची ही धरसोड वृत्ती धोक्याची आहे. राहुल गांधींविषयी आपल्याला जे माहीत आहे, ते एक विचारवंत, कर्तव्यदक्ष राजकारणी व समाजसुधारक या सर्व भूमिकांमधून जे काही दिसतात, त्यावरून तरी पुढील निवडणुकीनंतर काँग्रेस पक्ष सरकार बनवू शकला व पंतप्रधान म्हणून राहुल गांधींची निवड झाली, तर त्यांच्या हाती देश सुरक्षित राहील असे वाटत नाही.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

---

पुढील अंकात...
सदानंद मोरे यांचे नवे सदर
**उंबरठ्यावर**

---

रामचंद्र गुहा

# पितृसत्ता आणि पूर्वग्रह



**गांधींनी प्रतिवाद पुढे चालूच ठेवला. 'आम्ही (पूर्वेने) स्त्रियांना पूजनीय स्थान दिले आहे, देवता मानले आहे' या आपल्या मुद्द्याच्या समर्थनार्थ त्यांनी सत्यवान-सावित्रीची कथा मिली यांना सांगितली. सत्यवान मरण पावला तेव्हा त्याचे प्राणहरण करणाऱ्या यमाबरोबर सावित्रीने वाद-विवाद करून आपल्या पतीचे प्राण परत आणले... ही कथा सांगून गांधी म्हणाले, 'तिला त्यासाठी कडवी झुंज द्यावी लागली, पण अतुलनीय धैर्य, सहनशीलता, प्रेम आणि सुज्ञपणा यांच्या जोरावर तिने आपल्या पतीला परत मिळविले, हे विशेष!'**
**'या कथेतून आमचीच भूमिका स्पष्ट झाली आहे, तिला दुजोरा मिळालेला आहे' असे यावर मिलीने गांधींना उत्तर दिले. 'भारतीय पुराणकथांमध्ये 'स्त्री ही पुरुषाची सेवा करण्याकरताच आहे; त्याच्या प्राणासाठी यमाशीही ती झगडून यशस्वी होते' हे सांगितले आहे.**

स्त्रीचा जन्म हे एक अतिशय कठीण कर्म आहे; कारण मुख्यत: पुरुषांना हाताळणे हा तिच्या जीवनातील एकमेव व्यवहार होऊन बसला आहे.

– जोसेफ कॉन्रॅड

भारतातील हिंदू आणि मुस्लिम हे दोनही धर्म प्रखरपणे पितृसत्ताक आहेत. त्यांचे धर्मग्रंथ आणि परंपरा यांनी स्त्रीला कायम दुय्यम दर्जा दिला आहे. पूर्वीपासूनच सत्ता आणि अधिकार यांच्यापासून स्त्रीला कटाक्षाने बाजूला ठेवण्यात आले आणि तिला तिच्या निवडीचा व्यवसाय करण्यासही प्रतिबंध करण्यात आला. पुरुष एका वेळी अनेक बायका करीत होते, पण स्त्रीला मात्र जन्मभर एकाच पतीवर निष्ठा ठेवून जगावे लागे आणि तिच्या पतीची निवडही तिचे वडील किंवा आजोबा वा अन्य पोक्त माणसांकडून केली जात होती.

भारतातील मुख्य धर्मांनी स्त्रियांबद्दल जोपासलेल्या या दृष्टिकोनाचे प्रत्यंतर, दिल्लीमध्ये एका मुलीवर झालेला निर्घृण अत्याचार आणि त्यानंतर तिचा केलेला खून या प्रकरणात आले. रा.स्व.संघाचे प्रमुख मोहन भागवत आणि पुरीचे शंकराचार्य या दोघांनी या घटनेचे खापर पाश्चिमात्य संस्कृतीवर फोडले; 'पारंपरिक हिंदू संस्कृतीमध्ये अशा घटना घडल्या नाहीत, घडू शकतच नाहीत' असे त्यांनी म्हटले. आसाराम बापू हे 'महाराज' म्हणाले, की या सर्व प्रसंगात ती मुलगीच दोषी आहे; तिने गुडघे टेकून त्या माणसांकडे दयायाचना केली असती तर त्या भयंकर प्रसंगातून ती वाचली असती!

सनातनी हिंदुत्वाचे पालकत्व मिरवणाऱ्या या तिघांच्या विधानांना माध्यमांनी भरपूर प्रसिद्धी दिली. या संदर्भात केरळमधील कंथापुरम् येथील सुन्नी मुस्लिम धर्मगुरू अबूबकर मुसलीयार यांनी या प्रकरणात केलेली शेरेबाजी मात्र थोडीशी दुर्लक्षित राहिली. हिंदू धर्म संरक्षकांनी केलेल्या विधानांना पुष्टी देताना त्यांनी म्हटले, 'स्त्री-पुरुष समानतेची मागणी निसर्गाच्या विरोधी आहे, स्त्री आणि पुरुष यांची घडण व त्यांच्या क्षमता वेगवेगळ्या आहेत; आणि त्यांच्या जबाबदाऱ्याही भिन्न आहेत.' थोडक्यात मौ.अबूबकर मुसलीयार यांनी स्त्रियांच्या समतेची कल्पना 'पाश्चिमात्य' म्हणून अशी तातडीने दूर सारली.

१९५० साली भारतीय राज्यघटनेने स्त्री-पुरुष नागरिकांना एकाच पातळीवर आणून ठेवले. पाश्चिमात्य लोकशाह्यांमध्ये मतदानाचा अधिकार पुरुषांना आधी आणि स्त्रियांना काही वर्षांच्या संघर्षानंतर मिळाला. पण भारतामध्ये १९५२ च्या पहिल्याच सार्वत्रिक निवडणुकांत २१ वर्षांच्या वरील प्रत्येक नागरिकाला वर्ग, जात-धर्म व लिंगविरहित मतदानाचे स्वातंत्र्य होते- नव्हे मतदानासाठी उत्तेजन दिले जात होते. पाच वर्षांनंतर भारतीय संसदेने अनेक कायदे संमत करून हिंदू स्त्रियांना मालमत्ता धारणेचा अधिकार आणि वारसाहक्क मिळवून दिला. जीवनाचा जोडीदार- मग तो दुसऱ्या जातीचा, धर्माचा असला तरी- निवडण्याचा, आणि त्याच्याकडून मिळणाऱ्या बऱ्या-वाईट वागणुकीनुसार त्याच्याबरोबर किंवा त्याच्याशिवाय घटस्फोट घेऊन राहण्याचा हक्कही स्त्रीला मिळाला.

कायद्यानुसार स्त्रीला मिळणारे हे सर्व हक्क नवीन होते. सनातन हिंदू कायद्याविरुद्ध- रूढींच्या विरोधी- होते. त्यामुळे हिंदूंसाठी केलेला व्यक्तिगत कायदा- हिंदू कोड बील- तयार केला जात असताना त्याच्या प्रत्येक टप्प्यावर कायद्यातील सुधारणांना सनातनी हिंदू व त्यांच्या संघटना विरोध करीत होत्या. रा.स्व.संघ आणि शंकराचार्य या दोहोंनाही,



आपल्या भावी पतीची निवड करण्याचे स्त्रीला मिळालेले स्वातंत्र्य साफ नामंजूर होते. आपल्या भगिनी त्यांना मिळालेला संपत्तीचा वारसा सांभाळण्यास किंवा मालमत्ता मिळवण्यास पूर्णपणे नालायक आहेत असेच त्यांना वाटत होते. स्त्रियांनी घराबाहेर पडून एखादे प्रतिष्ठेचे पद भूषवावे किंवा नोकरी करून संपत्ती कमवावी या गोष्टींना अर्थातच त्यांचा तीव्र विरोध होता.

वरील सर्व गोष्टींमध्ये हिंदू सनातनी पितृसत्ता अभिमान्यांना त्यांच्या मुस्लिम 'भाईबंदां'चाही तितकाच कडवा पाठिंबा होता. कारण हिंदू स्त्रियांसाठी झालेले प्रागतिक कायदे काही काळाने मुस्लिम स्त्रियांनाही इस्लामिक कायद्यात सुधारणा करून लागू केले जाणार याची चिन्हे दिसत होतीच! हिंदू कोड बिलाच्या पुढचे पाऊल देशातील सर्व धर्म, जाती, यांचा विचार न करता स्त्रियांना (समान नागरी कायदा लागू करून) पुरुष उपभोगत असलेले सर्व सामाजिक व कायदेशीर अधिकार व हक्क मिळवून देणे हे होते. पण प्रतिगामी मुल्ला-मौलवींना धक्का लावण्यास कचखाऊ राजकारणी तयार नसल्यामुळे समान नागरी कायदा आजही अस्तित्वात आलेला नाही. स्त्री-पुरुष समानता अस्तित्वात आणण्याचे कार्य आजही अपुरे आहे. मागील शतकात भारतीय स्त्रियांनी (हिंदू व मुस्लिम या दोनही धर्मांच्या) त्यांचे मूलभूत मानवी हक्क हस्तगत करण्यात बरीच प्रगती केली आहे, जी त्या आधीच्या दहा दशकांत झालेली दिसली नाही. धार्मिक सनातन्यांच्या कलाने जगत राहिल्या असत्या तर भारतीय स्त्रियांची हालत आज आहे त्यापेक्षाही वाईट झाली असती.

भारतीय समाजातील लैंगिक असमानतेच्या भावनेचा फैलाव प्रथम बंगालमधील प्रख्यात समाजसुधारक राजा राममोहन रॉय यांच्या ध्यानात आला. रॉय यांनी घालून दिलेली परंपरा अधिक सखोल बनवण्याचे कार्य करणाऱ्यांत महात्मा जोतिबा फुले, व्ही.रामस्वामी, जवाहरलाल नेहरू आणि डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचा मोठाच सहभाग होता. त्यांच्याबरोबर या कार्यात त्यांच्या अनेक लहान-मोठ्या सहकाऱ्यांचा सहभाग होता. दरम्यानच्या काळात, आपल्या मुक्तीसाठी पुरुषांवर अवलंबून राहण्याऐवजी काही स्त्रियाच या चळवळीसाठी पुढे सरसावल्या, त्यात ताराबाई शिंदे आणि पंडिता रमाबाई यांच्यासारख्या अनेक स्त्रीवादी नेत्या देशासमोर उभ्या करण्यात महाराष्ट्राने पुढाकार घेतला. त्यानंतर विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात अम्मू स्वामिनाथन, कमलादेवी चट्टोपाध्याय, सरोजिनी नायडू, अरुणा असफअल्ली आदी महिलांनी देशभर फिरून सभा, मेळावे आयोजित केले; संघटना उभारल्या आणि सहकारी संस्थाही स्थापन केल्या. त्यामध्ये ठिकठिकाणच्या महिलांची मनोगते मोकळेपणाने व्यक्त होऊ लागली. पुरुषांच्या बरोबरीने समान नागरिकत्वाचे हक्क उद्याच्या स्वतंत्र भारतात स्त्रियांना मिळाले पाहिजेत, या मागणीनेही मग जोर धरला.

महिलांच्या हक्कांसाठीच्या या आंदोलनाला प्रोत्साहन देणाऱ्यांत मोहनदास करमचंद गांधी नावाचे एक गृहस्थही होते. या मोहनदासांचे पालनपोषण एका सनातनी हिंदू कुटुंबात झालेले असल्यामुळे (सुरुवातीला) तेही इतरांप्रमाणे पुरुषसत्ताक समाजपद्धतीचे समर्थक होते, पण मग त्यांच्यामध्ये हे परिवर्तन कशामुळे झाले? त्यांचे विचार एकदम खुले कसे झाले? जुलै १९३४ मध्ये लाहोर येथे विद्यार्थिनींच्या एका मेळाव्यात बोलताना गांधी म्हणाले, 'मी दक्षिण आफ्रिकेत होतो तेव्हा मला उमगले की, स्त्रियांच्या प्रगतीसाठी काही मी करू शकलो नाही तर माझे कार्य अपुरेच राहणार आहे.'

गांधींची स्त्रियांविषयीची संवेदनशीलता, ते आपल्या पत्नीसह दक्षिण आफ्रिकेत जोहान्सबर्ग येथे राहत होते तेव्हापासून वाढीला लागलेली दिसते. त्यांच्याच घरात हेन्री पोलॉक आणि त्यांच्या पत्नी मिली पोलॉक हे एक इंग्लिश जोडपे राहत होते. मिली पोलॉक या कट्टर स्त्रीवादी होत्या. त्यांनीच कस्तुरबांना 'तयार' करून गांधींसमोर ठीकठाक उभे केले आणि गांधींनाही त्यांच्या सनातनी स्त्रीविरोधी प्रवृत्तींबद्दल सुनावले. 'जीवनाला भिडणारे सर्व प्रश्न खरे तर स्त्रियांनाच ग्रासणारे असतात' असे मत मिली पोलॉक यांनी आपल्या एका मैत्रिणीला लिहिलेल्या पत्रात व्यक्त केले होते. 'हजारो वर्षांपासून पुरुषांनी स्त्रिया आणि त्यांच्यामधील नैसर्गिक उदात्तता यांचा अशा प्रकारे वापर करून घेतला आहे की, त्यामुळे त्यांची प्रगती होण्याऐवजी त्यांच्या हितसंबंधांना धोकाच अधिक पोहोचलेला आहे' असे त्यांचे ठाम मत होते. 'जीवनातील सूक्ष्म आणि मुलायम शक्तींची स्त्रीला जेव्हा जाण येईल तेव्हाच ती खरी स्वत:च्या पायावर उभी राहील' असे त्या म्हणत.

१९३१ साली मिली पोलॉक यांनी गांधी दांपत्याच्या सहवासातील आपल्या जीवनामधल्या काही आठवणी पुस्तक रूपाने प्रसिद्ध केल्या. त्यात 'पूर्वेकडील देशांनी स्त्रियांना पश्चिमेपेक्षा अधिक उच्च दर्जा दिला आहे' अशा गांधींच्या विधानाची नोंद आहे. त्यावर उत्तर देताना मिली म्हणाल्या, 'हे चूक आहे. तुम्ही स्त्रियांना आपल्या उपभोगाचे साधन बनवले, त्यांना स्वत:चे आयुष्य राहिलेलेच नाही, हेच खरे आहे.'

गांधींनी प्रतिवाद पुढे चालूच ठेवला. 'आम्ही (पूर्वेने) स्त्रियांना पूजनीय स्थान दिले आहे, देवता मानले आहे' या आपल्या मुद्द्याच्या समर्थनार्थ त्यांनी सत्यवान-सावित्रीची कथा मिली यांना सांगितली. सत्यवान मरण पावला तेव्हा त्याचे प्राणहरण करणाऱ्या यमाबरोबर सावित्रीने वाद-विवाद करून आपल्या पतीचे प्राण परत आणले... ही कथा सांगून गांधी म्हणाले, 'तिला त्यासाठी कडवी झुंज द्यावी लागली, पण अतुलनीय धैर्य, सहनशीलता, प्रेम आणि सुज्ञपणा यांच्या जोरावर तिने आपल्या पतीला परत मिळविले, हे विशेष!'

'या कथेतून आमचीच भूमिका स्पष्ट झाली आहे; तिला दुजोरा मिळालेला आहे' असे यावर मिलीने गांधींना उत्तर दिले. 'भारतीय पुराणकथांमध्ये 'स्त्री ही पुरुषाची सेवा करण्याकरताच आहे; त्याच्या प्राणासाठी यमाशीही ती झगडून यशस्वी होते' हे सांगितले आहे. कथा-पुराणात काय किंवा प्रत्यक्षात काय, (गांधी कस्तुरबांना कसे वागवत होते ते मिली पाहत होतीच!) भारतीय स्त्रिया या फक्त पुरुषांच्या सुखासाठीच जगत असतात तरीही त्यांना किंमत नाहीच, हे आपले मत मिली पुन्हा पुन्हा गांधींसमोर मांडत होती.

मिली पोलॉकशी वरचेवर होणाऱ्या या चर्चांमुळे गांधींना फेरविचार करणे अपरिहार्य ठरले. पूर्वग्रह सोडून त्यांचे विचार हळूहळू खुले होऊ लागले. त्यांच्या या विचारपरिवर्तनात मिली पोलॉक यांना इतर अनेक महिलांची मदत झाली. त्यांच्यामध्ये एक, गांधींची सोन्जा श्लेसिन ही सेक्रेटरीही होती. थोड्या आक्रमक वृत्तीच्या आणि स्वतंत्र विचाराच्या या महिलेने वेळोवेळी गांधींना त्यांच्या चुकीच्या विचाराची वा कृतीची स्पष्ट जाणीव करून देण्यास पुढे-मागे पाहिले नाही.

१९०६ व १९०९ मध्ये गांधींनी इंग्लंडला भेट दिली तेव्हा त्यांनी 'सेफ्रेजेट' चळवळीतील स्त्रियांचे उग्र रूप पाहिले. मतदानाचा अधिकार मिळविण्यासाठी या स्त्रिया ज्या जिद्दीने आणि सोशिकपणे लढा देत होत्या; स्वत:ला अटक करवून घेत होत्या आणि पोलिसांचा मार खात होत्या, त्यामुळे गांधी प्रभावित झाले. द.आफ्रिकेत परतल्यावर आयोजित सत्याग्रहात भाग घेण्यासाठी तमिळ स्त्रियांनी चालविलेल्या नि:स्वार्थी चढाओढीने त्यांचे अंत:करण द्रवले. त्यांनी संघटित केलेल्या सत्याग्रहाच्या शेवटच्या फेरीत १९१३ साली तमिळ महिलांबरोबर कस्तुरबांनीही स्वत:ला अटक करवून घेतली. हा काळ असा होता की, भारतातही राष्ट्रीय चळवळींपासून स्त्रियांना दूर ठेवले जात होते.

काही वर्षांपूर्वी 'इकॉनॉमिक ॲन्ड पोलिटिकल वीकली'मध्ये लिहिलेल्या एका लेखात मधु किश्वर यांनी असे विधान केले होते की, इतर कोणत्याही राजकारण्यांपेक्षा गांधीजींनी स्त्रियांना सार्वजनिक जीवनात भाग घेण्यासाठी सर्वांत अधिक प्रमाणात प्रोत्साहित केले. अनेक स्त्रिया केवळ त्यांची भाषणे वाचून किंवा ऐकून स्वातंत्र्यचळवळीत हालअपेष्टा सोसण्यासाठी आल्या हे खरेच असावे. मार्क्सवादाने लैंगिक समतेचे अभिवचन आपल्या सैद्धांतिक घोषणापत्रात दिलेले आहे, पण पुरुषी वर्चस्ववादाचा आचार करण्यामध्ये स्टॅलिन आणि माओसारखे मार्क्सवादी 'महाराज' किंवा 'मौलाना' यांच्यापेक्षा कुठेच कमी नव्हते. (आजच्या सीपीआय(एम)नेही स्त्रियांसाठी पक्षात खूपच कमी प्रतिनिधित्व ठेवून त्यांचा वारसा पुढे चालूच ठेवला आहे) बोल्शेविक क्रांती किंवा चीनमधील लाँग मार्च यांमध्ये सामील झालेल्या स्त्रियांच्या मानाने भारतीय स्वातंत्र्य चळवळीत सामील होऊन सक्रिय झालेल्या आणि चळवळीला नेतृत्व दिलेल्या स्त्रियांची संख्या खूपच मोठी आहे.

एकंदरीतच असे दिसते, की भारतीय स्त्रियांच्या मुक्तीचा मार्ग हा धार्मिक सनातनीपणा, पौराणिक ग्रंथांतील आदेश आणि हिंदू व मुस्लिम या दोहोंच्याही सामाजिक रूढी यांच्याविरुद्ध ठामपणे आणि धैर्याने उभ्या राहिलेल्या व्यक्तींनी आखून दिलेला आहे. हे आव्हान देणाऱ्या सुधारकांपैकी काहीजण प्रवृत्तीनेच आधुनिक होते. त्यांचे शिक्षण आणि परिसर स्त्रियांच्या समान अधिकारांसाठी त्यांना सहजपणे क्रियाशील घडवीत होता, पण काहींची मने अनुभवांनी व विचारांनी हळूहळू खुली होत गेली तर काहींच्या सहवासात आलेल्या स्त्रियांनी दिलेल्या आव्हानांमुळे त्यांच्या आग्रही मतांना हादरे मिळाले. डॉ.आंबेडकर व नेहरू यांतील पहिल्या वर्गात मोडतात; तर गांधी दुसऱ्या वर्गात. इतिहासातील घटनांचा विचार केला तर मिली पोलॉक, सोन्जा श्लेसिन आणि कमलादेवी चट्टोपाध्याय यांच्यासारख्या स्त्रियांबरोबर गांधींना संवाद साधण्याची किंवा वादविवादाची संधी मिळाली हे गांधींचे सुदैवच समजले पाहिजे. फक्त पुरुष सहवासाच्याच मर्यादेत राहिलेले आणि फक्त (पुरुष) मित्रांच्याच सहवासासाठी आग्रही असणारे मोहन भागवत, आसाराम बापू, पुरीचे शंकराचार्य आणि कंथापुरम्चे अबूबकर मुसलीयार यांना हे सुदैव लाभले नाही, त्यामुळे त्यांची स्वत:ची व देशाचीही थोडीफार हानी झाली आहे!

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

**ताजा कलम–** *हा लेख छपाईसाठी जात असताना काश्मीरमध्ये मुलींनी चालविलेल्या एका बँड पथकाला हरकत घेऊन ते कृत्य इस्लामविरोधी असल्यामुळे ताबडतोब थांबविण्याचा फतवा मौलाना बशीरुद्दीन यांनी काढला आहे. या धर्मगुरूंनाही स्त्रियांबरोबरच्या मैत्रीचा अनुभव मिळाला नसावा हे निश्चितच!*

रामचंद्र गुहा



**‘अन्टचेबल’च्या लेखन काळात मुल्कराज आनंद यांना आंबेडकरांची विशेष माहिती होती असे वाटत नाही, पण नंतरच्या काळात मात्र त्यांनी वेळोवेळी आंबेडकरांच्या कार्याबद्दल गौरवोद्‌गार काढले आहेत. १९५० च्या दशकाच्या पूर्वार्धात मुंबईत आनंद आंबेडकरांना भेटले होते. त्यानंतर बऱ्याच वर्षांनी म्हणजे १९८० मध्ये आंबेडकरांच्या ‘ॲनिहिलेशन ऑफ कास्टस्’ या ग्रंथाच्या नवीन आवृत्तीला त्यांनी प्रस्तावना लिहिली.**

**जातिनिर्मूलनावरील आंबेडकरांचा हा ग्रंथ प्रथम १९३६ साली प्रसिद्ध झाला, ज्यामध्ये आंबेडकरांनी हिंदू धर्मावर आणि त्यातील रूढींवर जहरी टीका केली आहे.**

**डॉ.आंबेडकर यांचा हा टीकाग्रंथ प्रकाशित होण्यापूर्वी एक वर्ष आधी आनंद यांची कादंबरी प्रसिद्ध झाली होती. त्या कादंबरीत आंबेडकरांच्या पुस्तकातील काही सूत्रांची झलक होती आणि कदाचित पुढील आयुष्यात आंबेडकरांनी ज्या प्रकारचे राजकारण केले त्याची चाहूलही होती.**

# अन्टचेबल : गांधीवादी आणि आंबेडकरवादी

१९३० : महात्मा गांधींनी मिठाच्या सत्याग्रहासाठी दांडीयात्रा काढली. ब्रिटिशांच्या वासाहातिक कारभाराविरोधात गांधीजींनी उभारलेला हा दुसरा मोर्चा. जरी वरवर या कृतीला भरपूर प्रतिसाद लाभलेला दिसला तरी भारतीय समाजाच्या दोन गटांनी या सत्याग्रहाला कसून विरोध केला. त्यांपैकी एका गटाला गांधी आणि त्यांचा काँग्रेस पक्ष हे फक्त हिंदूंचे प्रतिनिधित्व करतात (मुसलमानांचे नाही) असे वाटत होते. तर गांधी हे फक्त उच्चवर्णीय हिंदूंचे प्रतिनिधी आहेत असे मत दुसऱ्या एका गटाचे होते.

वरील प्रकारची टीका गांधींना झोंबत असे. मुस्लिम नेत्यांच्या संपर्कात राहून संवाद साधण्याचा त्यांचा प्रयत्न सतत चालू असे; त्याचबरोबर अस्पृश्यता निवारणाची त्यांची मोहीमही मोठ्या तडफेने चालू होती. चांभारकाम, भंगीकाम करणाऱ्या सामाजिक घटकांना घाणेरडे व अस्वच्छ ठरवून, देवळे, शाळा, रुग्णालये आणि पिण्याच्या पाण्याचे स्रोत यांच्या जवळपासही फिरकू दिले जात नसे. हिंदूंनी या पददलित जातींना आध्यात्मिक आणि सामाजिक क्षेत्रांत बरोबरीचा दर्जा द्यावा यासाठी गांधींनी १९३२ व १९३३ साली अनेकवार उपोषण केले व सवर्णांवर दबाव आणण्याचा प्रयत्न केला. गांधीजी त्यांना ‘अस्पृश्य’ म्हणण्याऐवजी ‘हरिजन’ (देवाची मुले) म्हणू लागले. दक्षिण व पूर्व भारतात केलेल्या दौऱ्यांत, धर्माच्या नावाखाली पाळली जाणारी ही असमानता सांभाळणे आणि लहान-मोठे भेदभाव करीत राहणे हे सवर्ण हिंदूंना शरम आणणारे आहे असे त्यांनी जाहीरपणे सांगितले. या अन्यायी चालीरीतींचा स्पष्ट व कठोर शब्दांत जाहीर धिक्कार करणे हे सनातनी म्हणवून घेणाऱ्या हिंदूंचे कर्तव्य असून त्यांनी सुधारकांशी सहकार्य करून धार्मिक परंपरांच्या नावाखाली होणाऱ्या अन्याय-उपेक्षांपासून हरिजनांचे संरक्षण करावे, यावरच त्यांचा रोख होता.

गांधींच्या या मोहिमेमुळे राजकीय व सामाजिक वर्तुळात खळबळ उडाली आणि त्याचे पडसाद साहित्यातही उमटले. मुल्कराज आनंद या लेखकाची ‘अनटचेबल’ ही इंग्रजीतील लहानशी पण भेदक कादंबरी अलीकडेच माझ्या वाचनात आली. १९३५ साली ती प्रथम प्रसिद्ध झाली. त्या कादंबरीतील मजकुरावर उठलेला गांधीविचारांचा आणि गांधींच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा स्पष्ट आहे. त्या कादंबरीतील गांधींचे अस्तित्व अध्याहृत आहे; कारण स्वत: गांधी त्यात दिसत नसले तरी त्यामधील इतर पात्रे गांधी विचारांच्या प्रभावाखाली आहेत, हे जाणवत राहते. व्हर्जिनिया वूल्फ या लेखिकेच्या ‘मिसेस दलोवे’ किंवा त्यानंतरच्या सॉल बेलो या लेखकाच्या ‘सीझ द डे’ या कादंबऱ्यांप्रमाणेच ‘अन्टचेबल’चे कथानक झाडूवाल्या समाजातील ‘बाखा’ नावाच्या एका १८ वर्षांच्या मुलाचे दिवसभराचे अनुभव आणि त्याला काढावे लागणारे कष्ट यांच्याभोवती गुंफलेले आहे.

त्या कादंबरीत बाखा या व्यक्तीचे चित्रण, त्याच्या कुटुंबाची परिस्थिती, बरोबरीच्या मुलांशी असलेले त्याचे संबंध, उच्चवर्णीय व मुस्लिम यांच्याशी होणारे त्याचे व्यवहार आणि या सर्वांना असलेली युरोपियन पार्श्वभूमी इत्यादी संदर्भात केलेले आहे. लष्करी तळ असलेल्या त्या गावातील त्याचे दैनंदिन व्यवहार चिवट जातिव्यवस्थेचे दर्शन घडवितात. त्याला भेटणारी प्रत्येक व्यक्ती (मग तो देवळातील भटजी असो, अगर हलवाई, दुकानदार, शिक्षक, सैनिक, बैलगाडी हाकणारा) त्याच्याकडे बापजाद्यांकडून वारसा म्हणून मिळालेल्या

गलिच्छ व्यवसायाचे प्रतीक म्हणूनच पाहत असते. बाखाला एक व्यक्ती म्हणून, माणूस म्हणून पाहण्याची किंवा समजावून घेण्याची मुभाच ते वातावरण देत नाही; त्याच्या या हक्काआड ते वातावरण सतत येताना दिसते.

पण याही परिस्थितीत बाखाची आशा संपलेली नाही. त्याने आपल्या मुक्तीचा मार्ग पोषाखाच्या माध्यमातून शोधलेला आहे. वेगळ्या प्रकारचे कपडे अंगावर घालून त्याला स्वत:ची प्रतिमा बदलायची आहे. अगदी लहानपणापासून त्याला ब्रिटिश सैनिकाचा वेष आणि त्याचा डौल याबद्दल विलक्षण आकर्षण आहे. बाजारात लाकडी फळ्यांच्या दुकानात शेंदरी-खाकी रंगांचे टाकून दिलेले किंवा लष्करी सैनिकांचे लिलावात काढलेले कपडे विक्रीसाठी ठेवलेले असत. बुचाच्या पोकळ लाकडाची हलकी सूर्यटोपी, डोळ्यांवर ओढता येईल अशा प्रकारची चोचीची टोपी आणि अँग्लो-इंडियन लोकांच्या वापरातल्या इतर विशेष वस्तूही तिथेच असत. त्या दुकानासमोरून तो झोकात पावले टाकत जात असे. त्या वस्तूंना स्पर्श करण्याची अनावर इच्छा त्याला होई. त्याच्या या असोशीचे वर्णन पुस्तकातील आधीच्या काही परिच्छेदांमध्ये आहे. 'मी साहेबासारखाच दिसणार आहे'- तो मनातल्या मनात स्वत:ला बजावून सांगत असे. 'मी त्यांच्यासारखाच चालणार... पण माझ्याकडे त्या वस्तू विकत घेण्यासाठी आज पैसे मात्र नाहीत...'

मुल्कराज आनंद यांनी त्यांच्या एका चरित्रलेखकाला सांगितले होते की, त्यांनी गांधींच्या आश्रमात काही आठवडे मुक्काम केला होता आणि तेव्हा 'अन्टचेबल'च्या कच्च्या खर्ड्यातील एक एक प्रकरण दरदिवशी ते गांधीजींना वाचून दाखवीत. त्यांच्या कथेतील पात्रे त्यांच्या परिस्थितीशी विसंगत अशी उच्च-शिष्टसंमत भाषा बोलतात, हे जाणवल्यामुळे गांधींनी आनंद यांना कान उघडे ठेवून देशभर फिरून ये आणि त्यानंतर कादंबरीचे पुनर्लेखन कर असा सल्ला दिला. या घटनेची नोंद गांधींच्या व्यक्तिगत सचिवांच्या नोंदीमध्ये किंवा त्यांच्या स्वत:च्या रोजनिशीमध्ये आढळली नाही, मात्र कादंबरी हृदयस्पर्शी झाली आहे एवढे खरे!

आधुनिक विचारांचा परामर्श घेतलेल्या आनंद यांना गांधीवादाच्या मर्यादा ठाऊक आहेत. अस्पृश्यता निर्मूलनाचा एक मार्ग, जुलूम करणाऱ्याची सदसद्विवेकबुद्धी जागी करणे हा आहे; तर दुसरा मार्ग- (जो खात्रीचा आणि जबर परिणाम घडवणारा आहे) पाश्चिमात्य किंवा आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर केलेले साखळी संडास (फ्लश टॉयलेटस्) बांधून त्यांचा प्रचार करणे हा आहे. कादंबरीच्या अखेरच्या पानांत अस्पृश्यतेच्या प्रश्नावर एका आधुनिक कवीने (ज्याला गांधींबद्दल आदर आहे, पण त्यांचे पूर्ण अनुयायित्व मंजूर नाही) सुचविलेला हा उपाय आहे.

'अन्टचेबल'मध्ये गांधींचे अस्तित्व जाणवण्याजोगे आहे, पण याच प्रश्नाशी झुंज घेणारे गांधींचे समकालीन असलेले तरुण राजकीय प्रतिस्पर्धी डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचा उल्लेखही या कादंबरीत नाही; तरीही आज २०१३ सालामध्ये आंबेडकरांचे प्रभावी व्यक्तिमत्त्व आणि त्याच प्रश्नावर गांधीजींबरोबर झालेला त्यांचा संघर्ष यांची नोंद घेणे आवश्यकच आहे.

१९३० व १९४० च्या दशकात आंबेडकरांनी गांधींबरोबर त्वेषाने आणि उग्रपणाने या प्रश्नाबाबत वाद घातला. सनातनी जातिव्यवस्थेवरील गांधींची टीका अत्यंत मवाळ आहे असे त्यांना वाटत होते. भारतीय खेड्यांचा गांधींनी केलेला गौरव आंबेडकरांनी खेड्यांना 'विषमतेच्या गुहा' असे संबोधून निकालात काढला. सवर्ण हिंदूंपैकी बहुतेकांना सदसद्विवेकबुद्धी मुळातच नाही; म्हणून आपले हक्क मिळवण्यासाठी अस्पृश्यांना संघटितपणे संघर्ष करावा लागेल असे त्यांनी आवर्जून सांगितले. अस्पृश्यतेचा त्याग करून त्या पापातून मुक्त होऊन हिंदू धर्माने पवित्र व्हावे असे गांधींना वाटत होते तेव्हा सामाजिक उच्चनीचता किंवा पक्षपात हाच हिंदू तत्त्वज्ञानाचा गाभा आहे असे आंबेडकर म्हणत होते. हिंदू धर्म सोडून दुसऱ्या (समतेचा पाया असलेल्या) धर्माचा स्वीकार व त्याचबरोबर शहरीकरण आणि औद्योगिकीकरण यांना गती देण्यासाठी दबाव हा आंबेडकर व त्यांचे अनुयायी यांना परिणामकारक उपाय वाटत होता. त्यामुळेच खेड्यांबाहेर पडून आधुनिक आणि दर्जाने समान अशा व्यवसायांचा पाठपुरावा अस्पृश्यांना करता येईल अशी खात्री आंबेडकरांना वाटत होती.

'अन्टचेबल'च्या लेखन काळात (१९३५) मुल्कराज आनंद यांना आंबेडकरांची विशेष माहिती होती असे वाटत नाही, पण नंतरच्या काळात मात्र त्यांनी वेळोवेळी आंबेडकरांच्या कार्याबद्दल गौरवोद्गार काढले आहेत. १९५० च्या दशकाच्या पूर्वार्धात मुंबईत आनंद आंबेडकरांना भेटले होते. त्यानंतर बऱ्याच वर्षांनी म्हणजे १९८० मध्ये आंबेडकरांच्या 'ॲनिहिलेशन ऑफ कास्ट्स्' या ग्रंथाच्या नवीन आवृत्तीला त्यांनी प्रस्तावना लिहिली. जातिनिर्मूलनावरील आंबेडकरांचा हा ग्रंथ प्रथम १९३६ साली प्रसिद्ध झाला, ज्यामध्ये आंबेडकरांनी हिंदू धर्मावर आणि त्यातील रूढींवर जहरी टीका केली आहे.

डॉ.आंबेडकर यांचा हा टीकाग्रंथ प्रकाशित होण्यापूर्वी एक वर्ष आधी आनंद यांची कादंबरी प्रसिद्ध झाली होती. त्या कादंबरीत आंबेडकरांच्या पुस्तकातील काही सूत्रांची झलक होती आणि कदाचित पुढील आयुष्यात आंबेडकरांनी ज्या प्रकारचे राजकारण केले त्याची चाहूलही होती. आंबेडकरांना त्यांच्या आयुष्यात, त्यांच्या कार्यामध्ये गांधींच्या मागेच राहावे लागले. कारण गांधी केवळ 'राष्ट्रपिता'च नव्हते तर बहुसंख्य हरिजन त्यांच्या समाजातील नेत्यांचे नेतृत्व नाकारून गांधींच्या मागे जात होते. गांधींचे निर्वाण १९४८ साली झाले आणि आंबेडकर १९५६ साली निवर्तले, पण दोघांमधील स्पर्धा पुढेही कायम राहिली. त्यानंतर आंबेडकरांच्या अनुयायांमध्ये दर वर्षी सतत भर पडत राहिली, त्यांनी नंतर 'हरिजन' या शब्दाचा त्याग करून आंबेडकरांनी पुरस्कारलेल्या 'दलित' या

उपाधीचा स्वीकार केला. या शब्दाचा अर्थ 'दडपलेला' किंवा 'शोषित' असा आहे. त्यानंतरच्या काळात भारतातील बहुतेक सर्व दलितांनी 'उच्चवर्णीय सुधारक' असा शिक्का गांधींवर मारून त्यांना दूर सारले; त्याचबरोबर आंबेडकरांना आपले श्रेष्ठ मुक्तिदाते ठरवून त्यांचे विचार आणि आचार यांचा स्वत:ची अस्मिता दृढ करण्याचा पर्यायी मार्ग म्हणून स्वीकार केला.

गांधींच्या छायाचित्रात त्यांनी अंगावर फक्त पंचासारखे आखूड धोतर घातलेले दिसते. आंबेडकरांचे छायाचित्र मात्र पाश्चात्त्य पेहरावात असते व अनुयायांनाही त्यांचा अभिमान वाटतो. उच्चवर्णीय गांधींनी पेहरलेला पंचा त्यांच्या त्यागमय जीवनाचे प्रतीक ठरला. पण आंबेडकरांनी तो वेष स्वीकारला असता तर त्यांच्याकडे कोणाचे लक्षही गेले नसते, कारण रूढी व परंपरांनुसार त्यांना व त्यांच्या जातीतील लोकांना अत्यल्प वस्त्रांत वावरण्याचीच सामाजिक परवानगी होती, त्यामुळे आंबेडकरांचे पाश्चात्त्य पेहरावात वावरणे हा उच्चवर्णीयांच्या गर्विष्ठपणाला मिळालेला जोरदार तडाखाच होता. जन्म, जात यांची पूर्ण प्रतिकूलता असतानाही आंबेडकरांनी स्वत:ला एक यशस्वी कायदेपंडित आणि अर्थतज्ज्ञ म्हणून सिद्ध केले. भारतीय संविधानाचा त्यांनी केलेला मसुदा ही त्यांची देशाला आणखी एक देणगी. या सर्व गोष्टी विस्मित करणाऱ्या आहेत, तशाच पाश्चात्त्य पेहरावामुळे त्यांना मिळालेल्या धाडसी आत्मविश्वासाचे प्रतीक आहेत.

आनंद यांनी लिहिलेली 'अनटचेबल' ही कादंबरी आजही भारतीयांशी संवाद साधत आहे. २०१२ सालच्या ऑक्टोबर महिन्यात ग्रामीण विकास खात्याचे केंद्रीय मंत्री जयराम रमेश यांनी दिलेल्या माहितीनुसार, देशात फक्त ४० टक्के नागरिकांना आधुनिक शौचालयाची सोय उपलब्ध आहे. बाकी लोकसंख्या उघड्यावरच नैसर्गिक विधी उरकते आणि बाखासारखे सफाई कामगार ती घाण उचलून टाकतात. शौचालयांची सोय हा प्रश्न सामाजिक आणि पर्यावरणविषयक दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे असे सांगून रमेश यांनी, 'शौचालये देवळांपेक्षाही महत्त्वाची आहेत', असे भाष्य केले. तुम्ही कितीही देवळे फिरलात तरी तुम्हांला मुक्ती मिळणार नाही, शौचालये आणि स्वच्छता याच गोष्टी भौतिक जीवनात महत्त्वाच्या आहेत म्हणून त्यांना अग्रक्रम द्या, असे त्यांनी जनतेला ठासून सांगितले आहे.

जयराम रमेश यांच्या या विधानाने सनातन हिंदू प्रक्षुब्ध झाले आणि दगडांचा मारा करावा त्याप्रमाणे त्यांच्यावर प्रश्नांचा आणि आरोपांचा भडिमार केला. बहुसंख्य भारतीयांच्या धार्मिक भावनांना खोलवर दुखापत केल्याचा आरोप रमेश यांच्यावर केला गेला. पण ज्यांनी गांधी व आंबेडकर यांचे साहित्य वाचले आहे (या संबंधित मंत्र्यानेही ते निश्चितपणे वाचले असणारच) त्यांना हे जाणवले आहे की, अलीकडील वर्षांत आर्थिक प्रगतीचा वेग वाढलेला असतानाही, नियमितपणे सार्वत्रिक निवडणुका घेतल्या जात



असतानाही आणि राज्यघटनेने सर्वांना समान नागरिकत्वाचे आश्वासन दिलेले असतानाही, भारतात आजही अनेक क्षेत्रांत विषमता खोलवर रूजलेली आहे. अस्पृश्यतेला आव्हान दिले जाऊ शकते, पण ती नष्ट होत नाही. मैला वाहून नेणारे भंगी, झाडूवाले, न्हावी, धोबी, चामड्याचे काम करणारे या सर्वांवर अस्पृश्यतेचा अदृश्य टिळा आहे आणि त्यांना सर्व देशभर भेदभावांना, विषमतेला सामोरे जावे लागते आहे. त्यांच्या सामाजिक स्तरावरील हलक्या व्यवसायामुळे त्यांना मुक्तीचे द्वार दाखवणाऱ्या शाळा, महाविद्यालये, कारखाने किंवा लहान-मोठी कार्यालये इ. संस्थांमध्ये प्रवेश क्वचितच मिळतो.

कोणत्याही कलाकृतीचा आदर तिला विशेषणे चिकटवून करता येत नाही, पण मुल्क राज आनंद यांच्या 'अन्टचेबल'बद्दल बोलताना मात्र 'गांधीवादी' आणि 'आंबेडकरवादी' अशी दोन्ही विशेषणे त्यांच्या या साहित्यकृतीला लावावी लागतील. तिला अभिजात कलाकृती एवढ्याचसाठी म्हणायचे की, ती आजही समकालीन आहे; कारण गांधी आणि आंबेडकर यांनी सुरू केलेला संघर्ष आजही संपलेला नाही.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

रामचंद्र गुहा

# प्रधानमंत्री कोण होणार?



**पंतप्रधानपदासाठी बीजेपीचे मोदी हे ज्याप्रमाणे एकमेव उमेदवार नाहीत; त्याप्रमाणे काँग्रेसचेही राहुल गांधी हे एकमेव उमेदवार नाहीत. कदाचित अशीही शक्यता संभवते की काँग्रेस किंवा बीजेपी यांच्यापैकी कोणालाच सरकार बनवण्यासाठी आवश्यक तेवढ्या जागा मिळणार नाहीत आणि मग देवेगौडा किंवा व्ही.पी.सिंग यांच्यासारखा आघाडी सरकारचा कोणीतरी वर्ष उमेदवार दोन वर्षांसाठी पंतप्रधान होऊन कारभार चालवू पाहील. त्यानंतर मध्यावधी निवडणुका अटळ असतील. दरम्यानच्या काळासाठी असेल कदाचित, पण मायावतींनी आताच पंतप्रधानपदासाठी आपली उमेदवारी जाहीर केली आहे. आणि मग अशा परिस्थितीत जयललितांनी तरी मागे का रहावे?**

मागील काही आठवड्यांत जवळजवळ प्रत्येक दूरचित्रवृत्तवाहिनीवर, त्याचप्रमाणे मासिक वार्तापत्रांतून, आगामी सार्वत्रिक निवडणुकांतून भारताच्या पंतप्रधानपदी कोणाची निवड होऊ शकेल; होणे योग्य ठरेल आणि कोणाची निवड व्हावी याबद्दल चर्चा आणि परिसंवाद चालू आहेत. बहुतेक ठिकाणी नरेंद्र मोदी विरुद्ध राहुल गांधी असेच रूप या चर्चेला आले असून घेण्यात आलेल्या मतदान चाचण्यांमध्ये इंग्रजीप्रेमी मध्यम वर्गाला त्या क्षितिजावर नरेंद्र मोदींचा उगम निश्चित आहे अशी खात्री वाटते आहे.

भारतातील सार्वत्रिक निवडणुका या अमेरिकेतील अध्यक्षीय निवडणूक पद्धतीच्या प्रभावाखाली आहेत असेच एकूण वातावरण आहे. देशातील राजकीय पक्ष, त्यांचे कार्यक्रम आणि सत्तेमध्ये येण्यासाठी त्यांनी केलेले राजकीय समझौते व आघाड्या यांचा विचार करण्याऐवजी या सर्व चर्चांतून एखाद्या विशिष्ट आणि त्यातल्या त्यात लोकप्रिय नेत्यावर लक्ष केंद्रित करून या निवडणुकांचा विचार केला जात आहे. यात नवलाची गोष्ट म्हणजे राहुल गांधी आणि नरेंद्र मोदी ह्या दोघांचेही प्रशंसक त्यांची तुलना अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष ओबामा यांच्याशी करताना दिसतात. राहुल गांधींचे जयपूर शिबिरातील भाषण काँग्रेसजनांना ओबामांच्या पहिल्या (निवडणूकपूर्व) भाषणासारखे वाटले. राहुल गांधींचा तो 'ओबामा' क्षण त्यांनी कौतुकाने झेलला; तर नरेंद्र मोदींच्या भाषणातून ओसंडणारा 'आर्थिक आशावाद' त्यांच्या पाठीराख्यांना थेट ओबामांसारखाच वाटला.

खरे तर, तुलनेचा हा प्रयत्न राहुल गांधी आणि नरेंद्र मोदी या दोघांच्याही संदर्भात अस्थानी आहे. राहुल गांधी यांची राजकीय व सामाजिक पार्श्वभूमी आणि वारसा ओबामांपेक्षा फारच वेगळा आहे. ओबामांनी अक्षरश: शून्यातून त्यांचे आजचे स्थान प्रचंड कष्टाने मिळवले आहे. मोदींचे ध्येय धोरण आणि व्यक्तिगत शैली सांप्रदायिक आणि भेदाभेद मानणारी आहे; त्यांचा कैवार घेणारी आहे. ती ओबामांच्या सर्वसमावेशक, आवश्यक तडजोडींचे धैर्य बाळगणारी आणि समन्वयवादी शैलीच्या सर्वस्वी विरोधी अशी आहे. शिवाय आपल्याकडील मंत्रिमंडळ कार्यपद्धती (कॅबिनेट सिस्टीम) ही अमेरिकन प्रशासन पद्धतीपेक्षा खूपच वेगळी आहे. ती सर्वांच्या सहकार्यावर आधारलेली असून तिचा तज्ज्ञता आणि कौशल्य यांच्यावर विशेष भर नाही. शेवटचा मुद्दा असा की, ओबामांकडे प्रखर बुद्धिमत्ता आणि खुबीदार वक्तृत्व असूनही ते एक 'सुमार' अध्यक्षच समजले जातात. आमच्या देशाचे नेते 'प्रति ओबामा' असावेत ही आमच्या मनातील सुप्त इच्छा आमची अगतिकता आणि सांस्कृतिक न्यूनगंड यांचेच प्रतीक आहे.

भारताच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या इतिहासात पक्षाचा चेहरा म्हणून एका व्यक्तीचाच पुरस्कार करणे ही गोष्ट आता प्रथमच घडताना दिसते आहे असे नाही, १९५२, १९५७ आणि १९६२ या पहिल्या तीनही सार्वत्रिक निवडणुकांत काँग्रेसला मत म्हणजे पंडित नेहरूंना मत हीच मतदारांची धारणा होती. जवाहरलाल नेहरू, हाच त्या पक्षाचा हुकमी एक्का होता; प्रमुख प्रचारविषय आणि कोणाच्याही गळी उतरवता येण्यासारखा मुद्दा होता. त्याचबरोबर काँग्रेसला सैद्धांतिक दिग्दर्शन करणारा आदर्श ही नेहरूंचीही भूमिका होती. १९५२ साली निवडणूक प्रचार कालावधीत नेहरूंनी २५,००० मैल प्रवास केला. त्यापैकी १८००० मैल विमानाने, ५२०० मैल मोटरने, १६०० मैल रेल्वेने ते फिरले. इतकेच काय, पण प्रचारासाठी





बोटीनेही ९० मैल प्रवास त्यांनी केला. जवळजवळ तीनशे प्रचारसभा नेहरूंनी त्या वेळी गाजवल्या. त्यांच्या या दौऱ्यांचे वर्णन करताना काँग्रेस पक्षाच्या एका प्रवक्त्याने असे उद्‌गार काढले की, त्यांच्या प्रचारदौऱ्यांत समुद्रगुप्त आणि अशोक या सम्राटांच्या मोहिमा आणि फा हियान या ह्युएनसांग यांचा प्रवास यांचा मनोज्ञ संगम झाला होता.

पहिल्या काही निवडणुकांच्या काळात विरोधी पक्षांकडे नेहरूंच्या करिश्म्याचा किंवा लोकप्रियतेचा उमेदवारच नव्हता. नेहरूंच्या निधनानंतर १९६७ साली झालेल्या पहिल्या सार्वत्रिक निवडणुकांत त्या वेळच्या पंतप्रधान इंदिरा गांधी यांना स्वत:बद्दल खात्री वाटत नव्हती. कारण त्यांच्याबद्दल जनतेमध्ये उत्साह नव्हता. तरीही केंद्रामध्ये काँग्रेस निवडून आली, पण तिचे संख्याधिक्य बरेच घटले होते. या परिस्थितीत विरोधी पक्षांना संजीवनी मिळाली आणि पुढील निवडणुकांसाठी जोरदार तयारी सुरू करून त्यांनी सत्तेवरील काँग्रेसला असणारा विरोध अधिक सुसंघटित करण्याची योजना आखली. १९७१ साली पुढील निवडणुकांना सामोरे जाताना जनसंघ, स्वतंत्र पार्टी, समाजवाद्यांतील काही गट आणि अनेक प्रादेशिक पक्ष यांनी एकत्र येऊन काँग्रेसच्या पराभवासाठी 'बडी आघाडी'ची (ग्रॅण्ड अलायन्स) बांधणी केली. या बड्या आघाडीने स्वत:च्या अस्तित्वाचा उद्देश आणि आघाडीचे पुढील कार्य 'इंदिरा हटाव' या घोषणेद्वारे जनतेसमोर ठेवले.

पं.नेहरूंच्या काळाप्रमाणे याही निवडणुकीला अध्यक्षीय निवडणुकीचा बाज आला. फरक एवढाच की मतदारांसमोर, निवडून देण्यासाठी नव्हे तर पराभव करण्यासाठी इंदिरा गांधी या उमेदवार होत्या. इंदिरा गांधींनी चलाखीने बड्या आघाडीच्या घोषणेला 'गरिबी हटाव' या घोषणेचा पर्याय जनतेसमोर ठेवला. त्यांच्या विरोधकांचे उद्दिष्ट 'इंदिरा हटाव' – त्यांना सत्तेवरून दूर करणे एवढेच होते; पण इंदिरा गांधींनी त्यापुढे जाऊन विरोधकांना दूर सारत अधिक मोठे व भव्य उद्दिष्ट देशातील जनतेसमोर ठेवले ते देशातील दारिद्र्य दूर करण्याचे.

राजकीय वादविवाद व्यक्तिनिरपेक्ष बनविण्याच्या इंदिरा गांधींच्या डावपेचांना नेत्रदीपक यश लाभले. १९७१ सालच्या निवडणुका काँग्रेसने मोठ्या मताधिक्याने जिंकल्या. आता इंदिरा गांधी या निवडणुकांचा पुन्हा केंद्रबिंदू बनल्या. पण नंतर थोड्याच काळात आणीबाणी देशभर लागू झाली आणि त्या कालखंडात 'इंदिरा इज इंडिया, इंडिया इज इंदिरा' ही नवी घोषणा काँग्रेसजनांनी पुढे आणली. १९७७ सालच्या निवडणुका इंदिरा गांधींनी सत्तेत राहावे की नाही, याच एका प्रश्नासाठी लढविल्या गेल्या. पण १९७१ सालातील वारे या वेळी फिरले होते आणि त्या निवडणुकांत इंदिरा गांधींना अपमानास्पद पराभव सोसावा लागला. आणीबाणीत राबवलेल्या आक्रमक कुटुंबनियोजन मोहिमेमुळे आणि सक्तीच्या निर्बीजीकरण शस्त्रक्रियांमुळे काँग्रेस आणि इंदिरा गांधी यांच्याबद्दल जनमतामध्ये विशेषत: उत्तरेकडील राज्यांत तीव्र असंतोष होता. पण हा विजय विरोधकांना पचवता आला नाही. बड्या आघाडीमधील पक्षोपपक्षांत असलेल्या मतभेदांनी लवकरच उग्र रूप धारण केले. त्याचाच परिणाम बडी आघाडीला सुरुंग लावण्यात झाला आणि त्यातील घटक पक्ष वेगवेगळे झाले. केंद्र सरकार कोसळल्यामुळे

मध्यावधी निवडुका अटळ ठरल्या. १९८० मध्ये झालेल्या या निवडणुकांत 'स्थैर्य विरुद्ध अराजक' या मुद्‌द्यावर इंदिरा गांधी यशस्वी झाल्या. स्थैर्याचा आवाज म्हणून देशाने त्यांना स्वीकारले होते.

१९७७ साली आणि १९८९ मध्ये (जेव्हा राजीव गांधी भारताचे प्रधानमंत्री होण्यास लायक आहेत का, हा प्रश्न उपस्थित झाला) काँग्रेसचा पराभव झाल्यानंतर विरोधी पक्षांच्या आघाडीने पंतप्रधानपदासाठी योग्य उमेदवाराचा शोध घेण्यास सुरुवात केली, पण १९९६ च्या निवडणुकांपूर्वी एच.डी.देवेगौडांची पंतप्रधान म्हणून नियुक्ती होईल असे कोणाला तरी वाटले होते काय? अगदी बी.जे.पी. (भारतीय जनता पक्ष)च्या संदर्भातसुद्धा अयोध्या चळवळींपासून ते केंद्रामध्ये सत्ता मिळेपर्यंतच्या काळात संकल्पित प्रधानमंत्री म्हणून अटलबिहारी वाजपेयी यांचे नाव कोणीही घेत नव्हते. पक्षामध्ये आणि पक्षाबाहेरसुद्धा लालकृष्ण अडवाणी आणि मुरली मनोहर जोशी यांच्याच नावाचा गवगवा अधिक होता.

१९९० च्या दशकाच्या उत्तरार्धात हे हळूहळू स्पष्ट होत गेले की, अटलबिहारी वाजपेयी हेच पंतप्रधानपदाचे उचित उमेदवार ठरू शकतात. 'अब की बारी अटलबिहारी' ही घोषणा मग राजकीय वातावरणात घुमू लागली. १९९९ साली आणि २००४ मध्ये अशा दोनही वेळेला जर बी.जे.पी. विजयी झाली तर सरकार चालविण्यासाठी सक्षम पंतप्रधान म्हणून अटलबिहारींचे नाव सतत पुढे होते. काँग्रेस अध्यक्षा सोनिया गांधी यांच्याकडे वाजपेयी यांचा राजकारणातील अनुभव आणि प्रतिष्ठा दोन्ही नव्हत्या. 'काँग्रेसका हाथ, आम आदमी के साथ' या घोषणेसहित सोनिया गांधींनी काँग्रेसची प्रचारमोहीम सांभाळावी असेच काँग्रेसनेत्यांनी ठरविले होते.

सार्वत्रिक निवडणुकांचा एकूण इतिहास पाहिला तर आपल्याला असे दिसते की, आज दूरदर्शनवर बातम्यांमधून दिसणारा भावनोन्माद आणि अतिनाट्य (मेलोड्रामा) सुरुवातीला दूरदर्शन नसल्यामुळे अनुभवायला मिळाले नसले तरी, वेळोवेळी मतदारांना पक्षाच्या भावी कार्यक्रमाबरोबरच विशिष्ट व्यक्तींना निवडून देण्याचे आवाहनही होत असे. (आकाशवाणी, वृत्तपत्रे आणि जाहीर सभा या माध्यमांतून ते केले जाई.) पण या वेळेस जनतेसमोर दोन पक्षांचे दोन उमेदवार पंतप्रधानपदासाठी उभे आहेत आणि जनतेने आपला पर्याय त्यातून निवडायचा आहे. नेहरू आणि इंदिरा गांधी यांच्या काळात भारतीय राजकारणात दुसरे प्रबळ नेतृत्वच देशात नव्हते. त्यांच्याशी टक्कर देईल असा नेता दुसऱ्या कोणत्याही पक्षाकडे नव्हता. त्यामुळे पंतप्रधानपदासाठी पर्याय नव्हता. जेव्हा १९९८, १९९९ आणि २००४ च्या निवडणुकांत बीजेपीतर्फे श्री.वाजपेयी यांचे नाव पंतप्रधानपदाचे उमेदवार म्हणून पुढे केले गेले तेव्हा काँग्रेसकडे त्या उमेदवारीसाठी निश्चित नावच नव्हते.

पुढील निवडणूक 'मोदी विरुद्ध राहुल' अशा चौकटीत पाहायची असल्यामुळे ती नावीन्यपूर्ण दिसणार आहे. पण माध्यमांतून रंगवला जाणारा हा सामना देशातील कठीण राजकीय वास्तव जनतेपुढे कसे आणणार? प्रत्यक्षात मोदींचे नाव पक्षातून पंतप्रधानपदासाठीचे उमेदवार म्हणून अधिकृतपणे अद्यापही जाहीर झालेले नाही. बीजेपीमध्ये काही मुख्यमंत्री असेही आहेत की त्यांनी अनेक वेळा निवडणूक जिंकली आहे; आणि कार्यक्षमतेने कारभार केला आहे. त्यांचे आव्हान मोदींसमोर उभे राहू शकेल. त्याचप्रमाणे दिल्लीमधील बीजेपीचे अनेक नेते मोदींपेक्षा अधिक उदारमतवादी (कमी जातीयवादी) आणि कमी स्वयंकेंद्रित आहेत किंवा तशी त्यांची प्रतिमा आहे. मोदींच्या पंतप्रधानपदाच्या स्वप्नाआड येण्याची त्यांचीही क्षमता काही कमी नाही.

या सामन्याची दुसरी बाजू अशी की जर काँग्रेस परत सत्तेवर येऊ शकली, तर राहुल गांधी– त्यांच्या आईप्रमाणेच पंतप्रधानपदास नकारही देतील. देशातील त्या सर्वोच्च अधिकारपदाबाबतची मोदींची महात्त्वाकांक्षा आता सर्वांना (चांगलीच) ठाऊक झालेली आहे. राहुल गांधींनी आतापर्यंत केंद्रीय मंत्रिमंडळात येण्यासही नकार दिलेला आहे.

पंतप्रधानपदासाठी बीजेपीचे मोदी हे ज्याप्रमाणे एकमेव उमेदवार नाहीत; त्याप्रमाणे काँग्रेसचेही राहुल गांधी हे एकमेव उमेदवार नाहीत. कदाचित अशीही शक्यता संभवते की काँग्रेस किंवा बीजेपी यांच्यापैकी कोणालाच सरकार बनवण्यासाठी आवश्यक तेवढ्या जागा मिळणार नाहीत आणि मग देवेगौडा किंवा व्ही.पी.सिंग यांच्यासारखा आघाडी सरकारचा कोणीतरी वर्ष उमेदवार दोन वर्षांसाठी पंतप्रधान होऊन कारभार चालवू पाहील. त्यानंतर मध्यावधी निवडणुका अटळ असतील. दरम्यानच्या काळासाठी असेल कदाचित, पण मायावतींनी आताच पंतप्रधानपदासाठी आपली उमेदवारी जाहीर केली आहे. आणि मग अशा परिस्थितीत जयललितांनी तरी मागे का रहावे? त्यांनाही या पदाची चव घ्यावीशी वाटत असणारच! तमिळ आणि कन्नडिग यांच्यामधील भांडण व स्पर्धा पुरातन आहेत. कावेरीच्या पाण्याच्या वादात सर्वोच्च न्यायालयाकडून तमिळांना झुकते माप मिळाले असूनही पंतप्रधानपदाच्या शर्यतीत ते कन्नडिगांच्या मागे पडले आहेत. आता जर या पदासाठीची नरेंद्र मोदी आणि राहुल गांधी यांच्यातील स्पर्धा अनिश्चिततेमुळे फिकी वाटू लागली, तर मग माध्यमांना– आणि आपल्यालाही– आपले लक्ष मायावती विरुद्ध जयललिता या स्पर्धेकडे वळवावे लागेल.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

रामचंद्र गुहा

# सेहवागच्या गोष्टी



**द्रविड किंवा लक्ष्मण यांच्याप्रमाणे सेहवागने अद्याप निवृत्तीची अधिकृत घोषणा केलेली नाही, पण त्याला कसोटी संघातून वगळले गेले आहे, हे पाऊल या दृष्टीने निर्णायक ठरावे. त्याचे वय, आणि फलंदाजीसाठी आवश्यक असलेली तीव्र नजर आणि सहज प्रतिसाद देणाऱ्या हालचाली यांचा विचार करता सेहवागच्या कारकिर्दीचा शेवट अपेक्षेप्रमाणे होत असलेलाच आपण पाहत आहोत. म्हणूनच बीजिंगहून निघालेल्या 'एअर चायना'मध्ये बसून भारतात परतताना मी रात्रभर जागून सेहवागचे सर्व क्रीडाचरित्र आठवत होतो.**
**दिल्ली विमानतळावर पहाटे दीड वाजता उतरून माझ्या हॉटेलकडे टॅक्सीने जात असताना माझ्या मनात आले की मी सेहवागचा विचार आणि आठवण तर खूपच केली, आता मला त्याच्याबद्दल कोणाशी तरी बोलायचे आहे.**

भारतीय संघातून वीरेंद्र सेहवागला वगळण्यात आल्याची बातमी मला कळली तेव्हा मी दक्षिण चीनमध्ये होतो, पण जनतेच्या 'प्रजासत्ताकात' क्रिकेट ही फार बोलण्याइतकी महत्त्वाची गोष्ट नसल्यामुळे त्याचा काही विशेष परिणाम माझ्यावर झाला नाही. त्यानंतर एका आठवड्याने चीनहून परत येताना विमानात बिस्मिल्लाखानांच्या सनईचे सूर कानी पडले. त्याचबरोबर मनात असंख्य आठवणींचे मोहोळही उठले. त्या सुरांचा प्रवास नंद केदार, श्याम कल्याण, यमन, दुर्गा यांसारख्या मोहक सुरावटींतून चालू असतानाही माझ्या मनात मात्र नजाफगडच्या त्या कलंदर पण असामान्य, ईश्वरदत्त देणगी लाभलेल्या खेळाडूचेच विचार घोळत होते. त्याचे चालणे, त्याची वर्तणूक, त्याच्या डोक्यावरचा रंगीत रुमाल आणि वेळोवेळी जाणवणाऱ्या त्याच्या खेळातील अनाकलनीय फटकेबाजी आणि तिचा पसारा! त्याचा पाहिलेला प्रत्येक खेळ माझ्या पंचावन्न वर्षांच्या देहातील मनाला झेपेल इतक्या वेळा मी मनातल्या मनात तपशीलवार अनेक वेळा खेळून पाहिला आहे.

बिस्मिल्ला खानांच्या सनईच्या सुरांनी मला सेहवागची आठवण करून द्यावी हा केवळ योगायोग नव्हता. आधुनिक जगातल्या पाच अद्‌भुत तंतुवाद्य वादकांपैकी ते एक आहेत. आणि त्यांचे एकूण चरित्र आमच्या या 'ओपनिंग बॅटस्मन'च्या जवळचे! इतरांपेक्षा अधिक जवळिकीचे. निखिल बॅनर्जी हे वादक शांत आणि सौम्य स्वभावाचे, स्वत:विषयी कमी बोलणारे. विलायतखांची शैली टोकदार व गुंतागुंतीची. रविशंकर एककेंद्री आणि महत्त्वाकांक्षी तर अली अकबर खान गूढ आणि गोंधळात टाकणारे सुद्धा! फक्त बिस्मिल्लांची आनंदी आणि निर्मळ शैलीच सेहवागची बरोबरी करू शकते.

माझ्या भोवताली पसरणारे सनईचे सूर मला पुन्हा पुन्हा सेहवागकडे नेत होते. कसलेल्या इतिहासकाराप्रमाणे मी त्याच्या मुळापाशी जाऊन आठवायला सुरुवात केली. सेहवागला मी प्रथम पाहिले ते २००१ साली (कोलकत्त्याच्या गाजलेल्या कसोटी सामन्यानंतर) बंगलोरला झालेल्या ऑस्ट्रेलिया विरुद्धच्या एकदिवशीय सामन्यात. त्या वेळी ऑफ स्पिन गोलंदाजी करणारा अष्टपैलू खेळाडू म्हणून त्याची प्रसिद्धी झालेली होती; त्यामुळेच कदाचित फलंदाजी करण्यासाठी त्याचा क्रम खाली होता... त्या सामन्यात एस.एफ.बार्नेस बोलिंगसाठी सेहवाग समोर उभा होता. दोन-तीन चेंडूंना टोलवल्यानंतर बार्नेसने टाकलेल्या चेंडूला विकेटपुढे जाऊन (मी आणि माझा मुलगा ज्या स्टॅंडमध्ये बसून तो सामना पाहात होतो, त्या दिशेने) सेहवागने जो फटका मारला ती त्याच्या पुढील सर्व खेळाची नांदी होती. सामन्याचा कल, बॉलरचा दबदबा इत्यादी कोणत्याही गोष्टीची पर्वा न करता सेहवाग बेधडकपणे खेळत राहणार याची ती चुणूक होती. वॉर्न किंवा मुरली, पोलॉक अगर मॅकग्रा- या सर्वांसमोर सेहवाग असाच खेळला. त्या सामन्यात त्याने अर्धशतक झळकावले, तीन गडी बाद केले आणि भारताला विजय मिळवून दिला.

नंतर त्याच वर्षी मी सेहवागला इंग्लंडविरुद्ध कसोटी सामना खेळताना पाहिले. स्कोअर बोर्ड सांगत होता की, त्याने केलेल्या ६६ धावांत १३ चौकार आहेत. मला खात्री आहे त्यात त्याने मिडविकेटवरून पॉइंटच्या दिशेने मारलेले शैलीदार व प्रेक्षणीय फटके असणार.

या सामन्यात त्याचा पहिला चौकार खूप लवकर झाला, तो डोळे दिपवणारा होता हे मला आजही आठवते. खेळपट्टीच्या दुसऱ्या टोकाला सचिन तेंडुलकर उभा होता. सहजपणे पन्नास

धावा काढल्यावर सचिनला ॲशले गाइल्सने विकेटवर बॉल टाकत रोखून धरले होते. दुसरीकडे सेहवागने चाणाक्षपणाने त्या लेफ्ट हँडरचा पहिलाच बॉल तसाच उलट दिशेने टोलवून त्या स्पिन बॉलवर चार धावा मिळवल्या. प्रेक्षकवर्ग त्यामुळे प्रभावित झाला, पण त्याचा साथीदार (सचिन) मात्र थोडा विचलित झालेला दिसला. कारण जेव्हा तो गाइल्सचा चेंडू फटकविण्यासाठी पुन्हा उभा राहिला तेव्हा विकेट सोडून त्याने अकारण पुढे आला आणि ९० धावांवर बाद झाला. त्याच्या कसोटी क्रिकेट कारकिर्दीत तो प्रथमच अशा पद्धतीने यष्टिचीत झाला होता.

२००२ च्या उन्हाळ्यात मी काही कामाकरता इंग्लंडमध्ये गेलो होतो. त्या वेळी लॉर्डस्‌वर चालू असलेल्या कसोटी सामन्याचा एक प्रेस पास एका मित्राने माझ्यासाठी मिळवला होता. दुसऱ्या दिवशी चहापानानंतर भारतीय संघ बॅटिंगसाठी उत्तरला तेव्हा इंग्लंडने पहिल्याच डावात ४८७ धावांचा डोंगर रचला होता. ओपनिंग बॅटस्‌मन म्हणून आलेल्या सेहवागने समोरच्या फास्ट बोलर्सच्या चेंडूंवर अतिशय देखणे फटके मारले. नंतर ॲशले गाइल्स बोलिंगला आल्यावर त्याचा चेंडू सेहवागने कव्हरमध्ये थेटपणे टोलवण्याची करामत दोन वेळा करून आठ जमा केल्या. ॲश्ले गाइल्सने उंची दिलेला चेंडू थेट विकेटच्या दिशेने टाकला. तो चेंडू ऑफ साईडला ड्राइव्ह करण्याच्या प्रयत्नात सेहवाग चकला आणि त्रिफळाबाद झाला.

सामना संपल्यावर मायकेल ॲथर्टनला मी मीडिया सेंटरच्या टी रूममध्ये भेटलो, तेव्हा तो सेहवागवर टीकात्मक बोलला होता. त्याने विकेट राखून खेळायला हवे होते, बेपर्वाइने खेळून त्याने सचिनला उघडे पाडायला नको होते असे तो म्हणाला. मला त्याचे म्हणणे पटले नाही. ८४ धावांची भर टाकून सेहवाग त्याच्या पद्धतीनुसार बाद झाला होता. पारंपरिक पद्धतीने खेळणाऱ्या मायकेल ॲथर्टनसारखे खेळणे त्याला जमण्यासारखे नव्हते; किंवा सुनील गावसकरसारखेसुद्धा.

यातूनच मला सेहवागची आणखी एक लांबलचक खेळी आठवली. मार्च २००५ मध्ये शेवटच्या आठवड्यात चेन्नईला एम. चिन्नास्वामी स्टेडियममध्ये पाकिस्तानबरोबरचा सामना. पाकिस्तानने प्रथम बॅटिंग घेऊन ५०० पेक्षा अधिक धावांचे आव्हान भारतासमोर ठेवले. दुसऱ्या दिवशी सामन्याची वेळ संपेपर्यंत दहा षटकांमध्ये भारताने ५५ धावा जमा केल्या. सेहवागचा अर्थातच त्यात सिंहाचा वाटा होता. सामन्याच्या तिसऱ्या दिवशी तडफेने आणि कौशल्यपूर्ण फटकेबाजी करून त्याने द्विशतक झळकवले. मोहमंद सामी ताशी ९० मैल या वेगाने गोलंदाजी करत होता, पण सेहवागने त्याला दोन वेळा पुढे सरसावून षटकार खेचले ते साइटस्क्रीनजवळ जाऊन पडले. अब्दुल रझ्झाकला पॉइंटच्या दिशेने दोन चौकार मारले. ऑफस्पिनर अर्शद खानला मिडविकेटवरून षटकार मारला. ती खेळी निर्दोष व कलात्मक होती, पण चहापानानंतर थोड्याच वेळात आटोपली. कनेरियाने त्याला स्वत:च्या गोलंदाजीवर झेलबाद केले.

मी त्यावेळी वृत्तपत्र कक्षात (प्रेस बॉक्स) बसून माझा मित्र क्रिकेट समीक्षक सुरेश मेननबरोबर सामना पाहात होतो. सेहवागने दुपारच्या सत्रात आपल्या तीस चौकारांपैकी एक फटकावल्यानंतर सुरेश माझ्याकडे वळून म्हणाला, ''राम, आता आपल्या 'ऑल टाइम इंडिया इलेव्हन'मधून मर्चंट किंवा गावसकर यांच्यापैकी एकाला जागा मोकळी करून द्यावीच लागेल.'' मी त्याची ही सूचना थोड्या नाराजीनेच मान्य केली. (एखाद्याच्या शालेय वयात जोपासलेल्या आवडीनिवडी आणि पूर्वग्रह आणि तेही क्रिकेटबद्दलचे– हालविणे फार कठीण!) पण कोणाला? या मुद्यावर मी आणि सुरेश चर्चा करीत असताना १९७० च्या दशकातील एक क्रिकेटपटू (अनामिक राहण्याच्या अटीवर) म्हणाला, 'जर वरच्या मजल्यावर कॉमेंट्री बॉक्समध्ये बसलेल्या सनीने ही तुमची चर्चा ऐकली असती तर, सेहवागने 'मिडल ऑर्डर'मध्ये राहून बॅटिंग करणे टीमच्या किती हिताचे आहे यावर एक कॉलम लिहायला सुरुवात केली असती! पण सेहवाग 'ओपनर'च राहिला. अठरा महिन्यांनंतर पाकिस्तानबरोबर लाहोरमधील सामन्यात सामन्याच्या चौथ्या दिवशी भारताची धावसंख्या बिनबाद ४०३ एवढी झाली होती. सेहवागने त्यात २४७ धावांची भागीदारी केली होती. त्याच्या साथीदाराबरोबर २:१ असे त्याच्या धावांचे प्रमाण होते. तेव्हा सिद्धार्थ वैद्यनाथन या पत्रकाराने 'क्रायसिन्फो' या पत्रात लिहिले, 'सेहवागने आपल्या ४६ चौकारांपैकी नऊ लेगसाईडला मारून 'ऑफसाईड मास्टरक्लास' समोर ठेवला. त्या सामन्यात त्याने कसोटी क्रिकेटच्या इतिहासातील दुसरे जलद द्विशतक पूर्ण केले.

'क्रायसिन्फो'ने क्रिकेटवर पूर्ण लक्ष केंद्रित केले होते; पण इतर पत्रकारांनी अन्य बातम्यांची कास धरली होती. त्यानंतरच्या पत्रकार परिषदेत भारतीय संघाच्या 'ओपनर्स'ना विचारण्यात आले की, विनू मंकड आणि पंकज रॉय जोडीने जमवलेल्या धावांपेक्षा केवळ दहा धावांनी मागे राहून 'रेकॉर्ड' मोडू शकला नाहीत याबद्दल काय वाटते? याला उत्तर देताना राहुल द्रविडने मंकडचा मोठेपणा आणि इतिहासाचे ओझे याबद्दल काहीतरी सांगितले, पण सेहवागला हा प्रश्न विचारल्यावर तो एकदम उद्‌गारला, 'ये मंकड/फंकड कौन?'

ते उत्तर बिनतारी प्रसारयंत्रणेद्वारे सर्वत्र पसरले– अगदी बंगलोरपर्यंत गेले. जेव्हा या 'ओपनर'च्या शेऱ्याबाबत माझी प्रतिक्रिया विचारली गेली तेव्हा मी पाय मोडल्यामुळे बिछान्यातच होतो. त्या उत्तेजित पत्रकाराला मी थोडे सबुरीने घेण्यास सांगितले. त्याने ऐकलेले सेहवागचे प्रश्नरूप उत्तर हे केवळ अज्ञान वा मूर्खपणा आहे असे न मानता, सेहवागच्या व्यक्तिमत्त्वाचा उत्स्फूर्त आणि मजेशीर असा खास आविष्कार या दृष्टीने पहावे असे मी त्याला सुचविले. डेल स्टेनचा छातीएवढा उंच बाऊन्सर डेलच्या पायाशी टोलवून राहुल स्पष्ट उत्तर देऊ शकतो, पण सेहवाग जर त्या ठिकाणी असेल, तर आपले सर्व शरीर मागे झुकवून स्लीपमध्ये चेंडू धाडून

चार धावांचा धनी होईल. सेहवाग विनू मन्कडना ओळखत असता तर तो भारताच्या वतीने खेळताना कधीच दिसला नसता.

एक बॅटस्मन म्हणून सेहवाग, त्याच्यासारखा तो एकच! पण त्याच्यासारखाच विठ्ठल हा एक बोलर आपल्याकडे होता; सेहवागचीच विशेष लक्षणे, गुणधर्म त्याच्यामध्ये होते. क्रिकेटियर म्हणून आणि व्यक्ती म्हणूनसुद्धा! त्याचा खेळ असाच उत्स्फूर्त असे. पारंपरिक आणि तांत्रिक गोष्टींपासून तो मुक्त असे. तोही त्याच्या क्षेत्रात असाच भटक्या आणि लहरी होता. त्याला अनुकूल विकेटवर अनेक बाजू अनुकूल असताना त्याच्या पदरात शून्यच पडे; तर कधी सपाट मार्गावर, सुरीने लोणी कापावे इतक्या सहजपणे विरोधी पक्षाला तो नामोहरम करी. विठ्ठल हा खेळाडूच सेहवागप्रमाणे स्वयंभू खेळाडू होता. त्याने देशात आणि परदेशांतही खेळलेल्या सामन्यांत भारताला विजयश्री मिळवून दिली. सेहवागप्रमाणेच तो सदाआनंदी, हसतमुख असे आणि रेकॉर्ड बुकमध्ये आपले नाव जाईल की नाही याची पर्वा न करता मुक्तपणे खेळत असे. या व्यक्तीला मी माझ्या कल्पनेतील 'इंडिया : ऑल टाइम्स इलेव्हन'मध्ये अतिशय सन्मानाची जागा देऊन आघाडीवर ठेवले आहे.




द्रविड किंवा लक्ष्मण यांच्याप्रमाणे सेहवागने अद्याप निवृत्तीची अधिकृत घोषणा केलेली नाही, पण त्याला कसोटी संघातून वगळले गेले आहे, हे पाऊल या दृष्टीने निर्णायक ठरावे. त्याचे वय, आणि फलंदाजीसाठी आवश्यक असलेली तीव्र नजर आणि सहज प्रतिसाद देणाऱ्या हालचाली यांचा विचार करता सेहवागच्या कारकिर्दीचा शेवट अपेक्षेप्रमाणे होत असलेलाच आपण पाहत आहोत. म्हणूनच बीजिंगहून निघालेल्या 'एअर चायना'मध्ये बसून भारतात परतताना मी रात्रभर जागून सेहवागचे सर्व क्रीडाचरित्र आठवत होतो.

दिल्ली विमानतळावर पहाटे दीड वाजता उतरून माझ्या हॉटेलकडे टॅक्सीने जात असताना माझ्या मनात आले की मी सेहवागचा विचार आणि आठवण तर खूपच केली, आता मला त्याच्याबद्दल कोणाशी तरी बोलायचे आहे. चर्चा करायची होती, पण माझ्या क्रिकेटप्रेमी मित्रांपैकी बोलण्यासाठी उपलब्ध होतेच कोण? सुरेश मेनन आणि मुकुल केशवन झोपलेले होते. टी.जी.वैद्यनाथन आणि सुजित मुखर्जी या दोघांनीही इहलोक कधीच सोडला आहे. मग मी अमेरिकेतल्या माझ्या मुलाला फोन केला. पृथ्वीच्या दुसऱ्या बाजूला असल्यामुळे तो जागा आणि सतर्कही होता. सेहवागचा खेळ आम्ही दोघांनीही एकत्र आणि वेगवेगळाही पाहिलेला होता. सेहवागने खेळलेले सामने व त्याच्याकडून अपेक्षित असलेला खेळ आणि पाहावेसे वाटणारे त्याचे सामने याबद्दल आम्ही दोघेही एकमेकांशी भरभरून बोललो. चर्चेत आमचे असे एकमत झाले की, सेहवागचा एकच उत्कृष्ट सामना निवडायचा झाला तर ऑक्टोबर २००४ मध्ये चेपॉकला झालेल्या सामन्याची नोंद घ्यावी लागेल. त्या सामन्यात अनिल कुंबळेने पहिल्याच दिवशी ऑस्ट्रेलियन खेळाडूंची दाणादाण उडवली होती. दोनही डावांत प्रत्येकी सात विकेटस् घेऊन त्याने ऑस्ट्रेलियन संघाला पराभवाची चव दाखविली होती. पहिल्या डावात दणकेबाज खेळ करून सेहवागने १५५ धावा नोंदवल्या होत्या. चौथ्या दिवशी खेळ संपला त्या वेळी भारत बिनबाद १९ धावांवर होता. त्यापैकी १२ धावा सेहवागने सलग तीन चौकार मारून केल्या होत्या आणि तो नाबाद राहिला होता. सामना पदरात पडण्यासाठी आणखी २२० धावा हव्या होत्या, पण रात्रभर पाऊस पडत राहिल्यामुळे दुसऱ्या दिवशी मैदानात एकही चेंडू पडला नाही.

हॉटेलच्या ड्राइव्ह वे मध्ये माझी टॅक्सी थांबली आणि मी त्या स्वप्नातून जणू भानावर आलो. मुलाबरोबरच्या चर्चेचा शेवट करताना बाप 'दादा माणूस' या भूमिकेतून मी त्याला म्हटले, 'आज दोन व्यक्तींबद्दल मला फार वाईट वाटते आहे. एक टी.जी.वैद्यनाथन आणि दुसरा तू!' त्याच्या 'का?' या प्रश्नाला मी दिलेले उत्तर त्याला अपेक्षित होते तरी त्याने ते मला शांतपणे बोलू दिले. 'टीजीव्ही सेहवागला त्याची बॅट मैदानात फिरवत असताना पाहू शकला नाही आणि तू बी.एस.चंद्रशेखरचे बोलिंग पाहू शकला नाहीस!'

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.

रामचंद्र गुहा



**डॉ.बाबासाहेब आंबेडकरांनी घटना समितीत देशासमोरील राज्य घटनेबाबत बोलताना राजकारणातील व्यक्तिपूजा आणि व्यक्तिनिष्ठा यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या धोक्यांचा इशारा दिलेला होता. त्याकडे आपण साफ दुर्लक्ष केले आहे. तमिळमध्ये जयललितांचे, गुजरातमध्ये नरेंद्र मोदींचे, काही महाराष्ट्रीयांकडून बाळ ठाकरे यांचे आणि सर्व काँग्रेस जनांकडून इंदिरा, राजीव आणि सोनिया गांधी यांचे दैवतीकरण झालेले आपण पाहतो. आंबेडकरांचे स्वत:चेही त्यांच्या अनुयायांकडून चाललेले मूर्तिपूजन आपण पाहत आहोत. इतके असूनही १३ ऑगस्ट १९६७ या दिवशी 'लिबरेशन ऑफ आर्मी डेली'च्या अंकातील हे संपादकीय आपल्याला चक्रावल्याशिवाय राहणार नाही.**

# माओ चालिसा

मार्क्सवाद ऐतिहासिक घटनांकडे इहवादी (भौतिक) दृष्टिकोनातून पाहतो. त्यामध्ये वर्गसंबंध आणि तंत्रज्ञानाच्या शक्ती यांना अधिक महत्त्व दिले जाते; व्यक्तिगत कृतींना नाही. वास्तवात मात्र पोथीनिष्ठ मार्क्सवादी राजवटींनी आपल्या नेत्यांच्या व्यक्तिमत्त्वपतनाला अभूतपूर्व उत्तेजन दिले आहे. जगातील कम्युनिस्ट पक्षांनी आपल्या नेत्यांवर उडवलेल्या टीकेचा शिंतोडाही कधी सहन केला नाही. मार्क्स, एन्जेल्स आणि लेनिन या त्रिमूर्ती त्यांच्या ठायी सदैव वंद्यच राहिल्या. 'बूर्झ्वा लोकशाही'तील पंतप्रधान किंवा अध्यक्ष यांना सोव्हिएत युनियनचे सर्वसत्ताधारी जोसेफ स्टॅलिन यांच्यावर १९३० ते ४० या कालखंडात जी लाचार स्तुतिस्तोत्रे उधळली गेली त्यांचाही अनुभव कधी घेता आला नाही.

आधुनिक काळात रशियामधील स्टॅलिन यांच्या व्यक्तिमत्त्वाचा उदोउदो इतक्या वरच्या पातळीवर पोचला होता, की जगातील फक्त दोनच देश– तेही कम्युनिस्टच त्या उंचीवर पोहोचू शकले– नव्हे ती ओलांडून गेले. त्यापैकी एक किम्–ली सुंग या नेत्याचा उत्तर कोरिया आणि दुसरा देश म्हणजे माओचा चीन. 'पीपल्स रिपब्लिक ऑफ नॉर्थ कोरिया'च्या भारतीय वकिलातीवरून जात असताना (सुंदर नगरमधील मार्केटच्या जवळपास) १९९० साली किमची लावलेली चित्रे आणि त्याखालील मजकूर पाहून माझी बरीच करमणूक झाल्याचे आठवते. विशेषत: 'या आमच्या नेत्याने एकट्याने आपल्या देशाच्या जनतेला 'अंधारातून प्रकाशात' आणले.' हे वचन तर फारच विनोदी होते. त्यापेक्षाही अधिक मजेदार अनुभव लंडनमधील एका फूटपाथवरच्या पुस्तकाने मला दिला. त्या पुस्तकाचे नाव होते 'चेअरमन माओचे चमत्कार!' ते १९७१ सालचे प्रकाशन होते. त्यामध्ये १९६६ ते १९७० या कालावधीत चिनी वृत्तपत्रे आणि आकाशवाणी पत्रके यांच्यामधून उद्धृत केलेले विविध प्रकारचे उतारे होते. जी.आर.अर्नत नावाच्या एका कम्युनिस्ट विरोधी पत्रकाराने ते संकलित केले होते. पुस्तकाचे उपशीर्षक तिरकस, उपरोधिक शैलीतले होते; परंतु अचूक होते; 'भक्तिवाङ्मय विचार सारसंग्रह' (A Compodium of Devotional Literature).

या सारसंग्रहातील कथा इतक्या आश्चर्याचे धक्के देणाऱ्या होत्या की, त्यांतल्या काही मला तुमच्यासाठी सादर केल्याच पाहिजेत. एक मुलगी, जी गेली अनेक वर्षे मूक आणि बधीर होती, ती चेअरमन माओच्या प्रभावाने एकाएकी माओच्या स्तुतीचे गीत गाऊ लागली! दुसऱ्या एका प्रकरणात पंचेचाळीस किलो वजनाचा ट्यूमर पोटात वाढलेल्या स्त्रीचे यशस्वी ऑपरेशन, माओचे छोटे लाल पुस्तक दररोज श्रद्धेने वाचणाऱ्या आणि त्याचे चिंतन करणाऱ्या डॉक्टरांनी केले; त्यांच्या प्रयत्नांमागील माओचे प्रेरक वाक्य होते; 'प्रथम विस्कळीत झालेल्या, एकाकी पडलेल्या शत्रुसैन्यावर पहिला हल्ला चढवा आणि नंतर कडव्या लष्करी सैनिकांच्या जथ्थ्यांवर!' तसेच त्या डॉक्टरांनी केले. प्रथम त्यांनी त्या ट्यूमरला आधार देणारे पेशींचे तंतुजाल कापून दूर केले. आणि मग ट्यूमरला हात घातला! अर्थात त्यांच्या मदतीला हॉस्पिटलचा सेवकवर्ग होताच! पेशंटला रक्त देण्यासाठी डॉक्टरना ऊर्जा मिळावी म्हणून माओची छायाचित्रे घेऊन ते सेवक डॉक्टरांसमोर हजर असत. ऑपरेशन पूर्ण झाल्यानंतर जेव्हा ती स्त्री सावध झाली, आणि तिच्या पोटातील तो ट्यूमर पोटातून गेल्याची जाणीव हलकेपणाने झाली; तेव्हा तिच्या मुखातून बाहेर पडलेले पहिले शब्द 'चेअरमन माओ दीर्घायू व्हावेत! त्यांच्यामुळेच आज मी जिवंत राहिले!'



चेअरमन माओंच्या नामाचा आरोग्यक्षेत्रात असलेला वचक आपण पाहिला. आता माओ नामस्मरणाने क्रीडा क्षेत्र कसे चालले आहे ते पाहू. १९५९ मध्ये चिनी खेळाडूंनी टेबल टेनिस स्पर्धांमध्ये जागतिक प्रभुत्व मिळवले. त्यावर एका खेळाडूने आपले मनोगत असे व्यक्त केले की, त्यांच्या यशाचे मर्म माओच्या मार्गदर्शनात आहे. माओ यांच्या 'विरोध-प्रतिविरोध' आणि 'सराव चालू असताना' या दोन लेखांमधून शिकलेले सिद्धांत आणि डावपेच यांच्या आधारे खेळून आम्ही विजयी झालो. दुसरा क्रीडापटू म्हणाला, 'चेअरमन माओंच्या शिकवणीतून आम्हांला असा संदेश मिळाला, की सर्वोच्च जागी पोहोचण्यासाठी आपला रस्ता आपणच तयार करायला हवा. मागे वळून पाहिले तर गेली दहा वर्षे किंवा त्याच्या आधीसुद्धा आम्ही आमचे मार्गक्रमण श्रमजीवींचे राजकारण आणि माओ त्से तुंग यांचे मार्गदर्शन यांच्याच दिशेने चालू ठेवले आहे.

१९६५ साली चीनने जागतिक पातळीवर खेळामध्ये सुवर्णचषक हस्तगत केला, तेव्हा याच खेळाडूने असे उद्‌गार काढले की, त्यांच्या खेळामध्ये चेअरमन माओच्या विचार संग्रहातील वचनांचा अभ्यास आणि उपाययोजना समोर ठेवून माओंच्या क्रांतिकारक चर्चा व डावपेच यांचा उपयोग फटके मारताना केला. आमची टेबल टेनिस बॅट माओच्या आदेशाच्या प्रभावाखाली होती.

या पुस्तकात माओवरील (अंध)श्रद्धेचे अनेक दाखले आहेत. एका खडकाळ डोंगरातून बोगदा खणून मार्ग काढायचा आहे. त्या कामात मदत करणारा कामगार अतिश्रमाने बेशुद्ध पडतो. काही काळानंतर तो आपोआप शुद्धीवर येतो. शुद्धीवर येताना त्याला माओची वचने आठवतात, 'काम म्हणजे काय? काम म्हणजे संघर्ष! एक चांगला कॉमरेड (साथी) तोच असतो, जो अडचणींमागून अडचणी ओलांडण्यास उत्सुक असतो. त्या ईर्ष्येनेच पावले टाकतो' या आठवलेल्या वचनाने त्याची ऊर्जा वाढली. उठून तो त्याच्या कामाला भिडला. आणि त्वेषाने घाव घालीत, खणत त्याने दुसऱ्या बाजूने बोगद्याचा मार्ग मोकळा केला.

माओवरील विपरीत श्रद्धेचे दर्शन आणखी एका प्रसंगातून दिसते. उत्तर पूर्व चीनच्या प्रदेशातील पक्षाचे कार्यकर्ते माओ विचारांचे आरोपण जनतेच्या मनात करण्यासाठी खेडोपाडी फिरत होते. त्यांत काही ग्रामीण नापितही होते. या कार्यकर्त्यांसमोर एकदा एक 'बूर्झ्वा' सुधारणावादी विचारांचे टोळके आले. 'आधी नफा', 'आधी व्यावहारिक फायदे,' 'भौतिक उत्तेजन' अशा प्रकारच्या काही घोषणा त्यांनी आपल्या कडव्या विरोधी कार्यकर्त्यांसमोर केल्या. या परत परत पुढे येणाऱ्या घोषणांनी लिड-शाओची या तरुण नेत्याच्या अंगाची आग आग झाली. अर्थात क्रांतिकारी कल्पनांचा अखेर विजय होतोच! तो तसा झाला; पण त्यासाठी संघर्षही करावा लागला. पेकिंग (बीजिंग) रेडिओने एप्रिल १९९९ मध्ये जाहीर केलेल्या एका निवेदनात एका केशकर्तकाची काळजी व वेदना यांचे

पुढीलप्रमाणे प्रकटीकरण झाले आहे.

‘एका संध्याकाळी चिंग-सुंग-ता या नावाचा एक केशकर्तक शहराबाहेरील ग्रामीण विभागात आपल्या ग्राहकांच्या केसांची साफसफाई आणि कर्तन करण्यासाठी निघाला. त्याचबरोबर आपल्या देशातील थोर श्रमिकांची सांस्कृतिक क्रांती घडून आल्यामुळे देशामधील परिस्थिती एकूणच कशी उत्तेजना देणारी आहे, याबद्दलही त्याचा प्रचार चालू होता. घरी परतल्यानंतर बराच काळ तो माओ विचारचिंतनात रमला आणि त्या अनुरोधाने आपले दिवसाचे व्यवहार व घडामोडी तपासून घेऊ लागला. पण चिंग-सुंग-ता एका घटनेच्या आठवणीने एकदम अस्वस्थ झाला. एका अपंग माणसाचे त्याने केस कापले तेव्हा त्याने पाहिले होते की त्याचे पांघरूण ओले झाले होते, पण त्या वृद्ध माणसासाठी ते काढून त्याने धुतले नव्हते. म्हणजे लोकहिताच्या दृष्टीने करण्याच्या कामाची त्याने टाळाटाळ केली होती आणि चेअरमन माओच्या शिकवणुकीचा त्याने अपमान केला होता. दुसऱ्या दिवशी पहाटेच त्याने उठून त्या माणसाच्या घराचा रस्ता धरला आणि ते पांघरूण त्याच्याकडून घेऊन त्याला धुऊन दिले; तेव्हा त्याला शांती मिळाली.

चीनमध्ये चेअरमन माओने वर्गसंघटना मजबूत बनवण्यासाठी काही मूलभूत उपाय सांगितले होते. त्यांपैकी एक म्हणजे कौटुंबिक संबंध, जिव्हाळा यांना विसरणे. आता याची एक कथा- लॉरीचा धक्का लागून एक स्त्री खाली रस्त्यावर पडली आणि मेली. तिच्यावर अतिशय प्रेम करणारा तिचा नवरा रागाने व सूडभावनेने काळानिळा पडून त्या लॉरी ड्रायव्हरवर धावून गेला... आणि मध्येच थांबला. कारण त्या वेळी माओच्या एका वचनाने त्याला जागविले. चेअरमन माओ म्हणाले होते... ‘आमची प्रगतिपथावरची वाटचाल स्वत:च्या हितसंबंधांच्या मुद्यापासून सुरू न करता सर्व बाबतींत जनतेच्या हितसंबंधांच्या मुद्यांपासून झाली पाहिजे...’ या वचनाच्या स्मरणाने दिलासा मिळालेल्या त्या चिनी नागरिकाने त्या लॉरी चालकाला शोधून काढले. त्याला आपण माफ केले हेही सांगितले. मुख्य म्हणजे त्याने चेअरमन यांच्या वचनांचा अभ्यास करावा; कारण स्टीअरिंग व्हील ड्रायव्हरला जितके महत्त्वाचे, तितकेच क्रांतिकारकाला माओ वचनाचे महत्त्व, हे त्याने त्या लॉरीचालकाला समजावून दिले. त्या चालकाला भावनांचे भरते आले. त्याने त्या मृत तरुणीच्या- त्या दु:खी नवऱ्याला, त्या तरुणाला मिठी मारली व म्हणाला, ‘या दुर्दैवी घटनेने आपल्याला एक धडा शिकवला आहे. तुझ्यासारखा एक उदार माणूस समाजाला दिल्याबद्दल मी त्यांचा फार फार ऋणी आहे. म्हणून माओ वचनांचे विधायक दृष्टीतून वाचन, चिंतन आणि अभ्यास करून मी स्वत:चे हितसंबंध आणि सुधारणावाद यांचा मागमूसही स्वत:जवळ राहू देणार नाही. क्रांतिकारी वातावरणात एक आदर्श म्हणून राहून उत्पादकता वाढवीन.’

डॉ.बाबासाहेब आंबेडकरांनी घटना समितीत देशासमोरील राज्य घटनेबाबत बोलताना राजकारणातील व्यक्तिपूजा आणि व्यक्तिनिष्ठा यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या धोक्यांचा इशारा दिलेला होता. त्याकडे आपण साफ दुर्लक्ष केले आहे. तमिळमध्ये जयललितांचे, गुजरातमध्ये नरेंद्र मोदींचे, काही महाराष्ट्रीयांकडून बाळ ठाकरे यांचे आणि सर्व काँग्रेस जनांकडून इंदिरा, राजीव आणि सोनिया गांधी यांचे दैवतीकरण झालेले आपण पाहतो. आंबेडकरांचे स्वत:चेही त्यांच्या अनुयायांकडून चाललेले मूर्तिपूजन आपण पाहत आहोत. इतके असूनही १३ ऑगस्ट १९६७ या दिवशी ‘लिबरेशन ऑफ आर्मी डेली’च्या अंकातील हे संपादकीय आपल्याला चक्रावल्याशिवाय राहणार नाही.

‘चेअरमन माओ हा जगातील सर्वांत प्रज्ञावान आणि सर्वांपेक्षा वेगळा असा नेता आहे. त्याचे विचार म्हणजे चीनमध्ये आणि जगात जे श्रमजीवींचे लढे झाले त्या सर्वांचे सार आहे यात शंकाच नाही. माओच्या आज्ञांचे पालन करताना आपल्याला त्यांचा अर्थ कळला किंवा नाही याबद्दल चिंता करण्याचे कारणच नाही. क्रांतिकारक लढ्यांचा अनुभव आपल्याला असे सांगतो की, कॉ.माओंच्या वचनांचा किंवा आदेशांचा अर्थ सुरुवातीला जरी आपल्याला कमी-अधिक प्रमाणात कळला नाही तरी त्याची अंमलबजावणी करताना हळूहळू तो लक्षात येऊ लागतो किंवा त्यासाठी अनेक वर्षांचा कालावधीही लागतो. म्हणून माओंच्या आज्ञा आपण निष्ठुरपणे अंमलात आणल्याच पाहिजेत; ज्या आपल्याला ताबडतोबच समजतात त्या; आणि कालांतराने ज्यांचा अर्थ ध्यानी येतो त्याही.’

यालाच अंधश्रद्धा म्हणतात असे मला वाटते. या पातळीवर आपल्याकडील बाबा, महाराज, गुरू यांनाही माओला साठ सालच्या चीनमध्ये असलेले स्थान पाहून आपण अजून किती मागे पडलो आहोत याची खंत वाटेल!

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.

## पुढील अंकात

रामचंद्र गुहा यांच्या नव्या पुस्तकातील एका लेखाचा अनुवाद-

**इपीडब्ल्यू आणि कृष्णराज**



कालपरवा
११

रामचंद्र गुहा

# इतिहासकारांचे इतिहासकार

भारतात १९१९ साल, रौलट ॲक्ट आणि त्याच्या विरुद्ध झालेल्या सत्याग्रहामुळे खळबळीचे ठरले. पाठोपाठ १९२० साल काँग्रेस- खिलाफत संयुक्त मोर्चामुळे गाजले. १९२१ मध्ये तर सार्वत्रिक असहकाराची चळवळ सुरू झाली; ती १९२२ साली चौरीचुरा या ठिकाणी लोकांनी पोलिस स्थानक जाळल्यामुळे गांधीजींच्या आदेशानुसार मागे घेतली गेली. या पार्श्वभूमीवर १९२३ हे वर्ष देशाला थोडेफार स्वास्थ्य आणि शांतता देऊन गेले असे म्हणायला हरकत नाही; तर भारतीय इतिहास अभ्यासकांना मात्र ते वरदायी ठरले असेच म्हणावे लागेल. कारण २३ मे १९२३ या दिवशी 'सबाल्टर्न स्टडीज स्कूल'चे संस्थापक रणजित गुहा यांचा जन्म झाला. त्या दिवसाच्या बरोबर एक महिना आधी, म्हणजे २३ एप्रिल या दिवशी, अशा कोणत्याही संस्थेच्या उभारणीला कारणीभूत न होताही, पुढील आयुष्यात अनेकांचे लक्ष स्वत:कडे वेधून घेण्यात यशस्वी झालेल्या सर्वपल्ली गोपाल (एस.गोपाल) या इतिहासकाराचा जन्म झाला.

रणजित गुहा (प्रस्तुत लेखकाशी केवळ नामसाधर्म्य) यांचा जन्म पूर्व बंगालमधील एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. कलकत्त्यामध्ये इतिहासाचे अध्ययन करता करता ते कम्युनिस्ट झाले. विद्यार्थी चळवळीत सदैव आघाडीवर असणारे गुहा १९५६ मध्ये हंगेरीवरील कम्युनिस्ट आक्रमणामुळे इतके नाराज झाले, की त्यांनी कम्युनिस्ट पक्षाचा राजीनामा दिला. १९६३ साली त्यांनी ब्रिटिशांच्या जमीनविषयक धोरणांचा विशेष अभ्यास व संशोधन करून त्या माहितीचे प्रकाशन केले. पण त्यांनी १९८० च्या दशकात 'सबाल्टर्न स्टडीज व्हॉल्यूम्स'चे केलेले संपादन आणि 'दि एलिमेंटरी आस्पेक्टस् ऑफ पिझंटस् इन्सर्जन्सी' (शेतकऱ्यांच्या उठावाची मूलभूत कारणे) या १९८३ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकामुळे त्यांचे नाव चांगलेच सुप्रतिष्ठित झाले. त्यानंतरच्या दशकात तर त्यांच्या नावाचा आणि कामाचा दबदबा इतका वाढला की जगातील डाव्या विचारवंत मंडळींनी त्यांच्या विचार-प्रतिपादनासमोर गुडघे टेकले होते असे म्हटले तरी चालेल.

गुहांचे अगदी समकालीन सर्वपल्ली गोपाल हे गुहांप्रमाणेच मध्यमवर्गीय कुटुंबातून आलेले; पण कुटुंबाचा सामाजिक दर्जा बराच उच्च असलेले. प्रसिद्ध भारतीय तत्त्ववेत्ते डॉ.सर्वपल्ली राधाकृष्णन् यांचे चिरंजीव म्हणून अनेक राजकारणी, लेखक, विचारवंत यांचा सहवास त्यांना

खरे म्हणजे आधुनिक इतिहासाच्या कोणत्याही अभ्यासकाला या दोनही संशोधकांपासून शिकण्यासारखे बरेच आहे. कारण मानवी जीवन हे (एककेंद्री, लहरी, पाशवी आणि सहृदय अशा) सत्तेची राबवणूक आणि तिला केला जाणारा (व्यक्तिगत, सामूहिक, हिंस्र किंवा अहिंसक) असा प्रतिकार यांची कहाणी आहे. काही वर्षांपूर्वी मी रणजित गुहांचे 'द स्मॉल व्हॉइस ऑफ हिस्टरी' या नावाचे संकलित निबंधाचे पुस्तक वाचून फार प्रभावित झालो होतो. आणि अगदी अलीकडेच सर्वपल्ली गोपाल यांच्या निबंधांचे तरुण इतिहास-संशोधक श्रीनाथ राघवन यांनी संकलन केलेले 'इम्पीरिअलिस्ट, नॅशनॅलिस्टस्, डेमॉक्रॅटस्' हे पुस्तकही मला तृप्त करून गेले.

लहानपणापासूनच मिळाला. त्यांचे उच्चशिक्षण ऑक्सफर्ड विद्यापीठात झाले. (त्याच विद्यापीठात त्यांचे वडील डॉ.राधाकृष्णन हे पौर्वात्य धर्मांसंबंधी विशेष अध्यापन करीत). सर्वपल्ली गोपालही शिक्षण संपल्यानंतर त्याच विद्यापीठात शिकवू लागले. १९६० च्या दशकात गोपाल यांनी 'व्हाईसरॉय आणि त्यांची धोरणे' या विषयावर काही उत्तम निरीक्षणे प्रसिद्ध केली. १९७१ मध्ये ते भारतात परतले आणि दिल्लीमध्येच त्यांनी प्राध्यापकीय कारकिर्दीला सुरुवात केली. त्यानंतरच्या पंधरा वर्षांत त्यांनी पंडित जवाहरलाल नेहरूंच्या जीवनावर तीन अधिकृत आणि माहितीपूर्ण ग्रंथांचे लेखन केले. नंतर १९८९ मध्ये त्यांनी आपल्या वडिलांचेही परखड आणि त्यांच्या जीवनातील बऱ्या-वाईट घटनांवर टीकाटिप्पणी करणारे चरित्र लिहिले; जे त्यांनी लिहिलेल्या सातही ग्रंथांत उत्कृष्ठ ठरले.

सत्ता आणि ती राबवणारी धोरणे यांचे इतिहासलेखन हे गोपाल यांचे वैशिष्ट्य होते. त्यांनी अनेक राजप्रतिनिधी (व्हाइसरॉय) आणि प्रधानमंत्री यांच्याबद्दल आणि त्यांनी आकाराला आणलेली राज्ये व नेतृत्व दिलेले देश यांच्याबद्दल लिहिले. उलट, गुहा हे समाजातील वंचित थरांचे- मुख्यत: शेतकरी, आदिवासी आणि कामगार वर्गाचे इतिहासकार होते. तरीही दोघांच्या लेखन विषयांतील फरकाची नोंद घेऊन दोघांमध्ये काही समान गुणधर्मही होते. दोघेही अत्यंत कठोर परिश्रम करून आपापल्या विषयांचे संशोधनकार्य करण्यासाठी पुराणवस्तू संग्रहालयाच्या वास्तूचा तासन्‌तास आश्रय घेत. दोघांचेही इंग्रजी लिखाण असाधारण प्रभावी व सुबोध होते आणि इतिहास ही ज्याप्रमाणे सामाजिक शास्त्रांची एक शाखा आहे, त्याचप्रमाणे त्या शाखेचा वाङ्‌मयाशीही संबंध आहे याची या दोघांनाही जाणीव होती.

आजकाल ऐतिहासिक वृत्तांतांनी भरलेल्या पुस्तकांनी ओसंडून वाहणाऱ्या दुकानांना अपवाद म्हणून गुहा आणि गोपाल यांचे मोजकेच व विशेष विश्लेषक लिखाण लोकांना आकर्षित करून त्यांना ते वाचनास भाग पाडीत असे. राजकीय सिद्धांतांतील मूलगामी विचारांचे, समाजशास्त्रज्ञ, मानववंश शास्त्र आणि काही वेळा मानसशास्त्राचेही निकष लावून व्यक्ती आणि समुदायांच्या कृती आणि हालचाली यांचा अर्थ त्यांच्या व्यापक सामाजिक व ऐतिहासिक पार्श्वभूमीवर लावण्याचे काम या उभयतांनी केले. दोघांचेही लिखाण सरस होते, पण गुहा आणि गोपाल निव्वळ कथानिवेदक नव्हते; गंभीरपणे इतिहासात अवगाहन करणारे व्यावसायिक इतिहासकार होते. केवळ पुराणकालीन वस्तू, घटना यांतच रमणारे ते नव्हते.

संवेदनशील व्यक्ती क्रांतिकारी विचारांकडे चटकन आकर्षित होत असल्यामुळे गुहांच्या भोवती काही समर्पित तरुण-तरुणींचे वर्तुळ तयार झाले होते. गुहांपेक्षा ही मंडळी वयाने लहान असल्यामुळे ती त्यांच्याकडे एक नवविचार देणारा प्रेषित म्हणून भक्तिभावाने पाहत. सर्वपल्ली गोपालांना मात्र हे वलय लाभले नाही. त्याची कारणे दोन- राजकीय इतिहास आणि चरित्रे यांचा जमाना आता ओसरला आहे. दुसरी गोष्ट म्हणजे परस्पर संवाद, वाटाघाटी आणि तडजोडीचे तत्त्वज्ञान व त्याखाली सुप्त असलेला उदारमतवाद यांचे तरुणांना अजिबात आकर्षण राहिलेले नाही; उलट ते अतिरेकी उजव्या किंवा डाव्या विचारसरणीकडे अधिक वेगाने आकर्षित होऊ लागले आहेत. याचे कारण या विचारसरणीचे नेतृत्व त्यांना अधिक वेगवान आणि संपूर्ण बदलाचे जे आश्वासन देते ते त्यांना अधिक समाधानकारक वाटते.

खरे म्हणजे आधुनिक इतिहासाच्या कोणत्याही अभ्यासकाला या दोनही संशोधकांपासून शिकण्यासारखे बरेच आहे. कारण मानवी जीवन हे (एककेंद्री, लहरी, पाशवी आणि सहृदय अशा) सत्तेची राबवणूक आणि तिला केला जाणारा (व्यक्तिगत, सामूहिक, हिंस्र किंवा अहिंसक) असा प्रतिकार यांची कहाणी आहे. काही वर्षांपूर्वी मी रणजित गुहांचे 'द स्मॉल व्हॉइस ऑफ हिस्टरी' या नावाचे संकलित निबंधाचे पुस्तक वाचून फार प्रभावित झालो होतो. आणि अगदी अलीकडेच सर्वपल्ली गोपाल यांच्या निबंधांचे तरुण इतिहास-संशोधक श्रीनाथ राघवन यांनी संकलन केलेले 'इम्पीरिअलिस्ट, नॅशनॅलिस्टस्, डेमॉक्रॅटस्' हे पुस्तकही मला तृप्त करून गेले.

राजकीय परिभाषाच वापरायची म्हटली तर मार्क्सवादाच्या सर्वंकष समतावादाने डोळे दिपू न देताही गोपाल यांचे विचार थोडेफार डावीकडे झुकलेले राहिले किंवा समतेच्या तत्त्वज्ञानाच्या पायावर त्यांच्या उदारमतवादाचे पोषण झाले होते, असे मी म्हणेन. त्याचे दर्शन घडवणारा एक लेख त्यांच्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकात आहे. त्यातून त्यांचे हक्क आणि अधिकार यांच्या मुळाशी, दुसऱ्यावर अन्याय होऊ नये याबाबतची त्यांनी सतत जोपासलेली जागरूकता स्पष्टपणे व्यक्त झालेली आहे. केंब्रीजमधील काही अभ्यासकांनी '१९२० ते १९३० दरम्यानच्या ब्राह्मणेतर चळवळी म्हणजे काही 'करियर'वाल्या आणि संधिसाधूंच्या हालचालींना आलेले फळ आहे' असे विधान केले आहे. स्वत: ब्राह्मण असलेले गोपाल ते विधान खोडून काढताना, त्या काळात आर्थिक, राजकीय, प्रशासकीय, धार्मिक आणि सांस्कृतिक



**रणजित गुहा**

क्षेत्रात (त्या वेळच्या) मद्रास प्रांतात ब्राह्मणांचे वर्चस्व किती डोईजड झाले होते याचे दाखले देतात आणि त्या आक्षेपार्ह विधानाचा पुरेपूर समाचार घेतात.

त्या पुस्तकात जवाहरलाल नेहरू यांच्या संबंधात अनेक लेख आहेत. त्यामध्ये नेहरूंनी या देशात लोकशाही व धर्मनिरपेक्षता यांच्या संगोपनासाठी चालविलेल्या कसोशीच्या प्रयत्नांचा आदरपूर्ण उल्लेख आहे. गोपाल नेहरूंचे चाहते आहेत. पण त्यांच्यापेक्षा गांधी हे अधिक थोर होते हेही ते नि:संदिग्धपणे सांगतात. गोपालनी या संबंधात लिहिले आहे, ''महात्माजींनी बऱ्याच कल्पना, विचार पाश्चिमात्यांकडून उचलल्या आणि त्यांचे भारतीय अनुभवांमध्ये रूपांतर करण्यात ते यशस्वी झाले. त्यांच्या जीवनानुभवात ते पूर्णपणे मुरले. याउलट नेहरू मात्र या सर्व घटनाचक्राच्या बाहेरचेच राहिले. या वस्तुस्थितीचे नेहरूंना पूर्ण भान होते आणि त्यामुळेच ते स्वत:ला पूर्णपणे महात्माजींना (काही तात्त्विक मतभेद असले तरी) समर्पित करू शकले.''

गर्दीशी, जमावाशी संवाद करण्याची नेहरूंची आवडही गोपाल यांनी उद्‌धृत केली आहे. त्यांचे याबाबत निरीक्षण असे आहे, 'महात्माजीही लोकांच्या सभेत बोलत; त्यांच्याकडे आपले मनसुबे व्यक्त करीत. त्यांच्या कणखर व्यक्तिमत्त्वामुळे लोकांना त्यांच्या शब्दांतून आधार मिळे; ताकद मिळे. नेहरूंना मात्र जनतेच्या व्यक्तिपूजेमधून स्फूर्ती मिळे.''

नेहरूंच्या धर्मनिरपेक्षतेचे भक्कम समर्थन आणि आजच्या भारतात त्यांचे महत्त्व काय, याचे प्रतिपादन गोपालनी आपल्या लिखाणातून नि:संदिग्धपणे केले आहे. धर्मनिरपेक्षतेवरील गांधींची निष्ठा अचल होती आणि त्याबाबत नेहरू त्यांच्याशी पूर्ण सहमत होते. त्याबद्दल गोपालनी लिहिले आहे, ''बहुसंख्यांक जमातीचा जातीयवाद हा भारतातील इतर कोणत्याही अल्पसंख्यांकांच्या जातीयवादापेक्षा अधिक धोकादायक आहे.' कारण 'बहुसंख्यांकांचा जातीयवाद राष्ट्रवाद म्हणून मिरवला जाण्याचा धोका असतो आणि त्याचे रूपांतर 'फॅसिझम'च्या भारतीय अवतारात कधी होईल हे सांगता येत नाही.''

पंतप्रधान इंदिरा गांधींनी देशावर लादलेली आणीबाणी उठवली, तेव्हा लिहिलेल्या एका लेखात गोपालनी म्हटले होते, ''१९७५ ते १९७७ या दोन वर्षांतील घडामोडींनी या देशात 'नेहरू' या नावाला काळे फासले आहे.'' पण १९८६ ते १९८८ दरम्यान ज्या काही घटना घडल्या (शहाबानो खटल्याच्या निकालानंतर राजीव गांधींनी मुस्लिमांचा अनुनय करण्यासाठी मांडलेले मुस्लिम महिला विधेयक आणि नंतर

**सर्वपल्ली गोपाल**



बोफोर्स घोटाळा) त्यांच्यामुळे नेहरू आणखीच बदनाम झाले आणि २००९ ते २०१३ दरम्यान (सोनिया गांधी आणि राहुल यांचा नाकर्तेपणा, युपीए सरकारने वाढत्या भ्रष्टाचाराला दिलेले उत्तेजन आणि रॉबर्ट वद्रा यांनी केलेले जमिनीचे कुटिल व्यवहार) झालेल्या घटनांनी नेहरूंच्या वारसांनी त्यांचे नाव पुरते धुळीला मिळवले आहे. त्यामुळे नेहरूंनी आयुष्यभर जी मूल्ये जपली, वाढवली आणि स्वत:च्या जीवनात रुजवली, त्यांच्या जोपासनेसाठी, रक्षणासाठी सदैव सज्ज असणे एवढे एकच उद्दिष्ट आता आपल्यासमोर असले पाहिजे.

गोपाल यांच्या पुस्तकाची विशेष ओळख म्हणजे त्यात आतापर्यंत अप्रकाशित राहिलेला 'दि पॅराडॉक्सेस ऑफ सुभाषचंद्र बोस'- (सुभाषचंद्रांच्या व्यक्तिमत्त्वातील अंतर्विरोध) सुभाषचंद्रांच्या जीवनातील इतिहासाचा न्याय हा कठोर-काहीसा मर्मभेदी- होता हे गोपाल मान्यच करतात. १९३९ साली काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून त्यांना हुसकावण्यात आले; त्यानंतर काँग्रेसमधूनही ते बेदखल झाले. कालांतराने जेव्हा भारतीय स्वातंत्र्याची निश्चिती झाल्याची चिन्हे दिसू लागली, तेव्हा देशात परतून जनतेने केलेले भव्य स्वागत स्वीकारण्याची सुवर्णसंधी विमान अपघातातील अकस्मात निधनामुळे कायमचीच दृष्टीआड झाली. गोपाल या संदर्भात लिहितात, ''सुभाषचंद्रांचे अनुयायी व हितचिंतक अशा परिस्थितीत आपली बाजू मांडण्यासाठी आक्रमक झाले आणि त्यांच्याबद्दलचा स्तुतीचा शब्द सोडता इतर काहीही ऐकून घेण्याची तयारी त्यांनी दाखवली नाही. यात काही नवल नव्हते.'' त्यानंतर गोपाल पुढे लिहितात, ''पण सुभाषचंद्रांना कोणाच्याही सहानुभूतीची गरज नाही. कारण कठोर परिस्थितीतून त्यांनी स्वत:ला सिद्ध केलेले आहे.''

सुभाषचंद्रांबाबतच गोपाल पुढे एका ठिकाणी लिहितात, की सुभाषचंद्रांना युरोपमधील हुकूमशहांबद्दल जो एक कुतूहलयुक्त आदरभाव होता, तो त्यांच्या स्वत:च्या हद्दपारीवरील जणू एक उताराच होता- त्यांच्या विदीर्ण होत चाललेल्या मानसिकतेला तो आधार होता. त्या सर्वंकष हुकूमशाही राजवटीतील शिस्त आणि अधिकाराचा एकहाती वापर यामुळे त्यांना तिचे आकर्षण वाटले. गोपाल म्हणतात, ''गांधींच्यामध्ये व त्यांच्यामध्ये असलेला मोठा फरक म्हणजे गांधींनी हिंदू चालीरीती व रूढी यांच्यामधील, पडदा (गोषा), अस्पृश्यता यांसारख्या प्रथांना आव्हान देऊन त्यांच्याविषयी लोकमत जागृत करण्याचा प्रयत्न केला. बोसना मात्र भारताचे प्राचीन वैभव, इतिहास, परंपरा यांच्या (खऱ्या-खोट्या) कथा यांच्याबद्दल ऐकून- वाचून एक प्रकारचे स्मरणरंजन (नोस्टाल्जिया) होत असे. परिणामी रूढी-परंपरांचा स्वीकारही चिकित्सारहित वृत्तीने त्यांनी केला. मूळ विषयाकडे परत फिरायचे तर बोस यांना पडलेली पश्चिमेची भुरळ सैद्धांतिक बाबींसंबंधी नसून संघटनात्मक पद्धतीविषयी होती. युरोपविषयीची त्यांची ओढ व्यक्तिस्वातंत्र्य किंवा विचारस्वातंत्र्यातून निर्माण झाली नव्हती; तर तेथील पक्षशिस्त आणि स्वयंसेवी संघटना व दले त्यांना आकर्षित करीत होती.''

नव्वद वर्षांचे जीवन आणि निधनानंतरची दहा वर्षे उलटून गेली तरीही इतिहासकार म्हणून सर्वपल्ली गोपाल यांचे कार्य आजही जनतेसमोर आहे. त्यांच्या गद्यलेखनाची ढबही अभ्यासनीय आहे. त्यांचे सखोल संशोधन आणि समकालीन घटनांचा अर्थ लावण्याची त्यांची ताकद यांसाठी त्यांच्या लिखाणाचे वाचन होणे जरूर आहे. या पुस्तकातच कुठेतरी गोपाल यांनी रवींद्रनाथ टागोर यांच्या 'गोरा' कादंबरीतील अखेरच्या काही ओळी उद्‌धृत केल्या आहेत; त्यात कादंबरीचा नायक म्हणतो, 'काहीही असले तरी मी एक भारतीयच आहे. माझ्यामध्ये विविध जाती-जमातींचे संघर्ष नाहीत. हिंदु, मुस्लिम, ख्रिश्चन यांच्यामधले झगडे नाहीत. मी त्या सर्वांचा आहे आणि ते सर्व माझे आहेत.' त्यानंतर आपल्या पुस्तकात आणखी काही पानांनंतर गोपाल टागोरांच्या व्यापक मानवतावादाबद्दल आणि पांथिक भेदाभेद आणि पूर्वग्रह यांच्यापासून मुक्त राहण्याच्या जीवनपद्धतीबद्दल लिहितात. ''कारण कविवर्यांनी या देशाबद्दल आशावाद व्यक्त करताना 'ही भूमी उच्च-नीचता, हिंदु-मुस्लिम-ख्रिश्चन भेदभाव विसरून सर्वांना एकत्र ठेवील. हृदयाला हृदय जोडील आणि सर्वांच्या प्रयत्नांची एकजूट घडवून आणील.' असे स्वप्न पाहिले आहे.''

'एका इतिहासकाराने उद्‌धृत केलेल्या वचनांची निवड त्याच्या स्वत:च्या चरित्रावर प्रकाश टाकते.' टागोरांचे हे वचन सर्वपल्ली गोपाल यांच्या, बहुरंगी, सर्वसमावेशक, प्रेमळ आणि करुणामय भारताच्या निर्मितीच्या जीवनध्यासाचे प्रतीक ठरले आहे.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.



कालपरवा
१२

रामचंद्र गुहा

# गुजरातचा सिंह राष्ट्रीय स्तरावर!

गुजरातच्या मुख्यमंत्र्यांची वेबसाईट असे दाखविते की, पर्यावरणाचे स्वास्थ्य हा नरेंद्र मोदींचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय आहे. आपल्या भोवतालचा निसर्ग आणि पर्यावरण यांची जपणूक हा आपल्या संस्कृतीचा अनेक शतकांपासूनचा वारसा आहे असे मोदींनी नमूद केले आहे, ते खरेच आहे. आपल्या भोवतालच्या परिसंस्थेला कोणत्याही प्रकारची हानी न पोहोचवता सृष्टिमातेशी पूर्ण सुसंवाद राखून जीवन व्यतीत करण्याची हाक मोदींनी नेहमीच दिली आहे.

तरीही, जी वस्तुस्थिती समोर येत आहे ती गुंतागुंतीचीच दिसते आहे. २००९ साली म्हणजे मोदी गुजरातच्या मुख्यमंत्रिपदी आरूढ झाल्यानंतर सात वर्षांनी एस.फैझी नावाच्या पर्यावरण तज्ज्ञाने गुजरातमध्ये फिरल्यानंतर असा अभिप्राय दिला आहे की, गुजरातमध्ये परिसंस्थेची पूर्ण नासाडी होत आहे. पक्षी आणि वन्यजीव अभयारण्यांवर खाणउद्योगांचे आक्रमण झालेले आहे. जमिनीतील खारटाण वाढली आहे. जगातील मोडक्या जहाजांचे 'अंतिम संस्कार' करणाऱ्या अळंग या बंदराच्या स्थितीमध्ये सुधारणा करण्यासाठी, तेथील पर्यावरणाला धोका पोहोचविणाऱ्या घटकांच्या निर्मूलनाच्या दृष्टीने कोणतीच पावले उचललेली नाहीत. खाण व्यवसायासंबंधात उद्योजकांचे हितसंबंध जपण्यासाठी जमीन, समुद्रकिनारे आणि सागराचे पाणी यांच्या प्रदूषणाकडे दुर्लक्ष केले जात असल्यामुळे तेथे कामासाठी आलेल्या श्रमिकांना मोठ्या धोक्यांना तोंड द्यावे लागते आहे. वडोदरा येथे चाललेल्या औद्योगिक प्रदूषणाचा परिणाम पाण्यावर झाला आहे आणि त्या जिल्ह्यातील भूगर्भ-जल विषारी बनल्यामुळे वापरात नाही; त्याचा परिणाम एकेकाळी सुपीक असणाऱ्या जमिनींवर झाला आहे; त्या ओसाड पडल्या आहेत. मिनी आणि मही यांसारख्या नद्यांच्या प्रदूषणामुळे 'सॉफ्ट शेल टर्टल' या जातीच्या भारतीय कासवांच्या अस्तित्वासमोर मोठे प्रश्नचिन्ह उभे आहे.

मोदींचे 'पर्यावरणरक्षक' जे दावे करीत आहेत, त्यांना छेद देणाऱ्या दोन घटना अलीकडेच घडल्या आहेत. गुजरात मुख्यमंत्र्यांचे उद्योगजगतात जे असंख्य स्नेही आहेत, त्यांतील गौतम अदानी हे उद्योजक कदाचित त्यांच्या सर्वांत निकटचे असावेत. मुख्यमंत्र्यांच्या या खास मित्राच्या 'अदानी ग्रुप' या औद्योगिक प्रकल्पाची गेल्या दहा-पंधरा वर्षांत वेगाने भरभराट झाली. आता केंद्रीय पर्यावरण मंत्रालयाच्या तज्ज्ञ समितीने अदानी यांनी मुंध्रामध्ये बांधलेल्या एका बंदराची पाहणी केली, तेव्हा त्यांना असे आढळले की, त्या बंदराच्या उभारणीत

गीर जंगलामधील सिंहांच्या पुनर्वसनास असलेला मोदींचा विरोध हा त्यांच्या प्रादेशिक अस्मितेच्या वेळोवेळी होणाऱ्या उद्रेकाचाच एक देखावा आहे. गुजरातची अस्मिता त्यांच्या या 'प्रिय' सिंहांना देशात इतरत्र कोठेही पाठविण्याच्या विरोधात आता उभी आहे. पण मोदींनी हवा दिलेला हा गुजराती अहंकार कदाचित त्या सिंहांच्या अस्तित्वालाच धोकादायक ठरणारा आहे. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या विरोधात तेथे चालू असलेल्या आंदोलनातून संघर्ष पेटू नये म्हणून गुजरात वनमंत्रालयाने ही कारवाई केल्याचे सांगण्यात येते. गीर जंगलातून सिंह हलविण्याच्या कोणत्याही हालचालीला कसून विरोध करण्यासाठी गुजराती एनजीओज सरसावले आहेत. राज्य सरकारने त्यांना ताबडतोब थोपविण्याची आवश्यकता आहे, कारण सर्वोच्च न्यायालयाच्या या संवेदनशील, विचार व विवेक यांच्यावर आधारलेल्या आणि वैज्ञानिक भूमिका असणाऱ्या निर्णयाची जलद व चोख अंमलबजावणी होणे गरजेचे आहे.

कायदेशीर नियमितता व कार्यवाहीला बगल देण्यात आली असून पर्यावरण संरक्षणाची सर्व पथ्येही धुडकावण्यात आली आहेत. खारफुटीच्या जंगलांचा नाश आणि किनाऱ्याजवळील पाण्याच्या मोठ्या भागातील जलप्रदूषण यांमुळे मच्छिमार बेकार झालेले आहेत. या वस्तुस्थितीवर कडक ताशेरे ओढून पर्यावरणतज्ज्ञ समितीने 'अदानी ग्रुप'ला दोनशे कोटी रुपये इतका दंड ठोठावला आहे.

ज्या पर्यावरण तज्ज्ञ समितीने 'अदानी ग्रुप'वर अनियमितता आणि पर्यावरण हानीचा ठपका ठेवला, त्या समितीचे सदस्य या विषयातील चांगले जाणकार आणि नि:पक्षपाती म्हणून विश्वासार्ह मानले जातात. त्यांच्या निर्णयाबाबत माझ्या मनात तर कोणतीच शंका नाही, पण भारतीय राजकारणाचे बहुध्रुवीय स्वरूप पाहता केंद्रीय मंत्रालयाने मुद्दाम हा भाजप नियंत्रित राज्याचा मुद्दा उपस्थित केला असे कोणाला वाटणेही स्वाभाविक आहे. कारण भारताच्या संपूर्ण पश्चिम किनाऱ्यावर मोठमोठ्या उद्योगसंस्थांनी राजकीय नेत्यांबरोबर विकसित केलेल्या आपल्या हितसंबंधांचा वापर करून स्थानिक शेतकरी आणि मच्छिमार यांना तेथील जमीन आणि पाणी यांच्यापासून दूर हुसकावून लावून त्यांच्यामधील असंतोष तर वाढवला आहेच; पण पर्यावरणाचा विध्वंसही चालविला आहे. महाराष्ट्रातही काँग्रेस आणि राष्ट्रवादी राजकारण्यांनी सहमतीने औद्योगिक प्रकल्पांशी असणारे आपले लागेबांधे सांभाळण्यासाठी कोकण किनारपट्टी आणि पश्चिम घाट प्रदेश यांत जो धुडगूस घातला आहे त्याच्या चौकशीसाठी केंद्र सरकारने अशीच एक तज्ज्ञ समिती महाराष्ट्रात पाठविली तर तेथील विस्थापित केल्या जाणाऱ्या बऱ्याच सामान्य नागरिकांना दिलासा मिळेल.

अदानींवर तज्ज्ञ समितीने केलेला प्रहार अप्रत्यक्षपणाने मोदींच्या वर्मी लागल्यास नवल नाही, पण 'आशियायी सिंहा'साठी 'गीर'खेरीज आणखी एक वसतिस्थान असले पाहिजे हा सर्वोच्च न्यायालयाचा अगदी अलीकडचा निर्णय मोदींच्या अहंमन्यतेवर आणखी एक प्रहार करून गेला. (भारतात गीर या एकाच ठिकाणी सिंहांची वस्ती असल्यामुळे सुरक्षेसाठी आणखी एखादे ठिकाण त्यांच्यासाठी निवडले जावे अशा याचिकेवरील न्यायालयाचा हा निर्णय) या प्रस्तावामागे देशातील अनेक वन्यजीवविषयक प्रसिद्ध निरीक्षक, अभ्यासक होते. या सिंहांचे निवासक्षेत्र फक्त गुजरातमधील गीर जंगलापुरतेच मर्यादित ठेवणे, हे त्या प्रजातीच्या दीर्घकालीन अस्तित्वाच्या आड येणारे असल्यामुळे त्यांच्यासाठी दुसरे एखादे निवासस्थान शोधण्याची गरज राष्ट्रीय वन्यजीवन कृतियोजना या संस्थेने अग्रक्रम म्हणून मांडली. एखाद्या रोगाची साथ, धरणीकंपासारखे नैसर्गिक संकट अथवा गीर जंगलाला लागलेला एखादा मोठा वणवा यांच्यामुळे एकत्र राहणारी ही वन्यपशु जमात सर्वच्या सर्व नष्ट होऊन जाईल अशी या अभ्यासकांना भीती वाटते. १९९४ मध्ये सेरेन्मिती येथे फैलावलेल्या एका विषाणूने एक हजाराहून अधिक सिंहांचा बळी घेतला याची आठवण हे अभ्यासक करून देतात.

दिव्य भूषण आणि महेश रंगराजन् या इतिहास अभ्यासकांनी अत्यंत बारकाईने आशियायी सिंह या प्राण्याचा भूतकाळ आणि वर्तमानकाळ यांचे संशोधन केले आहे. त्यांच्या संशोधनाचे सार असे आहे की, एकेकाळी मध्य आणि उत्तर भारताच्या बऱ्याच मोठ्या भागात या वन्य पशूंच्या जाती अस्तित्वात होत्या. कालांतराने गवताळ प्रदेशाचे रूपांतर शेतजमिनींमध्ये होऊ लागले. अनेक शतकांचा कालावधी लोटल्यानंतर शेतीव्यवसाय जसा त्या प्रदेशात स्थिरावला तसतशी त्या प्रदेशात माणसांची वस्ती वाढल्यामुळे अर्थातच वन्यपशूंची संख्या घटत गेली. दुसरे कारण म्हणजे, नंतरच्या काळात राजे-महाराजे व नबाब येथे शिकारीसाठी येऊ लागले आणि सिंहाची शिकार करून त्याचे डोके 'ट्रॉफी' म्हणून मिरवण्याचा त्यांचा छंद या प्रदेशातील सिंहांची संख्या बरीच कमी करून गेला. १९व्या शतकाच्या उत्तरार्धात तर सिंह फक्त गीरच्या जंगलापुरतेच मर्यादित राहिले. हा प्रदेश तेव्हा जुनागढ संस्थानामध्ये नबाबाच्या आधिपत्याखाली होता. सिंहाची शिकार करून आपल्या व्यक्तिगत संग्रहालयात त्याचे मस्तक विशेष 'ट्रॉफि' म्हणून प्रदर्शित करण्याच्या अपेक्षा धरणारे अनेक ब्रिटिश वासाहतिक अधिकारी आणि त्यांचे सहकारी शिकारी यांना या नबाबाने प्रतिबंध करून येथील सिंहांना वाचविले आणि या कामात त्या नबाबाला कर्झन नावाच्या ब्रिटिश व्हॉईसरॉयने पाठीशी घातले. निसर्ग संवर्धनाची विशेष जाण असलेल्या अशा दुर्लभ राज्यकर्त्यांपैकी लॉर्ड कर्झन हा एक होता. जेव्हा कर्झन एखादे शिकारीचे आमंत्रण नाकारीत असे, तेव्हा त्याने घालून दिलेला रिवाज म्हणून नबाब व इतर राजे-महाराजे, त्याचप्रमाणे ब्रिटिश सैन्यातील व प्रशासनातील अधिकारी यांनाही शिकारीस प्रतिबंध करीत असे.

अशा तऱ्हेने एक मुस्लिम युवराज आणि एक साम्राज्यवादी ब्रिटिश अधिकारी यांनी गीरचे सिंह वाचविले, त्याबद्दल त्यांचे आपण आभार मानले पाहिजेत, पण या सिंहांचे भविष्य अद्यापही सुरक्षित होऊ शकलेले नाही. १९८० सालापासून गीरमधील आठ-दहा सिंहांचे पुनर्वसन करण्याच्या उद्देशाने वैज्ञानिकांनी अनेक ठिकाणांची पाहणी केली. या प्रयोगातून या

वन्य प्रजातीचे अस्तित्व दीर्घकाल टिकून राहण्याचा संभव वाढीला लागावा या दृष्टीने त्यांचे निवासस्थान सहायक आणि निर्धोक असले पाहिजे असे त्यांचे प्रयत्न चालू होते. तेव्हाच मध्य प्रदेशातील कान्हा? अभयारण्याची जागा ही या सिंहांसाठी सर्व दृष्टींनी योग्य अशी जागा आहे अशी खात्री वन्यजीव तज्ज्ञांना वाटू लागली आहे. त्या ठिकाणी भरपूर मोकळी जागा तर आहेच; पण सिंहांना खाद्य म्हणून लागणारी चतुष्पाद जनावरेही- हरणांसारखी- इथे भरपूर आहेत. या वन्यजीव तज्ज्ञांनी मांडलेला 'कानो' अभयारण्य प्रस्ताव केंद्रीय पर्यावरण मंत्रालयाने लगेचच मंजूर केला आणि गुजरात सरकारला या सिंहांच्या स्थलांतरासाठी आवश्यक ते साहाय्य देण्याची विनंती केली. तथापि, या प्रस्तावाला गुजराती जनता अशा प्रकारचे सहकार्य देण्यासाठी तयार नव्हती. त्यामुळे सर्वोच्च न्यायालयानेच या प्रकरणी हस्तक्षेप करावा अशी जनहित याचिका न्यायालयात दाखल करण्यात आली.

जेव्हा या याचिकेची सुनावणी उच्च न्यायालयासमोर चालू होती तेव्हा नरेंद्र मोदींनी आपल्या मतदारसंघात जनतेला एक जाहीर अभिवचन दिले की, 'गीरचे सिंह गुजरात सोडून बाहेर कोठेही जाणार नाहीत.' फेब्रुवारी २०१० मधल्या एका वृत्तानुसार सर्वोच्च न्यायालयातील वाद-प्रतिवाद ऐन भरात आले असताना मोदींनी राज्य विधिमंडळातून- ज्याचे कामकाज त्यावेळी सुरू होते- सूट घेऊन गुजरात राज्य वन्यजीव मंडळाच्या बैठकीत अध्यक्ष म्हणून उपस्थिती लावली. या बैठकीत सर्वोच्च न्यायालयाच्या हरकती खोडून काढण्याच्या दृष्टीने विचारविनिमय चालू होता.

गुजरात सरकारने न्यायालयाला सादर केलेल्या निवेदनात प्रथम सिंहांच्या स्थलांतरासाठी आवश्यक असलेल्या शास्त्रीय पुराव्यामध्ये अनेक छिद्रे दाखविण्याचा प्रयत्न केला. पण न्यायालयाला ते पटले नाही. कारण बहुसंख्य तज्ज्ञांचे असे मत होते की, १. एकाच जागेत बंद करून ठेवणे त्या प्राण्यांना इजा करणारे आहे. २. कानो हे स्थान हाच योग्य पर्यायी निवास त्या वन्य प्राण्यांसाठी उपलब्ध आहे. हे न्यायासनासमोर आल्यावर गुजरात सरकारने चाल बदलली. त्यांनी प्रतिवाद केला की, वाद-विषय हा वैज्ञानिक चर्चेच्या पलीकडचा आहे. ते सिंह गुजराती जनतेच्या कुटुंबाचा आणि समाजाचाच एक भाग आहेत आणि कुटुंब किंवा समाज सदस्य यांच्याशी जेव्हा संबंध येतो तेव्हा कोणताही प्रश्न केवळ तर्क किंवा कारणमीमांसा यांच्याआधारे सुटू शकत नाही.

१५ एप्रिल २०१३ या दिवशी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निवाड्यात गुजरात सरकारने केलेले 'आशियायी सिंह हा कुटुंबाचा घटक मानला गेला असल्यामुळे त्याला दूर करता येणार नाही' हे विधान अवैज्ञानिक म्हणून नाकारले. देशातील सर्वोच्च वन्यजीव तज्ज्ञांनी जो पुरावा सादर केला त्याच्याआधारे कानोमध्ये सिंहांना वावरण्यास, त्यांच्या आहारासाठी भक्ष्याची भरपूर तरतूद असल्याचा निष्कर्ष सर्वोच्च न्यायालयाने काढला. सिंहांच्या पुनर्वसनासाठी आवश्यक ती सर्व तयारी मध्यप्रदेश सरकारने केली आहे. त्यामुळे गीर जंगलातून कानो येथे सिंहांना हलविण्यासाठी पर्यावरण आणि वनमंत्रालयांनी ताबडतोब पावले टाकावीत व त्यांना तेथे सुस्थिर करण्यासाठी विशेष लक्ष द्यावे असा आदेश सर्वोच्च न्यायालयाने दिला. मंत्रालयाने तज्ज्ञांची एक समिती नव्याने नेमून स्थलांतर करण्यात येणाऱ्या सिंहांची संख्या आणि स्थलांतराची साधने व व्यवस्था या सर्व गोष्टी त्यांच्या सल्ल्याने कराव्यात असा आदेशही न्यायालयाने दिला. आपल्या हुकुमाची अंमलबजावणी आजपासून सहा महिन्यांच्या अवधीत शब्दश: आणि अर्थपूर्ण रीतीने करण्यात यावी असा या संबंधातील अंतिम आदेश न्यायालयाने काढला आहे.

गीर जंगलामधील सिंहांच्या पुनर्वसनास असलेला मोदींचा विरोध हा त्यांच्या प्रादेशिक अस्मितेच्या वेळोवेळी होणाऱ्या उद्रेकाचाच एक देखावा आहे. गुजरातची अस्मिता त्यांच्या या 'प्रिय' सिंहांना देशात इतरत्र कोठेही पाठविण्याच्या विरोधात आता उभी आहे. पण मोदींनी हवा दिलेला हा गुजराती अहंकार कदाचित त्या सिंहांच्या अस्तित्वालाच धोकादायक ठरणारा आहे. आशियायी सिंह या विषयावरील एक तज्ज्ञ डॉ.रवि चेल्लम् यांना नुकतेच गीरच्या जंगलातून बाहेर हुसकावण्यात आले. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या विरोधात तेथे चालू असलेल्या आंदोलनातून संघर्ष पेटू नये म्हणून गुजरात वनमंत्रालयाने ही कारवाई केल्याचे सांगण्यात येते. (कारण न्यायालयाच्या निकालात डॉ.चेल्लम् यांचा उल्लेख सिंहाच्या पुनर्वसनास अनुकूल असणारे असा करण्यात आला होता.) गीर जंगलातून सिंह हलविण्याच्या कोणत्याही हालचालीला कसून विरोध करण्यासाठी गुजराती एनजीओज सरसावले आहेत. राज्य सरकारने त्यांना ताबडतोब थोपविण्याची आवश्यकता आहे, कारण सर्वोच्च न्यायालयाच्या या संवेदनशील, विचार व विवेक यांच्यावर आधारलेल्या आणि वैज्ञानिक भूमिका असणाऱ्या निर्णयाची जलद व चोख अंमलबजावणी होणे गरजेचे आहे.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.



कालपरवा
१३

रामचंद्र गुहा

# राष्ट्ररचनेतील गूढ

चीनच्या दक्षिण किनाऱ्यावरील सीयामेन (शांघाय) हे शहर नवचीनच्या कर्तृत्वाचे प्रतीक म्हणून जगासमोर प्रदर्शित केले जाते. हे केंद्र तैवान बेटासमोर उभे आहे. परदेशातील चिनी नागरिकांप्रमाणे तैवानी नागरिकांचीही या शहरात भरपूर गुंतवणूक आहे. रुंद रस्ते, चांगल्या रीतीने फरसबंद केलेले पदपथ, रस्त्याच्या दोनही बाजूंना उभ्या असलेल्या भव्य आणि चिरकाल टिकण्याची ग्वाही देणाऱ्या भक्कम इमारती. हे सर्व पाहून कोणत्याही भारतीयाला न्यूनगंड यावा आणि आपल्या देशातील राजकारणी, मंडळींची चीड मनात दाटून यावी, या अंदाजाने जणू रचना केलेले हे ठिकाण!

सीयामेनमध्ये प्रवेश करण्यासाठी 'जगातील दुसऱ्या क्रमांकाचा सर्वांत मोठा झुलता पूल ओलांडून आम्ही पुढे गेलो. त्यानंतर जाताना अशियातील दुसऱ्या क्रमांकाचे भव्य सभागृहही पाहून घेतले. शहरामध्ये उभारलेल्या सार्वजनिक शिल्पाचे प्रमाण तर अवाक् करण्याइतके पण त्या शिल्पांचे विषय आणि दर्जा सुमार वाटण्याजोगा. आमच्या हॉटेलच्या बाहेरच्या चौकात गणवेषातील सैनिकांच्या रांगांचे शिल्प होते. काहींच्या हातात रोखलेल्या बंदुका होत्या. किमान दोन शिल्पे हातात हँडग्रेनेडस् घेतलेली. सर्व शिल्पे काळ्या दगडांत कोरलेली; एका रांगेत एका छोट्या टेकडीच्या दिशेने चाललेली, आणि त्या टेकडीवर दोन शिरस्त्राण घातलेल्या व्यक्ती जनतेच्या प्रजासत्ताकाचा (पीपल्स रिपब्लिक) ध्वज रोखण्यासाठी सज्ज झालेल्या! असे हे 'भव्य' शिल्प!

पण अशी शिल्पे हा चिनी शहरांचा अविभाज्य भाग आहेत, असे मला चीनबद्दल मार्गदर्शन करणाऱ्या माझ्या यजमानांनी सांगितले. गाव लहान-मोठे कसेही असो, तेथील सार्वजनिक चौक गणवेशातील सैनिकांच्या शिल्पांनीच सुशोभित केलेले आहेत. आणि ते साहजिकच आहे म्हणा! चीनला त्याचे स्वातंत्र्य आणि देशाची एकसंधता यांसाठी प्रदीर्घ रक्तरंजित संघर्ष, जपान आणि पाश्चात्य वसाहतवादी देशांबरोबर, दीर्घकाळपर्यंत करावे लागले आहेत. चिनी जनतेची मुक्तिसेना (पीपल्स लिबरेशन आर्मी) हे जगातील सर्वांत मोठे आणि प्रबळ खडे सैन्य म्हणून ओळखले जाते. पण माझ्यासारख्या भारतीय पर्यटकाच्या सतत दृष्टिसमोर असणाऱ्या 'ग्यारा मूर्ती' या शिल्पाच्या अगदी विरोधी असे हे धष्टपुष्ट गणवेशधारी सैनिकांचे शिल्प होते. नवी दिल्लीत सरदार पटेल मार्ग आणि मदर तेरेसा क्रिसेंट या रस्त्यांच्या संगमावर उभे असलेले, देवीप्रसाद रॉय चौधुरी यांनी कोरलेले 'ग्यारा मूर्ती' हे शिल्प दांडी यात्रेत मिठाच्या सत्याग्रहासाठी निघालेले महात्माजी आणि मागोमाग त्यांचे अनुयायी अशा अकरा जणांचे आहे. या मोर्चाचा नेता एक वृद्ध आहे. हातात जाड काठी घेऊन तो पुढे चालला आहे आणि त्याच्या मागोमाग जाणारे लोक आहेत. शारीरिक निकषावर तरी त्यांना सुदृढ भारतीय म्हणणे कठीण आहे.

भारताला अहिंसक लढ्यामधून स्वातंत्र्य मिळाले ही वस्तुस्थिती धाडस व शौर्याचा उदो उदो करणाऱ्या कथा, ब्रिटिश वसाहतवादाला झालेल्या सशस्त्र प्रतिकाराची परंपरा इत्यादी गोष्टींचे दाखले देऊन धूसर करण्याचा प्रयत्न केला जातो. भगतसिंगाची तिरकी हॅट आणि सुभाषचंद्रांचा खाकी गणवेश यामध्येही या कथा गुरफटलेल्या असतात. त्या सांगणाऱ्या डाव्या धर्मनिरपेक्षवाद्यांना कधीकधी गांधीविरोधी धर्मवाद्यांचीही साथ मिळते. ते त्या संदर्भात आपल्यासमोर विवेकानंद आणि वि. दा. सावरकर यांचे आदर्श उभे करतात. भारतातील गावात सर्वसाधारण दुकानांतून विवेकानंद आणि सुभाषचंद्र बोस किंवा अगदी भगतसिंग यांची सुद्धा जितकी छायाचित्रे किंवा कॅलेंडर्स लावलेली दिसतात, त्याच्या निम्म्यानेही गांधींची दिसत नाहीत. पण चीनमध्ये मात्र देशाचा जो इतिहास आणि त्याच्या घडणीच्या गूढ कथा एकदा राष्ट्राने मान्य केल्या आहेत त्यांचा प्रतिकार झालेला दिसत नाही. कदाचित

चीनमध्ये लोकशाही नाही आणि त्यामुळे सरकारी पातळीवर सांगितल्या जाणाऱ्या हकीगती बद्दल उघड प्रश्न विचारण्याचा नागरिकांना अधिकार नाही म्हणून असेल; किंवा मुक्तिसेनेच्या सामर्थ्याचा धाक असेल; म्हणून म्हणा, किंवा अद्यापही आपल्या राष्ट्राला परकीयांकडून गंभीर उपद्रव होण्याचा संभव आहे असे लोकांना वाटल्यामुळे म्हणा, या देशाच्या स्वातंत्र्यलढ्याच्या इतिहासाबद्दल कोणतेच दुमत व्यक्त केले जात नाही.

सीयामेनमधून जात असताना लोककलेचा आणखी एक नमुना अनुभवाला आला. पूर्वीसारखाच 'स्फूर्तिदायक' म्हणून उभारलेला. या वेळेला चीनचा राष्ट्र म्हणून झालेल्या उदयचा संदर्भ त्या कलाविष्काराला नव्हता, तर जागतिक व्यासपीठावर चीनच्या आगमनाची वर्दी देणारा होता. जगातील सर्वांत देखणी मॅरॅथॉन स्पर्धा फक्त या शहरातच पाहायला मिळते असा आमच्या गाईडचा अभिप्राय होता. पण हे खरे नव्हते. कारण गूगलच्या माहितीप्रमाणे तो विक्रम केपटाऊन मॅरॅथॉनचा होता. तरीही मॅरॅथॉनचा येथील मार्ग फारच निसर्गरम्य होता. समुद्रकिनाऱ्याशी समान्तर असा बांधीव फरशांचा मैलोन मैल लांबीचा तो मार्ग होता. त्याच्या एका बाजूला म्हणजे समुद्राच्या बाजूला वाऱ्याच्या मंद झुळुकांवर डोलणारी पामची झाडे, तर दुसऱ्या बाजूला समुद्राला सन्मुख असणारे मोठ-मोठे बंगले, इमारती व अलिशान हॉटेल्स. कदाचित याची बरोबरी कॅलिफोर्नियाच्या किंवा केपटाऊनच्याही लाँग बीचशी होऊ शकली असती, पण याच दृश्याच्या बरोबरीने प्रदर्शित केलेली ती शिल्पे नसती तर! रस्त्यांच्या दोन बाजू अलग करणारा लांबवर पसरलेला हिरव्या गवताच्या पट्टा आणि त्याला सजवणारी विविध प्रकारची शिल्पे गडद रंगांच्या दगडांत कोरलेली. त्यांतील एक सर्वांत पुढे धावणाऱ्या स्पर्धकाचे. पुढे धावणाऱ्यांशी स्पर्धा करण्यासाठी पळताना त्याने पुढे झोकून दिलेले त्याचे शरीर; दुसरा स्पर्धक मध्येच क्षणभराचा विसावा दोन हातांतील बाटलीतले घेण्यासाठी पाणी डोक्यावर ओतून घेत असलेला; तिसरा स्पर्धक ज्याची बेसबॉल कॅप वर वळवलेली होती (बहुधा तो अमेरिकन आहे, असे सूचित करायचे असावे) आणि चौथा दाट कुरळ्या केसांचा, आफ्रिकन – म्हणण्यापेक्षा या आन्तरराष्ट्रीय स्पर्धेला आवश्यक ते इथियोपियन परिमाण देणारा स्पर्धक. या सर्वांच्या पुढे धावणारे दोघे साध्याच कपड्यांतले, कॅमेऱ्यामध्ये डोळे घालून बसलेले, प्रसार माध्यमांचे फोटोग्राफर्स. पुढच्या पिढ्यांसाठी ही दृष्ये आपल्या कॅमेऱ्यात चित्रबद्ध करीत होते.

सीयामेनमधील तो लांबलचक देखणा पूल, भक्कम आणि रेखीव इमारती, कचऱ्याची काडीही नसलेले स्वच्छ रस्ते यांनी माझ्यावर टाकलेली भुरळ या 'मॅरॅथॉन' दृश्याने थोडी उतरविली. त्या दृश्याने, खोलवर रुजलेली सांस्कृतिक असुरक्षितता, अस्वस्थता उघड केली असे मला वाटले. न्यूयॉर्क, पॅरिस किंवा लंडन मॅरॅथॉनची दृश्ये अशीच प्रदर्शित केली जात असतील काय, असा विचार माझ्या मनात आला. पण या शहरांना असा जागतिक संदर्भ मिळवण्याची आवश्यकताच काय? त्यांच्याकडे जगातील सर्व देशांतून खेळाडू येतात हे वास्तव म्हणजे त्यांच्या लेखी त्यांचा मोठेपणा मिरवण्याची बाबच नाही. (संगीतप्रेमी, गायक, वादक, कलावंत, वैज्ञानिक, लेखक आणि पाककुशल या सर्वांच्याही बाबतीत हेच लागू). तिथे त्या त्या ठिकाणच्या मॅरॅथॉन्स स्थानिक सांस्कृतिक इतिहासाला उजाळा देत असतात; त्याचबरोबर या शर्यतींमुळे निर्माण होणारे तात्पुरते घोटाळेही निवारत असतात.

मार्गावर आमची बस मध्येच थांबली; हातपाय ताणून बसल्या जागी आळस देऊन समोर दिसणाऱ्या सागराकडे आकर्षित झालेले प्रवासी उठून किनाऱ्यावरच्या चौपाटीवर गेले. बसमध्ये बसलो असताना माझे लक्ष बाहेरच्या एका मोठ्या काँक्रीट फलकाकडे गेले.

गाडीतून ती काँक्रीटची खूण नीट दिसत नव्हती. पण रस्त्यावर उतरून पाहिल्यावर तिच्यापुढे ते 'मॅरॅथॉन स्पर्धक' एकदम खुजे वाटले. कारण खूप उंच आणि भक्कम अशा काँक्रीटच्या खांबांवरचा त्या आडव्या निशाणीचा दोनशे मीटर्स रुंदीचा सिमेंटचा बॅनर तैवानच्या खाडीची दिशा दाखवीत होता. त्यावर चिनी अक्षरांत काही मजकूर होता. मी त्याबद्दल माझ्या चिनी जाणणाऱ्या सहकारी प्रवाशाला विचारले, तेव्हा त्याने वाचून मला सांगितले की ते डेंग झिपाओ पिंगचे सुप्रसिद्ध वचन आहे, ''एकच देश... दोन व्यवस्था'' १९८० च्या दशकात डेंगने हाँगकाँग, मकाव आणि तैवान या आजूबाजूच्या प्रदेशांना चीनच्या मुख्य भूमीशी पुन्हा एकरूप होण्यासाठी केलेले हे आवाहन होते. भांडवलदारांनी विळखा घातलेली ही बेटे. चीनशी संलग्न होण्याचा निर्णय त्यांनी घेतल्यावरही राजकीय स्वायत्तता झाली तरी त्यांचे आर्थिक स्वातंत्र्य अबाधित राहील, असे आश्वासन या घोषणेतून दिले गेले होते.

मकाव आणि हाँगकाँग हे प्रदेश त्यानंतर बीजिंगच्या अंमलाखाली 'विशेष प्रशासकीय भाग' (सोशल ॲडमिनिस्ट्रेटिव्ह रीजन्स) म्हणून पीपल्स रिपब्लिक ऑफ चायनामध्ये दाखल झाले. पण तैवानने मात्र या आवाहनाला अद्याप प्रतिसाद दिलेला नाही, ते दूरच राहिले. गोड शब्दांत



चीन कडून मिळणाऱ्या धमक्या आणि शाब्दिक मारझोड पचवत तैवानची बंडखोरी चालू आहे. सीयामेनच्या जवळपासची बेटे आणि प्रदेश तर किनाऱ्यावरील या निशाणीने उजळलेला होताच. पण तैवानमधील पर्यटकांच्या बोटी आणि विमानातून जाणारे प्रवासी यांनाही हा संदेश मिळावा अशी बहुधा योजना निशाणीच्या त्या प्रखरतेमागे असावी.

चीनने लोकशाहीचा स्वीकार केलेला नाही. त्यामुळे कम्युनिस्ट पक्षाने चीनच्या इतिहासाची जी मांडामांड केली आहे, तिला सार्वजनिक किंवा सामूहिक आव्हान मिळण्याची शक्यताच नाही. पण चिनी जनतेतून काही व्यक्तिगत आणि खासगी पातळीवरून आक्षेप घेतले जाताना दिसतात. चीनमधील विचारवंतांमध्ये आणि मानवी हक्क संरक्षक कार्यकर्त्यांमध्ये भारतातील गांधींबद्दल एक कुतूहल वाढत चाललेले दिसत आहे. गांधींचा आंतरधर्मीय सुसंवाद आणि ‘अहिंसा’ तत्त्वज्ञानाशी असलेली प्रतिबद्धता (कमिटमेंट) या गोष्टींचा त्यांच्यावर मोठा प्रभाव दिसतो.

अगदी अलीकडच्या एका चीन भेटीत एका नामवंत चिनी ब्लॉगरच्या ‘होम पेज’वर मी गांधींचे चित्र पाहिले. चीनमधील नोबेल पारितोषिक विजेते लिऊ शियाबाओ- जे नागरिक स्वातंत्र्याच्या हक्कासाठी केलेल्या संघर्षामुळे चीनमध्ये सध्या बंदिवान आहेत- गांधींचे चाहते आहेत. हार्वर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने अलीकडेच प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या काही लेखांचा ‘नो एनिमीज्, नो हेट्रेड’ या नावाचा ग्रंथ प्रकाशित झाला आहे. त्याचे नावच गांधींची आठवण करून देणारे आहे. या पुस्तकात गांधींच्या थोरपणाची जाणीव अनेक संदर्भांतून करून दिली गेलेली आहे. जानेवारी २००० या महिन्यात लिहिलेल्या एका लेखात लिऊ शियाबाओ लिहितात -

‘‘कम्युनिझमच्या भयानक राजवटीचे सावट पडलेल्या जगातील इतर देशांप्रमाणे चीनमधील आम्हा विरोधकांचे पुरेसे मूल्यमापन झालेले नाही, असे वाटते- इतकी असंख्य वर्षे कारण शोक पर्यवसायी परिस्थितीशी सामना करीत असतानाही वक्लाव हॉवेल सारखा नेता आम्हांला अद्याप लाभलेला नाही. सामान्य माणसांना आपल्या हितसंबंधाच्या रक्षणासाठी हौतात्म्य पत्करणाऱ्या एका नीतिमान महापुरुषाची जरुर भासते ही वस्तुस्थिती विपरीतच म्हणावी लागेल. शांततापूर्ण स्वातंत्र्य म्हणजेच सरकारच्या दबावापासून मुक्ती मिळविण्यासाठी सक्रिय प्रतिकारासाठी इच्छाशक्ती तीव्र बनली पाहिजे. इतिहास आपले नशीब लिहीत नाही. लोकांसमोर येणारा एखादा हुतात्माही देशातील चैतन्य वाढवून किंवा जनमानसात बदल घडवून देशाला नैतिक बळ मिळवून देऊ शकतो. गांधी ही अशी एक व्याक्ती होती.

भारतात असलेल्या अनेक माओवाद्यांचा त्यातल्या त्यात कमी हिंसक असा एक कार्यक्रम आहे. तो म्हणजे गांधींचे पुतळे किंवा स्मृतिस्थळे उद्ध्वस्त करणे. त्यामुळे चीनमध्ये काही गांधी प्रेमी आहेत, ही वस्तुस्थिती मनाला उमेद देणारी वाटली. या गांधीवाद्यांचे माओ आणि त्याचे वारसदार यांना असलेले आव्हान सशस्त्र संघर्षाचे नसून अहिंसक सक्रिय प्रतिकाराचे आहे, ही गोष्ट आशादायक आहे.



कालपरवा
१४

रामचंद्र गुहा

# उद्यानातले सर्प

मला 'टाय' परिधान करायला आवडत नाही, अगदीच नाईलाज झाला तर तो मी बांधतो. एके दिवशी ऑक्सफर्डला विद्यापीठामध्ये शिकत असताना एका विशेष भोजनप्रसंगी मी तो बांधून 'ऑल सेल्स कॉलेज'ला गेलो. माझ्या समोरच्या बाजूला एक इस्रायली विद्यार्थी (ज्याला नुकतीच विद्यापीठात नोकरी मिळाली होती) बसला होता. तिथले रीतीरिवाज आपल्याला किती परिचयाचे आहेत, हे दाखविण्याचा त्याचा प्रयत्न चालू होता. त्याने तेथील काहींची नावे विशेष परिचयाची असल्याप्रमाणे घेतली आणि 'बोडले' ग्रंथालयाच्या हस्तलिखित संग्रहाची आपल्याला किती माहिती आहे हेही तो सांगत राहिला. पण हे सर्व चालू असताना मी बांधलेल्या 'टाय'कडे तो एकटक बघत होता; निरीक्षण करीत होता. शेवटी जेव्हा त्याला त्याचे कुतूहल आवरणे अशक्य झाले तेव्हा टेबले ओलांडून तो सरळ माझ्याजवळ आला आणि माझा टाय हातात घेऊन एखाद्या जाणकाराप्रमाणे निरीक्षण करत त्याने मला विचारले, 'हा मॅग्दालिन आहे?'

मी काहीच उत्तर दिले नाही. देणार तरी कसे? कारण एका मोठ्या ऑक्सफर्ड कॉलेजच्या सभासदत्वाची मिरवण्यासारखी ती खूण नव्हतीच मुळी! बंगलोरच्या फ्रेंडस् युनियन क्रिकेट क्लब यासारख्या एका किरकोळ संस्थेची ती एक निशाणी होती. १९६३ साली फक्त पाच वर्षांचा असताना मी त्या क्लबकडे प्रथम दाखल झालो आणि त्याचे कारण एन.दुरायस्वामी नावाचे माझे मामा त्या क्लबतर्फे खेळत असत. एका हाताने खेळणारे क्रिकेटपटू म्हणून त्यांचा लौकिक होता. मी त्यांच्याबरोबर दररोज सरावासाठी जात असे; नेटजवळ उभा राहून खेळ पाहत असे. मग दिवसाच्या शेवटी खेळ संपताना साधारण बारा यार्डांच्या अंतरावरून ते मला बोलींग करायला लावीत. मी दहा वर्षांचा झालो तेव्हा मॅट अंथरून खिळ्यांनी ती जमिनीला ठोकून टाकण्याच्या कामी माझी मदत त्यांना होत असे. मी वयात आलो तोपर्यंत इतरांप्रमाणे मीही व्यवस्थित अंतरावरून बोलींग करू लागलो होतो.

एक मुलगा आणि एक तरुण म्हणूनही माझा फ्रेंडस् युनियन क्रिकेट क्लब (एफ.यू.सी.सी) बरोबरचा संबंध अधूनमधूनच राहिला. कारण ती सर्व वर्षे माझा मुक्काम उत्तर भारतात होता आणि उन्हाळ्याच्या आणि हिवाळ्याच्या सुट्ट्यांत मी बंगलोरला येत असे. १९९४ मध्ये मी कायमचा बंगलोरवासी झालो. गेल्या वीस वर्षांत एफ.यू.सी.सी.ने तीन वेळा 'फर्स्ट डिव्हिजन चॅम्पियनशिप' जिंकल्याचे मी पाहिले आहे. त्याचबरोबर किती तरी तरुण खेळाडू या क्रिकेट



खरे सांगायचे तर मला सुरुवातीपासून आय.पी.एल.सामने हे उभे-आडवे- सर्व बाजूंनी भ्रष्टाचाराचे उगमस्थान वाटतच होते. त्याचमुळे बंगलोरमध्ये त्याच सामन्यात असलेला मुक्त प्रवेशाचा हक्क मी नाकारला होता. पण जसजसे या स्पर्धांचे अंतरंग माझ्यासमोर उलगडत गेले तेव्हा समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून मला या सामन्यांत फाटाफुटीची बीजे खोलवर पेरली जाण्याची क्षमता आढळली. दक्षिण आणि पश्चिम भारतातील शहरांमधल्या श्रीमंत आणि वरच्या वर्गांतील लोकांसाठी हे सामने म्हणजे एक तमाशा होता. ग्रामीण भागात आणि भारतातील छोट्या गावांमध्ये ते फारसे पोचलेच नाहीत. त्याचप्रमाणे दाट लोकवस्तीच्या मध्य प्रदेश व उत्तर प्रदेशातही त्यांचा प्रवेश झाला नाही, कारण रणजी ट्रॉफीचे विक्रम दाखवणारा त्यांचा इतिहास त्यांच्याबरोबर होता. या राज्यांत आय.पी.एल. संघ तयारच झाले नाहीत. महाराष्ट्रात आय.पी.एल.चे दोन संघ, या सामन्यांची ओळख सत्ता आणि संपत्ती यांच्यामध्ये गुरफटलेले अशीच करू देत होते.



ग्राऊंडवर तयार होऊन रणजी ट्रॉफीसाठी राज्याचे प्रतिनिधित्व करायला गेलेले मी पाहिले आहेत. माझ्या क्लबमधून दोन आंतरराष्ट्रीय स्तरावरील खेळाडू आणि किमान पंधरा खेळाडू कर्नाटक राज्याचे म्हणून नावाजलेले पाहिले आहेत. त्यांचा माझा व्यक्तिगत परिचय आहे आणि त्यांना खेळतानाही मी पाहिले आहे.

एन.दुरायस्वामी गेली चाळीस वर्षे एफ.यु.सी.सी.चे संघनायक (कॅप्टन) किंवा व्यवस्थापक राहिले आहेत आणि त्यामुळेच या संस्थेचे नाव क्रिकेटच्या क्षेत्रात आणि नैतिक शिष्टाचारांच्या संबंधात कायम वरच्या क्रमांकावर राहिले आहे. या क्लबमधील कोणत्याही क्रिकेट खेळाडूने राज्य पातळीवरील निवडीसाठी वशिला लावण्याचा प्रयत्न केलेला नाही. खेळाडूंचे इतर संघ आपण या स्पर्धेतून बाजूला राहू नये म्हणून सामन्यांची तडजोड करण्याची तयारी दाखवतात, तेव्हा एफ.यु.सी.सी. या सर्व तंत्र-मंत्रापासून दूरच असतो. यातील खेळाडू सरावासाठीही अगदी वेळेवर येतात; पंचांशी कधी हुज्जत घालत नाहीत आणि खरोखरच काही वेळा अगदी उत्कृष्ट क्रिकेटची झलक दाखवतात.

कर्नाटक क्रिकेट संघाला बळकट करण्यासाठी अनेक क्रिकेट क्लब्ज प्रयत्नशील राहिले. त्यांतील एफ.यु.सी.सी. हा एक; बाकीच्यांपैकी जवाहर्स, क्लिसेंटस्, बी.यु.सी.सी., स्वस्तिक, बंगलोर क्रिकेटिअर्स आणि सिटी क्रिकेटीअर्स हे काही! ज्या कोणी ही क्लब्ज चालवले ती माणसे अत्यंत प्रामाणिक आणि खेळाबद्दल आमूलाग्र माहिती असणारी व त्याचे सर्वांगीण ज्ञान असलेली होती. त्यांनी जे क्रिकेट सादर केले त्यामुळे कर्नाटकात सहा रणजी ट्रॉफी टायटल्स तर त्यांनी आणल्याच; शिवाय अनेक कसोटी सामने आणि एकदिवशीय सामने देशासाठी जिंकून देण्याची भरभक्कम कामगिरीही केली.

यावर्षी एफ.यु.सी.सी.च्या माझ्या सभासदत्वाला पन्नास वर्षे पूर्ण झाली. या कालखंडात एफ.यु.सी.शीच प्रथम माझी क्रिकेटनिष्ठा पूर्ण समर्पित होती. त्यानंतर कर्नाटकाशी व फक्त त्यानंतरच देशाशी-भारताशी. सहा वर्षांपूर्वी आमच्या शहरामध्ये आणि माझ्या जीवनामध्ये एक नवीन क्लब आणि नवीन प्रलोभनाचा प्रवेश झाला. एक अवघड निर्णय मला घ्यावयाचा होता. रॉयल चॅलेंजर, बंगलोरशी नवे नाते जोडून घ्यायचे काय?

पण असे न करण्याचा निर्णय मी घेतला. कारण त्या क्लबच्या प्रवर्तकांबद्दल माझे मत चांगले नव्हते. एफ.यु.सी.सी.च्या एन.दोरायस्वामींच्या तुलनेत अगदी वेगळे असे हे व्यक्तिमत्त्व- विजय मल्ल्या यांचे. ते कधी क्रिकेट खेळले नाहीत- नव्हे, त्यांनी फारसे क्रिकेट पाहिलेही नाही. क्रिकेटचे तंत्र किंवा त्या खेळाचा इतिहास यांच्याबद्दल त्यांना काहीही माहिती नाही. ते या खेळात शिरले ते स्वत:चा अहंकार शमविण्यासाठी. त्या खेळाबरोबर येणारे वैभव आणि कीर्ती यांची भुरळ पडून त्या क्षेत्रातली जागा विकत घेऊन इंडियन क्रिकेटमध्ये त्यांनी प्रवेश मिळवला.

विजय मल्ल्या यांच्याकडे क्रिकेट प्रशिक्षक आणि व्यवस्थापक यांच्या कामासाठी लागणाऱ्या नि:स्वार्थी निष्ठेचा अभाव मला जाणवल्यामुळे रॉयल चॅलेंजर, बंगलोर (आर.सी.बी.) ही माझी टीम असणार नाही हे मी ठरवूनच टाकले. म्हणून जरी मी कर्नाटक राज्य क्रिकेट असोसिएशनचा सदस्य असलो आणि त्यांच्या परिसरात मला मुक्त प्रवेश असला तरी तो हक्क मी फक्त रणजी ट्रॉफी आणि कसोटी सामने यांच्यासाठीच राखून ठेवलेला आहे.

कर्नाटक स्टेट क्रिकेट असोसिएशन (के.एस.सी.ए.) स्टेडियमला त्याचे पूर्वीचे अध्यक्ष एम.चिन्नास्वामी यांचे नाव देण्यात आले आहे. एन.दोरायस्वामींच्या अनेक आदर्शांपैकी ते एक होते. त्यांनी मी मोठा होत असताना श्री चिन्नास्वामींनी स्टेडियम बांधले जात असताना वीट न् वीट ठेवण्यापासून त्या कामावर कशी देखरेख केली याची कथा मला सांगितली होती. या क्रिकेटप्रेमी गृहस्थांनी आपली कायद्याची घसघशीत प्रॅक्टीस सोडून फक्त इमारतीची रचना-शिल्पकौशल्य यांच्या योजना, त्यासाठी लागणारे साहित्य आणि वास्तूची प्रत्यक्ष उभारणी या कामांवर व्यक्तिगत देखरेख करण्यात अनेक महिन्यांचा काळ घालवला. वाढीव किंमतीच्या समस्या किंवा कमिशन वगैरे शिवाय त्यांनी हा सर्व कार्यभार सांभाळला. श्री.चिन्नास्वामी दुसऱ्याही काही बाबतीत आदर्श व्यक्तिमत्त्व होते. के.एस.सी.ए.ची अशाप्रकारे त्यांनी सेवा चालविलेली असताना या सर्व काळात त्यांनी कोणत्याही निवडीच्या प्रकरणात हस्तक्षेप अगर रदबदली केली नाही. नव्हे त्याचा किंचित प्रयत्नही केलेला नाही. नंतर जेव्हा ते बी.सी.सी.आय.चे अध्यक्ष झाले तेव्हा केरी फॅकरचे आव्हान कसोटी सामन्यांचे मानधन त्यांनी दहापटीने वाढवून परतवले. इंडियन क्रिकेटचा कारभार त्यांच्या हाती असताना आपल्या खेळाडूंना प्रथमच आदराने वागवले गेले आणि त्यांच्या वेतनातही लक्षणीय वाढ केली गेली.

बी.सी.सी.आय.च्या अध्यक्षपदावर एम.चेन्नास्वामींचे जे वारसदार आज दिसत आहेत त्यांचा धूर्त हावरटपणा पाहून चेन्नास्वामींनी सद्य परिस्थितीतील या पदाधिकाऱ्यांबद्दल कोणती पावले उचलली असती? त्यांनी आत्मीयतेने बांधलेल्या या वास्तूचा हवा तसा वापर करून घेताना आपल्या

कर्मचाऱ्यांचे पगार थकवणाऱ्या माणसाशी ते कसे वागले असते? नुकत्याच संपलेल्या एप्रिल महिन्यात 'हिंदू' दैनिकाच्या बंगलोरच्या आवृत्तीत पहिल्याच पानावर विजय मल्ल्या यांची कथा पूर्ण पान छापलेली आहे. आर्थिक गुन्ह्यांचा तपास करणाऱ्या स्पेशल कोर्टाने मल्ल्या यांना प्राप्तीकराची ७५ कोटी रुपये बाकी थकविल्याबद्दल समन्स काढले आहे. अनेक स्मरणपत्रे पाठवल्यानंतरही त्यांनी ती बाकी अद्याप भरलेली नाही. मल्ल्या यांच्यासारख्या बलदंड लोकांसाठी नेहमीच नियम वळवणाऱ्या पोलिसांनी कोर्टाला असे कळविले आहे की, कामाच्या बोजामुळे त्यांना समन्स बजावण्यासाठी सवडच मिळत नाही.

पण मला फक्त मल्ल्यांकडेच अंगुलीनिर्देश करायचा नाही. सत्य असे आहे की, आय.पी.एल.च्या सर्व संघांचे जे मालक आहेत (नऊपैकी सात जण), त्यांची चौकशी कोणत्या ना कोणत्या सरकारी यंत्रणेमार्फत, या ना त्या देशात आणि या किंवा दुसऱ्या कोणत्या आर्थिक गुन्ह्याबाबत चालूच आहे. या सर्व गोष्टी धूसर चरित्रनायकांकडून झालेल्या आहेत. म्हणून निखळ व्यावसायिकतेसाठी, औद्योगिक प्रोत्साहन व संशोधन आणि तांत्रिक कुशलतेसाठी प्रख्यात असलेल्या इतर भारतीय कंपन्या आय.पी.एल.पासून पूर्णपणे दूर आहेत. आता इथे असा प्रश्न उपस्थित होतो, की ज्यांना अद्यापही हे सामने समर्थन करण्याजोगे वाटतात त्यांनी हा विचार करणे जरूर आहे की टाटा, महिंद्र किंवा इन्फोसिस यांनी आपला आय.पी.एस. संघ सामन्यांत का उतरवला नाही?

खरे सांगायचे तर मला सुरुवातीपासून आय.पी.एल.सामने हे उभे-आडवे- सर्व बाजूंनी भ्रष्टाचाराचे उगमस्थान वाटतच होते. त्याचमुळे बंगलोरमध्ये त्याच सामन्यात असलेला मुक्त प्रवेशाचा हक्क मी नाकारला होता. पण जसजसे या स्पर्धांचे अंतरंग माझ्यासमोर उलगडत गेले तेव्हा समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून मला या सामन्यांत फाटाफुटीची बीजे खोलवर पेरली जाण्याची क्षमता आढळली. दक्षिण आणि पश्चिम भारतातील शहरांमधल्या श्रीमंत आणि वरच्या वर्गांतील लोकांसाठी हे सामने म्हणजे एक तमाशा होता. ग्रामीण भागात आणि भारतातील छोट्या गावांमध्ये ते फारसे पोचलेच नाहीत. त्याचप्रमाणे दाट लोकवस्तीच्या मध्य प्रदेश व उत्तर प्रदेशातही त्यांचा प्रवेश झाला नाही, कारण रणजी ट्रॉफीचे विक्रम दाखवणारा त्यांचा इतिहास त्यांच्याबरोबर होता. या राज्यांत आय.पी.एल. संघ तयारच झाले नाहीत. महाराष्ट्रात आय.पी.एल.चे दोन संघ, या सामन्यांची ओळख सत्ता आणि संपत्ती यांच्यामध्ये गुरफटलेले अशीच करू देत होते. आय.पी.एल.ची पूर्ण रचना समान नागरिकत्वाच्या हक्कांना नाकारणारी होती, जी गोष्ट 'राष्ट्रीय खेळ' शब्दसंहितेत बसतच नव्हती.

भारतातील भांडवलदारी आणि भारतीय समाज यांतील वाईट गोष्टींचे प्रतिनिधित्व आय.पी.एल.ने केले आहे. भ्रष्टाचार आणि पक्षपात यांच्याबरोबर चमचेगिरी आणि अंध आदेशपालन यांनाही त्यामुळे उत्तेजन मिळाले आहे. ललित मोदी आणि एन.श्रीनिवासन आदी कंपनीच्या वर्तनाचे मला अजिबात नवल वाटलेले नाही. पण काही आदरणीय वाटणारे क्रिकेट वृत्तनिवेदक (कॉमेंटेटर्स) आय.पी.एल. आणि तिचे व्यवस्थापन यांची ज्या पद्धतीने माफी मागून मोकळे झाले ते जरा कसेसेच वाटले. त्यांनी केलेल्या विश्वासघातामुळे भारतीय क्रिकेट विश्वाची प्रतिमा देशात आणि देशाबाहेरही मलिन झालेली आहे. जॉर्ज ऑरवेलने एका ठिकाणी म्हटले आहे, 'लेखकाने कोणत्याही राजकीय पक्षाचा आज्ञाधारक सेवक असू नये.' त्याचप्रमाणे आपली विश्वासार्हता टिकवायची असेल तर क्रिकेट क्षेत्रातील लेखक व निवेदक यांनी आपल्या देशातील खेळांचे जे प्रवर्तक आहेत त्यांच्यापासून चार हात दूर राहणेच चांगले!

मग आता काय करावे लागेल? या प्रकरणातील हितसंबंधी लोकांनी 'बेटींग' कायदेशीर करावे आणि दोषी अधिकाऱ्यांचा राजीनामा घ्यावा अशी मागणी केली आहे. खरे म्हणजे यापेक्षा जहाल उपाययोजना जरूरीची आहे. आय.पी.एल.चे विसर्जनच झाले पाहिजे आणि रणजी ट्रॉफी टीममध्ये २०-२० षटकांचे सामने आयोजित करण्यात आले पाहिजेत. ज्या क्रिडा संस्था आणि राज्य मंडळांनी (स्टेट असोसिएशन्स) गेली ऐंशी वर्षे या खेळाची धुरा जबाबदारीने सांभाळली, त्यांना त्यांचे अधिकार परत मिळाले पाहिजेत. खेळामध्ये शिरकाव करून लांड्यालबाड्या करणारे आणि थैल्यांचे व्यवहार यांना पूर्णपणे हद्दपार करण्याची गरज आहे. आजच्या काळातही भारतातील सर्व गावांत व शहरांत निरपेक्ष वृत्तीने काम करणारे क्रिकेट प्रशिक्षक आणि व्यवस्थापक तरुण खेळाडूंची वैशिष्ट्ये जोपासून त्यांना तयार करण्यासाठी भरपूर मेहनत घेत आहेत. त्याचबरोबर खेळाडूंचे संघ आणि त्यांच्यामधील सामने यांच्यावर त्यांची देखरेख आहे. भारतीय क्रिकेटची शान राखण्यासाठी एन.दोरायस्वामी आणि एम.चिन्नास्वामी यांच्या या आधुनिक वारसदारांना खेळाची धुरा सांभाळण्यासाठी संधी दिली गेली पाहिजे.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.



कालपरवा
१५

रामचंद्र गुहा

# चांगला माणूस, चांगला कलावंतही

सुनील जाना यांचे नाव मी १९८० साली प्रथम ऐकले. त्यावेळी मी, जन्माने ब्रिटिश पण भारतात राहत असल्यामुळे भारतीय झालेले मानववंशशास्त्रज्ञ (ॲन्थ्रापॉलॉजिस्ट) व्हेरियर एल्विन यांच्या जीवनकार्याचा अभ्यास करीत होतो. त्यावेळी कलकत्त्यातील माझी एक मैत्रीण आणि पर्यावरण क्षेत्रातील कार्यकर्ती बोनानी कक्कर मला एकदा म्हणाली, जर तुला एल्विन या व्यक्तीच्या कार्यात खरोखरच स्वारस्य असेल तर मग तू माझ्या 'मामू'ला भेटलेच पाहिजेस, कारण त्याने एल्विनबरोबर राहून काम केल्यामुळे त्यांची जवळीक आहे. मी एकूणच त्या दोघांच्या संबंधाविषयी आणि त्यांच्या कामाबद्दल अज्ञानातच होतो, त्यामुळे भारतातील या श्रेष्ठ छायाचित्रकाराचे नावही मला तोपर्यंत माहीत नव्हते. बोनानीने मला त्यांच्याबद्दल आणखीही काही माहिती पुरवली.

तीन दशकानंतर आता मला किंवा इतर कोणालाही सुनील जाना यांचे जीवन आणि त्यांचा वारसा यांच्याबद्दल अधिक जाणून घेणे शक्य झाले आहे. त्यांच्या निधनानंतर प्रसिद्ध झालेले त्यांचे पुस्तक 'फोटोग्राफिंग इंडिया' हे निवडक छायाचित्रांचे आणि त्याबरोबर त्यांच्या जीवनावर आणि एकूण कार्यावर प्रकाश टाकणारा एक प्रदीर्घ आत्मपर लेख यांचे संकलन आहे. १९४० ते १९७० या काळातील भारताच्या सामाजिक आणि राजकीय घटनांची नोंद ठेवणारा हा मौल्यवान ग्रंथ आहे. शेतकरी, कामगार, राजकारणी, कलावंत, नर्तक, गायक-वादक, रस्ते-कारखाने, सागरदर्शन अशी सर्व दृश्ये एका छायाचित्रकाराच्या जागरूक आणि व्यापक भिंगांतून येथे टिपली गेली आहेत.

सुनील जाना हे एका सुविद्य आणि सुसंस्कृत कुटुंबात १९१८ साली जन्मले. कलकत्ता विद्यापीठात उच्च शिक्षण घेत असताना इतर आदर्शवादी तरुणांप्रमाणे ते भारतीय कम्युनिस्ट पक्षाकडे आकर्षित झाले. एक होतकरू छायाचित्रकार म्हणून त्यांची छायाचित्रे अनेक नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊ लागली होती. १९४३ मध्ये बंगाल महादुष्काळात होरपळून निघाला होता, त्यावेळी कम्युनिस्ट पक्षाचे सरचिटणीस पी.सी.जोशी यांनी केलेल्या सुचनेनुसार जाना बंगालमधील सर्व प्रदेशांत विशेषत: ग्रामीण भागांत सर्वत्र हिंडले आणि राज्यात सर्वत्र थैमान घालणाऱ्या भूकमारीची आणि तिने घेतलेल्या बळींची त्यांनी आपल्या कॅमेऱ्यात नोंद केली. कम्युनिस्ट पक्षाच्या मुखपत्रात, 'पीपल्स वॉर'मध्ये ती छायाचित्रे छापून

सर्वसाधारणपणे संगीतामध्ये रमलेले कलाकार वजा करता इतर सर्व कलाकार आत्ममग्न असतात. पिकासोसारखे विख्यात चित्रकार किंवा व्ही.एस.नायपॉलसारखे लेखक वागणुकीतील औदार्य किंवा सहानुभूती याबाबतीत उणेच पडलेले दिसतात. पण सुनील जाना या बाबतीत अपवाद होते. ते एक उत्तम छायाचित्रकार तर होतेच, पण त्याचबरोबर एक अतिशय चांगले, संवेदनशील गृहस्थ होते. व्यक्तिश: माझ्याबद्दलचा त्यांचा स्नेह हा त्यांच्या एकूणच ऐसपैस मानवतावादाचाच एक प्रदेश होता. त्यांचे उदात्त व्यक्तिमत्त्व त्यांनी केलेले व्यक्तींचे छायाचित्रण, त्यांचे चारित्र्य, त्यांचे शब्द यांतून परावर्तीत झाले आहे. 'फोटोग्राफींग इंडिया' या त्यांच्या कलाकृतीतील काही निवेदनांतून याची साक्ष पटेल.

आली आणि त्यावर लोकांच्या उड्या पडल्या. जानांवर कौतुकाचा वर्षाव झाला. त्याचा परिणाम असा झाला की, शिक्षण सोडून छायाचित्रण हेच जानांनी आयुष्याचे प्रधानध्येय मानले आणि पूर्णवेळ त्याच मार्गाला ते लागले.

भारताच्या इतिहासात १९४० च्या दशकात काळाने आपल्या पाऊलखुणा स्पष्टपणे उमटवल्या. बंगालमधील भीषण दुष्काळानंतर सत्तांतराच्या वाटाघाटींचे पर्व सुरू झाले. त्यानंतर गांधीजींचे उपास आणि धार्मिक सलोख्यासाठी पदयात्रा सुरू झाल्या; आणि त्यानंतर फाळणीचे भयानक दिवस... या सर्व घटनांचे चित्रीकरण जानांनी केले. या काळात त्यांची मार्गरेट बर्कव्हाईट या छायाचित्रकार महिलेशी मैत्री झाली. मार्गरेट बर्क यांनीही या उपरोक्त घटनांचे छायाचित्रण केले आणि त्यांची ती छायाचित्रे अविस्मरणीय म्हणून गौरविलीही गेली, पण त्यांना जर जानांचे तांत्रिक आणि सामाजिक असे दोनही प्रकारचे साहाय्य मिळाले नसते तर त्यांना निश्चितच त्यांचे उद्दिष्ट गाठणे शक्य झाले नसते. तरीही मार्गरेट बर्क व्हाईट यांना जागतिक प्रसिद्धी मिळाली आणि आपले नाव फक्त काही निवडक व्यक्तींच्या वर्तुळात राहिले याचा जानांवर कसलाच परिणाम झाला नाही. लबाडी आणि व्यक्तिगत महत्त्वाकांक्षा यांच्यापासून ते एखाद्या सर्वसाधारण व्यक्तीइतकेच दूर राहिलेले मला दिसले.

१९४८ साली आकर्षक आणि सौम्य व सुसंस्कृत व्यक्तिमत्त्वाच्या पी.सी.जोशींना बाजूला करून कम्युनिस्ट पक्षाची सर्व सूत्रे (जनरल सेक्रेटरी म्हणून) जहाल विचारांचे बी.टी.रणदिवे यांनी हाती घेतली. त्यानंतर कम्युनिस्ट पक्षाला स्वतंत्र विचाराच्या कलावंतांचीही आवश्यकता उरली नाही. त्यामुळे जांना यांना पक्षापासून दूर सारले जाणे अपरिहार्य होते. याच सुमारास शोभा नावाच्या अत्यंत बुद्धिमान आणि प्रबळ इच्छाशक्तीच्या बंगाली महिलेच्या प्रेमात ते पडले. ती वैद्यकीय व्यवसायातील होती. डॉ.शोभा यांनी त्यांना नवी दिशा धरण्यासाठी खूप साहाय्य केले. यानंतर त्यांची गाठ व्हेरियर एल्विन यांच्याशी पडली. भारताच्या आदिवासी प्रदेशांना भेटी देत फिरत असताना त्यांची मैत्री दृढ झाली. एकाने छायाचित्रण करायचे आणि दुसऱ्याने नोंदी करायच्या या पद्धतीने त्यांनी



बरेच भ्रमण-संशोधन केले. काही काळानंतर जाना यांना औद्योगिक संस्थांची कामे मिळाली. (धरणे आणि पोलाद कारखान्यांचे चित्रण करण्याची.) त्यानंतर काही काळाने अभिजात नृत्याकडे त्यांचे लक्ष वेधले गेले. शांता राव आणि बालसरस्वती या नृत्यांगनांची त्यांनी काढलेली छायाचित्रे केवळ अप्रतिम- त्यांच्या एकूण कलाप्रवासाचा कळसाध्याय!

जाना यांना पैशांची काळजी कधीच नव्हती. पैसे हाती येत त्याच वेगाने खर्च होत, असे त्यांनी लिहून ठेवले होते. 'व्यावसायिक भान आणि व्यावहारिक शहाणपणा यांच्या फार मोठ्या अभावाने मी ग्रस्त होतो' अशी कबुली ते देतात. त्यांची छायाचित्रे त्यांच्या अनेक आवृत्त्या काढून भारतात आणि भारताबाहेरही त्यांच्या परवानगीशिवाय किंवा संमतीविना प्रसृत केली गेली. त्यांच्यावर आणि त्यांच्या अनेक इतर कलाकृतींबाबत 'कॉपीराईट'चा हक्क त्यांनी कधी बजावला नाही. दरम्यानच्या काळात त्यांची आधीच अधू असलेली दृष्टी आणखी अंधुक होऊ लागली. त्याचबरोबर मद्यपानाची आवडही वाढत गेली असावी (कलाकार आणि कम्युनिस्ट या दोघांचीही 'दुर्बलता'!)

आपल्या नवऱ्याची प्रकृती खालावणे आणि ढासळती व्यावसायिक परिस्थिती लक्षात घेऊन १९७८ मध्ये शोभाने लंडनच्या एका हॉस्पिटलमध्ये नोकरी धरली. त्यानंतर सुनीलही तेथे पोहोचले. याच ठिकाणी १९९०च्या दशकाच्या सुरुवातीस मी त्यांना प्रथम भेटलो. त्यानंतर मी त्यांना भेटण्यासाठी त्यांच्या बिम्बल्डन येथील निवासस्थानी जाऊ लागलो. मग चहाचे कपामागून कप रिचवताना सुनील आपल्या मानववंशशास्त्रज्ञ मित्राच्या अनेक आठवणी सांगत असत. (त्यावेळी मी व्हेरियर एल्विन यांच्याबद्दलच लिहीत होतो.) ती माहिती देत असताना सुनीलनी वेळेबाबत फारच औदार्य दाखविले आणि जेव्हा माझे ते पुस्तक प्रकाशनासाटी गेले तेव्हा व्हेरियर एल्विन यांच्या अतिउत्कृष्ट आणि अप्रकाशित अशा खास छायाचित्रांनी ते नटवून त्यांनी आपल्या बुद्धिमत्तेची चमक दाखवून दिली.

पंचवीस वर्षे लंडनमध्ये वास्तव्य केल्यानंतर जाना दांपत्य अमेरिकेत त्यांच्या मुलांबरोबर राहण्यास गेले. दोघांचेही गेल्याच वर्षी निधन झाले. दोघेही एकामागून एक महिनाभरातच गेले. पण त्यांचा वारसा 'फोटोग्राफींग इंडिया' या ग्रंथाद्वारे मागे राहिला आहे. त्या पुस्तकामधील मजकूर- माहिती, विनोद आणि दयार्द्रता यांनी त्याच्या मालकाइतक्याच ओतप्रोतपणे भरला आहे. आत्मकथनाचा सर्वसाधारण सूर



*व्हेरियर एल्विन*

स्वत:चीच खिल्ली उडवणारा आहे. त्याचे उदाहरण द्यायचे तर पंडित नेहरूंचे बत्तीस फोटो धूसर कसे निघाले याचा वृत्तांत. कॅमेऱ्यातील लेन्स रेंज फाइंडरबरोबर जुळवून घेण्यास विसरून गेल्यामुळे झालेल्या घोटाळ्याची हकीगत इथे चटकदारपणे मांडली आहे.

सर्वसाधारणपणे संगीतामध्ये रमलेले कलाकार वजा करता इतर सर्व कलाकार आत्ममग्न असतात. पिकासोसारखे विख्यात चित्रकार किंवा व्ही.एस.नायपॉलसारखे लेखक वागणुकीतील औदार्य किंवा सहानुभूती याबाबतीत उणेच पडलेले दिसतात. पण सुनील जाना या बाबतीत अपवाद होते. ते एक उत्तम छायाचित्रकार तर होतेच, पण त्याचबरोबर एक अतिशय चांगले, संवेदनशील गृहस्थ होते. व्यक्तिश: माझ्याबद्दलचा त्यांचा स्नेह हा त्यांच्या एकूणच ऐसपैस मानवतावादाचाच एक प्रदेश होता. त्यांचे उदात्त व्यक्तिमत्त्व त्यांनी केलेले व्यक्तींचे छायाचित्रण, त्यांचे चारित्र्य, त्यांचे शब्द यांतून परावर्तीत झाले आहे. 'फोटोग्राफींग इंडिया' या त्यांच्या कलाकृतीतील काही निवेदनांतून याची साक्ष पटेल.

बहुविधता (प्लूरॅलीझम) संबंधात जाना म्हणतात, 'सांस्कृतिक वैविध्य हे कोणत्याही देशातील जीवन समृद्ध करणारे असते. धर्म, वंश, किंवा मूळ वसतिस्थान यांच्याआधारे देशाची ओळख किंवा अस्मिता निर्माण करणे किंवा त्याआधारे नागरिकत्वाची व्याख्या ठरविणे हे सामाजिक

संघर्ष आणि 'वांशिक शुद्धीकरण' किंवा 'वंशउच्छेद' यांच्यासारख्या घृणास्पद गोष्टींना जन्म देणारे असते.'

'सौंदर्य व लैंगिकता : काल आणि आज' या विषयाबाबत जानांनी लिहिले आहे, 'भूतकाळात आपल्या संस्कृतीने मानवी जीवनाच्या सर्व कक्षा कवेत घेऊन त्याचा मनसोक्त आनंद लुटला आहे. कामोत्तेजन आणि शारीरिक तृप्ती या भावनांना त्यांनी कधीच नाकारले नाही; किंवा कमीपणाचे मानले नाही. पण नंतर अनेक प्रकारच्या संस्कृतींमधील सुखसंहारक (किलजॉय) प्रवृत्तींनी या देशातील जनतेला ग्रासून टाकले. दीर्घकाळपर्यंत इस्लामी संस्कृतीने स्त्रियांना गोषात ठेवून समाजात अलग राखले; तर व्हिक्टोरियन ब्रिटिश कालखंडातील ख्रिश्चन संस्कृतीतील अभिरूचीत केवळ स्त्रियांचेच काय पण फर्निचरचे पायही कापडाने झाकले जाऊ लागले. या संस्कारांमुळे लैंगिकता किंवा मानवी शरीर यांच्याबद्दल कोणतीही लज्जास्पद भावना न बाळगणाऱ्या आपल्या मूळ सांस्कृतिक दृष्टिकोनात विपरित बदल घडून आले.'

सुनील जाना यांच्या सहवासात मी ज्यांच्यासाठी आलो ते कलंदर मानववंशशास्त्रज्ञ व्हेरियर एल्विन यांच्याबद्दलचे काही वाचनीय उतारे 'फोटोग्राफींग इंडिया'मध्ये दिलेले आहेतच, पण त्यांच्याहीपेक्षा काही चांगले निबंध किंवा त्यांतील उतारे त्यांनी 'टाइम्स हायर एज्युकेशन सप्लीमेंट १९९९'मध्ये प्रसिद्ध केले आहेत. त्यात जाना लिहितात, 'आपल्या अंतर्मनातील विचार किंवा भावना एल्विन क्वचितच प्रकट करीत. त्यांच्या कलकत्ता येथील फ्लॅटमधील एका संध्याकाळची भेट मला आजही आठवते. त्या दिवशी त्यांना थोडे बरे वाटत नव्हते. ते मला म्हणाले, 'कितीही अस्वस्थ वाटले तरी आपण ज्या संस्कृतीत राहतो, ती आपण सोडू शकत नाही. आपल्या जीवनातील अत्यानंदाचे क्षण आणि मानसिक शांती आपल्याला तिथेच लाभू शकते. हे अनुभव आपण पुन्हा पुन्हा अनपेक्षितपणे घेणार आहोत यावर आपला विश्वास असेल, तर दैन्य दु:खाची काळोखी गुहा ओलांडत असतानाही हे जीवन एखाद्या आपत्तींनी गांजलेल्या व्यक्तीलाही अद्भुत सुखाचे क्षण दाखवू शकते, यावरची आपली श्रद्धा ढळत नाही.'

जाना यांचे स्वत:चे आयुष्य कधी दु:ख कष्टांनी भरलेले तर कधी आनंदात असे जात होते. कितीही कठीण परिस्थिती आली तरी त्यांच्या पूर्वीच्या कम्युनिस्ट आयुष्यातील आशावाद कायम त्यांच्या साथीला होता. आयुष्याच्या अखेरच्या दिवसात जानांनी जे शब्द लिहून ठेवले ते प्रत्येक लेखकाच्या अभ्यासिकेवर किंवा प्रत्येक फोटोग्राफरच्या स्टुडिओवर कोरून ठेवण्याजोगे आहेत–

'जग पूर्वीपेक्षा अधिक चांगले झालेले नाही. आपल्या भोवताली रणक्षेत्रे, द्वेषमत्सर आणि तोफा, बंदुका यांचा आजही गराडा आहे. हे जग दु:खाने, निराशेने भरलेले आहे, पण आपल्याला जगण्यासाठी हे एकच जग आहे. येथे शब्द आणि चित्रे यांच्यामार्फत कोणतेही संदेश दिले गेले तरी लोकांची मने, अंत:करणे त्यामुळे मुळापासून क्वचितच हेलावतात. क्वचितच त्यांच्यामध्ये ताबडतोब बदल घडून येतो, पण त्यामुळे लोक विचार करू लागतात आणि त्यामुळे कालांतराने हळूहळू सामाजिक आणि राजकीय परिवर्तन घडण्यास सुरुवात होते. म्हणून ते शब्द किंवा लिखाण लिहून ठेवणे, चित्र रंगवणे किंवा छायाचित्र काढून ठेवणे हे त्या त्या व्यक्तीच्या हिताचे आहे.'

जाना यांच्या निधनापूर्वी मी शोभा यांच्याशी फोनवर बोललो होतो. त्यावेळी मी त्यांना विचारले की, सुनील यांच्याजवळील निगटिव्हज् आणि प्रिंटस् भारतात घेऊन येण्यासाठी मी सरकारी पातळीवर प्रयत्न करावेत काय? शोभाने उत्तर दिले की तसेच व्हावे अशी आमची इच्छा आहे, पण त्यांची नीट देखरेख होऊ शकेल याबद्दल आम्हाला खात्री हवी आहे. मग मी सांस्कृतिक मंत्रालयातील एका कार्यक्षम सहसचिव व्यक्तीला भेटून त्यांची ही इच्छा कळविली. तिलाही त्या कामात स्वारस्य वाटले, पण तिला सवड मिळाली नाही; कारण लवकरच तिची दुसऱ्या खात्यात बदली झाली. सरकारी यंत्रणेची काम करण्याची, अगर न करण्याची रीत लक्षात घेऊन या असाधारण भारतीयांजवळचा मौलिक संग्रह स्वदेशी परत आणण्यासाठी आता एखाद्या उदारमनस्क मानवतावादी व्यक्तीनेच पुढाकार घेणे आवश्यक आहे.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**

22-A, Bruntan Road, Bangalore 560025.

ramguha@gmail.com.



कालपरवा
१६

रामचंद्र गुहा

# अंध पक्षनिष्ठेचे जहर

काही दिवसांपूर्वी सध्या बोस्टनमध्ये असलेल्या माझ्या बंगलोरच्या एका मित्राशी मी भारतीय राजकारणातील अंध पक्षनिष्ठेबद्दल (पार्टिसनशिप) चर्चा करीतहोतो. बोलताना मी असे विधान केले की दुसऱ्या कोणत्याही लोकशाही देशात दोन प्रमुख विरोधी पक्ष एकमेकांबाबत आपल्याइतकी असभ्य आणि कडवट भाषा वापरत असतील असे मला वाटत नाही. उदाहरणादाखल मी म्हटले, की जेव्हा भारत सरकारने परदेशी कंपन्यांना देशातील किरकोळ व्यापारात थेट गुंतवणूक (एफ.डी.आय.) करण्याची परवानगी दिली, तेव्हा गुजरातच्या मुख्यमंत्र्यांनी पंतप्रधानांना, 'धोरणात झालेल्या या बदलामुळे किती इटालियन उद्योजकांचा फायदा होणार आहे,' असा प्रश्न केला होता. प्रश्नकर्त्याच्या व्यक्तिमत्त्वातील उथळपणाच त्यामुळे सिद्ध झाला. खरे तर अशा प्रकारच्या धोरणासंदर्भात (एफ्.डी.आय.) विरोधी असे कितीतरी सबळ मुद्दे उपस्थित करता आले असते. त्यामुळे छोट्या व्यापाऱ्यांना व्यवसायातून बाहेर ढकलले जाईल; किंवा मोठमोठ्या मक्तेदार व्यापाऱ्यांना अडलेल्या शेतकऱ्यांकडून बळजबरीने कमी किंमतीत त्यांचे उत्पादन मिळवता येईल, या मुद्द्यांवर आक्षेप घेता आले असते. पण युक्तिवादासाठी अशा भरीव मुद्द्यांचा विचार करण्याऐवजी नरेंद्र मोदींना राज्यकर्त्या आघाडीतील नेतृत्वाची वांशिक पाळेमुळे खोदून काढण्यातच स्वारस्य वाटले हे उघड आहे.

अशा प्रकारची असभ्य शेरेबाजी मोदींच्या खास ठेवणीतील आहेच! पण त्यात काँग्रेसवाले तरी कुठे कमी आहेत? विरोधकांना शिवीगाळ करण्यात तेही मागे नाहीत; फक्त शुद्ध हिंदुस्थानी भाषेऐवजी ते त्या 'कामांसाठी' कॉन्व्हेंट इंग्रजीचा वापर करतात. केंद्र सरकारातील विविध मंत्र्यांच्या कार्यालयातील अधिकारी स्वतःसमोरील फायली वाचून कार्यवाहीसाठी निकालात काढण्याऐवजी प्रसारमाध्यमांची आमंत्रणे स्वीकारून हौसेने दूरदर्शनवर हजेरी लावतात. कारण त्या माध्यमातून भारतीय जनता पक्षाच्या नेत्यांवर परिस्थितीच्या संदर्भात टोमणे मारणे अगर चिखलफेक करणे त्यांना सोपे जाते.

माझ्या आजपर्यंतच्या आठवणीत, भारतात सरकार आणि विरोधी पक्ष यांच्यामधले संबंध इतके बिघडल्याचे मला स्मरत नाही. सध्या परस्परांमधील विश्वासाचे वातावरण पूर्णपणे



सार्वजनिक जीवनात सक्रिय असणाऱ्या सुस्वभावी व सुसंस्कृत स्त्री-पुरुषांना स्फूर्तिदायक ठरेल अशी एक सत्यकथा आपल्याला मला सांगायची आहे. १९७७ साली 'जनता' सरकारमध्ये अटलबिहारी वाजपेयी यांची परराष्ट्रमंत्री म्हणून निवड झाली. आपल्या खात्याची जबाबदारी घेण्यासाठी ते साऊथ ब्लॉकमध्ये अधिकाऱ्यांच्या घोळक्यामधून गेले. कक्षात पाऊल टाकल्यावर सावकाशपणे वाजपेयींनी चौफेर नजर फिरवली आणि त्यांच्या नजरेने भिंतीवरील एक रिकामी जागा चटकन हेरली. (विरोधी पक्षाचे खासदार म्हणून वाजपेयी अनेक वेळा त्या कक्षात येऊन गेल्यामुळे ती जागा त्यांना पूर्णपणे परिचित होती.) 'पंडितजींची तसबीर कुठे गेली?' त्यांनी विचारले... त्या जागेवर अनेक वर्षे लावलेले जवाहरलाल नेहरूंचे छायाचित्र कुठे गेले, याची ते चौकशी करीत होते. त्यांच्या भोवतालचे 'बाबू' एकदम स्तब्ध झाले.



लयाला गेले आहे. या अविश्वासाच्या (परस्पर विद्वेषाकडे झुकणाऱ्या) वातावरणाचा परिणाम असा झाला आहे की संसदेत क्वचितच काही कामकाज चालते. एखादे महत्त्वाचे विधेयक मांडताना सरकार, विरोधी पक्षांचे मत कधीही विचारात घेत नाही. नव्हे त्यांना विचारतच नाही. विरोधी पक्ष त्याचा बदला म्हणून एक तर सभात्याग करतात किंवा सभागृहात गोंधळ माजवून कामकाजात अडथळे आणतात.

बोस्टनमधील माझ्या मित्राशी मी विषण्णतेने या विषयाची चर्चा करीत होतो, तेव्हा या संदर्भात अमेरिकाही काही आदर्श ठेवण्याजोगी नाही, असे त्याचे मत पडले. तिथेही डेमोक्रॅट्स् आणि रिपब्लिकन्स यांच्यामधील संबंध समजूतदारपणाचे, सलोख्याचे राहिलेले नाहीत. एखाद्या संभाव्य मुद्याची व्यूहरचना करण्यासाठी अगर एखाद्या आर्थिक पेचप्रसंगातून तोड काढण्यासाठी पूर्वीप्रमाणे संगनमताने काम करण्याचे दिवस संपले आहेत. आता राष्ट्राध्यक्षांनी पुढे टाकलेले प्रत्येक पाऊल अगर घेतलेला पुढाकार यांना शह देण्याचे राजकारण रिपब्लिकन बहुसंख्येत असलेल्या काँग्रेसकडून खेळले जाते. पक्षाच्या 'टी-पार्टी' विभागाकडून राष्ट्राध्यक्षांविषयी गैरसमज पसरतील असे भाष्य केले जाते आणि त्यात त्यांच्या बिगर अमेरिकन वंशमूलांसंबंधीही सूचक चर्चा केली जाते. ही चर्चा व त्यातून निर्माण होणारा विद्वेष भडकविण्यासाठी आगीत तेल ओतण्याचे काम प्रसारमाध्यमे निष्ठेने करीतच असतात. 'फॉक्स न्यूज' वरून डेमोक्रॅटस्ना दिलेल्या प्रचारकी उपद्रवाची परतफेड करण्यासाठी एम.एस.एन.बी.सी. ही वाहिनी रिपब्लिकनांवर शेरेबाजीचे सत्र चालू ठेवतेच. आपण टेलिव्हिजनपासून दूर होऊन ब्लॉग्ज किंवा ट्विटरच्या विश्वात शिरलो म्हणजे भाषेमधला कडवटपणा आणि संताप आणखीच तीव्र होत जातो.

अमेरिकेतील याबाबतची परिस्थिती वाईट असेल; पण भारतात ती आणखीच वाईट असावी असे मला वाटते. कॅत्रिना किंवा सॅण्डी चक्रीवादळांनी निर्माण केलेल्या नैसर्गिक आपत्तीमध्ये किंवा ९/११ च्या दहशतवादी हल्ल्यात डेमोक्रॅटस् आणि रिपब्लिकन्स यांनी एकत्र येऊन देशावरील संकटाला तोंड दिले व देश वाचवला. पण इथे या देशात देशाच्या संरक्षणासारख्या/सुरक्षिततेसारख्या समस्यांवरसुद्धा काँग्रेस आणि भाजपा एकत्र बसून बोलू शकत नाहीत; सहकार्य तर बाजूलाच राहिले.

२००३ सालची काश्मीरमधली ही हकीगत. त्यावेळी तेथील दहशतवाद थोडा ओसरला होता; आणि पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयींची भेट ठरलेली होती. पंधरा वर्षांच्या कालावधीनंतर भारताच्या पंतप्रधानांची काश्मीरला भेट होती. सर्व पक्षांनी एकत्र येऊन जिहादींच्याविरोधी भक्कम मोर्चा बनविलेला दाखविणे जरूरीचे होते, पण त्यावेळी राज्यातील सत्ताधारी आघाडीचा घटक असलेल्या काँग्रेसने आपल्या सर्व मंत्र्यांना प्रधानमंत्र्यांच्या भाषणावर बहिष्कार घालण्याचा आदेश दिला होता.

पाच वर्षानंतर दुसऱ्या एका पंतप्रधानांनी (यावेळेस ते काँग्रेस पक्षाच्या सरकारचे होते.) काश्मीर संबंधात नव्याने वाटाघाटी सुरू करण्यासाठी पुढाकार घेतला होता. डॉ.मनमोहन सिंगांनी पाकिस्तानचे राष्ट्राध्यक्ष मुशर्रफ यांच्याशी जी बोलणी सुरू केली होती, त्यांचा पाया काश्मीरमधील प्रत्यक्षा ताबारेषेचे रूपांतर आंतरराष्ट्रीय सीमेमध्ये करावे या मुद्यावर दोनही राष्ट्रांत समेट व्हावा असा होता. जर ही तडजोड झाली असती तर मग काश्मीर प्रश्न कदाचित उरलाच नसता. अशा या पेचप्रसंगांच्या सोडवणुकीच्याच क्षणी भाजपाने आंदोलन सुरू केले. भाजप कार्यकर्त्यांनी काश्मीरखोऱ्यातील देशाला जोडणारा जो मार्ग होता तोच अडवला; आणि ज्या लोकांना भारताच्या सद्भावना पोहोचविण्याचा आपला प्रयत्न चालू होता, त्यांचेच अन्न आणि औषधे इत्यादी जरुरीच्या वस्तू पोहोचविण्याच्या कामात मोठा अडथळा उभा केला.

अमेरिकेतील राजकारणाचा विचार करता भारतीय राजकारण हे बहुकेंद्री असल्याचे जाणवते. अमेरिकेन संघराज्यात दोनच पक्ष- डेमोक्रॅटिक आणि रिपब्लिकन- निवडणूक लढवतात. राष्ट्रीय आणि राज्य पातळीवर त्यांचाच प्रभाव असतो. अमेरिकन काँग्रेस आणि सेनेट यांची निवडणूक किंवा राष्ट्राध्यक्ष आणि राज्यांचे गव्हर्नर यांची निवडणूक यांवर याच दोन पक्षांचा प्रभाव पडलेला दिसतो. महत्त्वाच्या जागा याच पक्षांच्या उमेदवारांच्या असतात. (या प्रक्रियेला अपवाद असले तर ते फारच थोडे. एखाद्या छोट्या राज्यातून एखादा सोशलिस्ट किंवा सुधारणावादी यांनाही यश मिळते, पण ते अपवाद म्हणूनच!)

दुसरीकडे, भारतात भारतीय जनता पक्ष आणि काँग्रेस या दोहोंना आपल्या शासकीय अवकाशात इतरही अनेक पक्षांना सामावून घेणे भाग पडते. कितीतरी मोठ्या राज्यांत काँग्रेस किंवा भाजप यांच्यापैकी कोणालाच स्थान उरलेले नाही. उत्तर प्रदेशात समाजवादी पक्ष आणि बहुजन समाज पक्ष हे प्रमुख राजकीय पक्ष आहेत. पश्चिम बंगालमध्ये मार्क्सवादी कम्युनिस्ट आणि तृणमूल काँग्रेस व तामिळनाडूमध्ये द्रविड मुन्नेत्र कळघम आणि अखिल भारतीय अण्णा द्रविड मुन्नेत्र

कळघम हे पक्ष परस्परांचे विरोधक आहेत. त्यांच्यामधील परस्पर विद्वेष हा राष्ट्रीय पातळीवरील काँग्रेस व भाजपा यांच्यामधील द्वेषाइतकाच प्रखर आहे. पश्चिम बंगालमध्ये मार्क्सवादी आणि तृणमूल यांच्यामध्ये होणारी बाचाबाची आणि परस्परांच्यानेत्यांचा शेलक्या शब्दांत होणारा 'उद्धार' प्रसंगी नरेंद्र मोदी आणि काँग्रेस नेते मनीष तिवारी यांनाही लाजवणारा असतो. उत्तर प्रदेशात ब.स.पा. आणि स.पा. यांच्यापैकी कोणीही सत्तेवर आले तरी प्रथम ते विरोधी पक्षाचे कार्यकर्ते व नेते यांना 'जेल दाखवण्याचे' कार्य करतात. द्रमुक आणि अण्णा द्रमुक नेते याही पुढे जातात, सत्तेवर येताच ते विरोधी पक्षाच्या मुख्य नेत्यालाच तुरुंगाची हवा खायला पाठवतात. (ज्याला मुख्यमंत्रीपद सोडण्याचा जनतेचा कौल नुकताच मिळालेला असतो!)

या सार्वत्रिक हेव्यादाव्यांनी आपल्याकडील राजकीय वातावरण इतके गढूळलेले असते की, त्यातील दुष्ट प्रवृत्तींची बरोबरी अगदी सर्व जगातील लोकशाही राजकारणाचा इतिहास धुंडाळला तर कुठेही केली गेली असेल असे वाटत नाही. दरम्यानच्या काळात टेलिव्हिजन या माध्यमाचा प्रभाव आणि जनतेपर्यंतची त्यांची पोच, त्याचप्रमाणे ब्लॉग्ज ट्विटर या प्रकारचा संपर्क (अथवा गैरसंपर्क) साधनांच्या आधाराने घाईगर्दीने व निष्काळजीपणाने शब्दांकित केलेले न्यायालयीन निर्णय यांनी तर हे वाद अधिक खालच्या पातळीवर नेऊन ठेवले आहेत.

भारतीय राजकारणातील अंध पक्षनिष्ठेने सरकारी कारभारातील गैरव्यवहारास विशेष उत्तेजन मिळाले आहे. कोणत्याही पक्षाचा दुसऱ्यावर विश्वास नाही. सार्वजनिक संस्थांची स्वायत्तता आणि प्रतिष्ठा यांनाही कोणी मानत नाही. अशा या संशयाच्या आणि द्वेषाच्या वातावरणात विधायक धोरणविषयक निर्णय घेऊन ते सर्व राजकीय पक्षांत जे कोणी सभ्य आणि समजूतदार नेते उरले आहेत (आणि तसे निश्चितपणे आहेतच) त्यांनी येथील लोकशाही प्रक्रियेला शिष्टाचार आणि सभ्यता पुन्हा मिळवून देण्यासाठी प्रयत्न केले पाहिजेत; कारण आता फार उशीर झाला आहे. या नेत्यांनी यासाठी सरकार चालवणारा पक्ष आणि विरोधी पक्ष यांच्या कार्यकर्त्यांच्या पदाधिकाऱ्यांच्या व कार्यकर्त्यांच्या एकत्र नियमित भेटींचे नियोजन संसद किंवा विधिमंडळे यांच्या परिसराबाहेर केले पाहिजे. केंद्र व त्याचप्रमाणे राज्ये या सर्व ठिकाणी अशा भेटी व चर्चा झाल्या पाहिजेत. सनदी अधिकारी आणि पोलीस यांच्या नेमणुका पक्ष आणि राजकारणी यांच्या हस्तक्षेपापासून मुक्त असाव्यात अशी मागणी त्यांनी सतत लावून धरली पाहिजे. आणि राजकीय चर्चेत कोणत्याही प्रकारची शिवीगाळ व असभ्यता व्यक्त होऊ नये यासाठीही या सर्वपक्षीय सुजाण नेत्यांनी आग्रही असले पाहिजे.

वरील मजकूर लिहीत असतानाच उत्तराखंडातील दुर्घटनेचे वृत्त समोर आले आहे. त्याचबरोबर नरेंद्र मोदींची घमेंड आणि राहुल गांधी यांचा संधिसाधूपणा यांचे एकमेकांशी स्पर्धा करणारे किस्सेही प्रसिद्ध होत आहेत; दुर्दैवाने ते माझ्या या लेखातील आक्षेपांना पुष्टी देणारेच आहेत. राष्ट्रीय आपत्तीच्या या खडतर आव्हानातही काँग्रेस आणि भाजपा संकटग्रस्त भारतीयांच्या मुक्ततेचा विचार करण्याऐवजी त्यांच्या निवडणूक हितसंबंधांच्याच चिंतेत व्यग्र असताना दिसतात.

सार्वजनिक जीवनात सक्रिय असणाऱ्या सुस्वभावी व सुसंस्कृत स्त्री-पुरुषांना स्फूर्तिदायक ठरेल अशी एक सत्यकथा आपल्याला मला सांगायची आहे. १९७७ साली 'जनता' सरकारमध्ये अटलबिहारी वाजपेयी यांची परराष्ट्रमंत्री म्हणून निवड झाली. आपल्या खात्याची जबाबदारी घेण्यासाठी ते साऊथ ब्लॉकमध्ये अधिकाऱ्यांच्या घोळक्यामधून गेले. कक्षात पाऊल टाकल्यावर सावकाशपणे वाजपेयींनी चौफेर नजर फिरवली आणि त्यांच्या नजरेने भिंतीवरील एक रिकामी जागा चटकन हेरली. (विरोधी पक्षाचे खासदार म्हणून वाजपेयी अनेक वेळा त्या कक्षात येऊन गेल्यामुळे ती जागा त्यांना पूर्णपणे परिचित होती.) 'पंडितजींची तसबीर कुठे गेली?' त्यांनी विचारले... त्या जागेवर अनेक वर्षे लावलेले जवाहरलाल नेहरूंचे छायाचित्र कुठे गेले, याची ते चौकशी करीत होते. त्यांच्या भोवतालचे 'बाबू' एकदम स्तब्ध झाले. त्यांच्या मनातला गोंधळ त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होता- कारण नेहरूंचे छायाचित्र त्यांनीच तर काढून टाकले होते! कारण त्यांचा अंदाज असा होता की, इंदिरा गांधींच्या कारावासातून नुकत्याच मुक्त झालेल्या वाजपेयींना इंदिराजींच्या वडिलांबद्दलही निश्चितच आकस असणार! 'वापस लाओ' वाजपेयी गरजले. 'सतरा वर्षे ते आपले विदेशमंत्री राहिले आहेत!' आणि मग पुन्हा भारताच्या त्या पहिल्या व प्रदीर्घ काळ विदेश मंत्रीपद भूषविणाऱ्या नेत्याचे ते छायाचित्र मूळ जागेवर लावण्यात आले!

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.



काल-परवा
१६

रामचंद्र गुहा

# हिमालयात काही भयानक चुकीचे घडते आहे

महात्मा गांधींच्या ब्रिटिश शिष्या मीराबेन यांनी उत्तराखंड-हिमालय परिसरात एक आश्रम १९४० च्या दशकात सुरू केला. हिमालयाच्या डोंगर-दऱ्यांतून फिरत असताना जंगलामध्ये चाललेल्या हालचाली पाहून त्या स्तिमित झाल्या. ओक (बांज) वृक्षांची जंगले तोडून त्यांच्या जागी चीड पाइनची पद्धतशीर लागवड होत असलेली त्यांनी पाहिली. वन खात्याच्या अखत्यारीतील आणि देखरेखीखाली चाललेले हे काम फक्त आर्थिक फायद्यासाठी केले जात होते. कारण चीड वृक्षाच्या लाकडाची मागणी औद्योगिक संस्थांत आणि त्यांत लागणाऱ्या रेझिन या द्रव्यासाठी वाढत चाललेली होती. पण ती पुरवताना स्थानिक लोक आणि शेतकरी यांच्यावर अन्याय चालला होता, कारण बांज (ओक) हा वृक्ष त्यांच्या दररोजच्या जळणाची आणि गुरांच्या चाऱ्याची गरज पुरवत होता.

सन १९५२ मध्ये लिहिलेल्या एका लेखात ओक वृक्षांची तोड आणि त्या जागी चीड वृक्षांची लागवड यांच्यामुळे केवळ सामाजिक अन्याय चालला आहे, असे नव्हे; तर एकूणच परिसंस्थेला (इकॉलॉजी) ते घातक आहे, असे सांगून 'हिमालयात काही तरी चुकीचे घडते आहे', असाही शेरा त्यांनी मारला, तो केवळ पोकळ नव्हता; तर त्याला दुजोरा देणारी वस्तुस्थिती होती. ओक वृक्षांच्या तळाशी पाला-पाचोळ्याचा ढीग पडतो आणि त्यांच्यावर पडलेल्या मॉन्सूनच्या पाण्याला त्यांनी अडविल्यामुळे त्यातून थंड व गोड पाण्याचे सुंदर झरे वाहतात. आजूबाजूची वस्ती आपली पाण्याची तहान त्यावर भागवते. याउलट, चीड वृक्षांचे उघडे बुंधे आणि शेंड्याजवळ असलेली सुईसारखी पाने (सूचिपर्णी वृक्ष) ते पाणी अडवू शकत नाहीत. ज्या ठिकाणी पाइन वृक्षांची लागवड आहे, तेथील उतारांवरून पाणी वेगाने वाहत येते आणि आपल्याबरोबर माती व दगडधोंडे वाहून आणून महापुराचे संकट उभे करते.

वन खात्याने आपले धोरण बदलून पाइन वृक्षांऐवजी ओक वृक्षांच्या लागवडीला उत्तेजन द्यावे, असे आवाहन मीराबेननी केले. 'बांज (ओक) वने ही हिमालयाच्या दक्षिण उतारावरील निसर्गाच्या आर्थिक चक्राचे महत्त्वाचे केंद्रबिंदू आहेत. त्यांचा नाश म्हणजे या निसर्गचक्राच्या हृदयावरच आघात करून त्याचा संपूर्ण विध्वंस करण्यासारखे आहे.'

मीराबेन यांचे हे गांधीवादी आवाहन पूर्णपणे दुर्लक्षिले गेले. वन खात्याने ओक वृक्षांची लागवड आणि त्यासाठी प्रोत्साहन हा कार्यक्रम तर हाताळला नाहीच; उलट उभी असलेली पाइन वृक्षांची वनेही आक्रमकपणे जमीनदोस्त केली. सन १९५० ते १९७० या काळामध्ये

■

उत्तर प्रदेशातील गेल्या महिन्यातील पुरांचे कारण नैसर्गिक असले, तरी निसर्गातील मानवाच्या हस्तक्षेपामुळे त्याचा परिणाम आणखी उग्र झाला. दि. १५ जूनची ढगफुटीची घटना अनपेक्षित होती, कारण या पर्वतमय प्रदेशात मोसमी पाऊस (मॉन्सून) साधारण जुलैच्या पूर्वार्धात सुरू होतो. तरीही या पावसाळ्यात येथे आलेली उद्ध्वस्तता ही नेहमीपेक्षा किती तरी पट अधिक प्रमाणात आहे आणि त्याचे कारण माणसांनी परिसंस्थेच्या भाषेत- त्या अतिशय संवेदनशील ठिसूळ भागात बेदरकारपणे चालविलेल्या बांधकाम प्रकल्पांत आहे.

■



हिमालयातील जंगलांतून गंगेच्या मैदानी प्रदेशातील कारखान्यांना होणारा चीड वृक्षांच्या लाकडाचा वार्षिक पुरवठा अपेक्षित ८७००० घनमीटर्स वरून २,००,००० घनमीटर्सवर गेला.

सन १९७० मध्ये अलकनंदा नदीच्या खोऱ्यामध्ये, आयुष्यात कधीही अनुभवला नव्हता, एवढा भयानक महापूर लोकांनी पाहिला. या महापुराचे पाणी १०० स्क्वेअर कि.मी. क्षेत्रांत पसरले होते. पाण्याने व्यापून टाकलेल्या प्रदेशातील पूल आणि रस्ते, घरे व उभी पिके यांचा विध्वंस करून ते थांबले. याचा तडाखा मैदानी प्रदेशाला विशेष जाणवला. कारण गंगेच्या भरलेल्या कालव्यामधून येणारे पाणी पुरामुळे वाहत आलेल्या गाळामुळे अडल्यामुळे पूर्ण उत्तर प्रदेशातील सुमारे ९५ लाख एकर जमिनीचा पाणीपुरवठा तुटला आणि जमिनी नापीक राहिल्या.

सन १९७० च्या या पुराचा फटका ज्यांना बसला, त्या गावकऱ्यांचे अवलोकन असे होते की– ज्या ठिकाणचे जंगल तोडून साफ करण्यात आले होते, त्याच प्रदेशात अधिक भूमिपात घडून आले. चंडीप्रसाद भट्ट नावाचे एक गांधीवादी समाजसेवक या संबंधात लिहितात : ''या आपत्तीमुळे वाढत चाललेली जमिनीची झीज आणि पूर यांचा भरमसाट आणि अनियंत्रित वृक्षतोडीशी असलेला संबंध गावकऱ्यांच्या लक्षात आला.'' लोकांच्या या समजूतदारपणावर विश्वास ठेवून भट्ट यांनी आपल्या 'चिपको' आंदोलनाची योजना आखली. हिमालयातील वृक्षतोड थांबवण्यासाठी सुरू केलेल्या या आंदोलनाने देशातच नव्हे, तर सर्व जगातही कुतूहल निर्माण केले.

'चिपको' आंदोलनाचा परिणाम म्हणून सरकारने १००० मीटर्स उंचीवरच्या प्रदेशातील वृक्षतोड बंद केली. पण पर्वतराजींवरील इतर संकटे मात्र येतच राहिली. सन १९८० व १९९०च्या दशकांत देशातील मध्यमवर्गाच्या संख्येत बरीच वाढ झाली. उत्पन्नात भरपूर वाढ झाल्यामुळे आणि अयोध्या आंदोलनातून लोकांच्या धर्मश्रद्धांना आवाहन मिळाल्यामुळे उत्तराखंडातील प्रसिद्ध तीर्थक्षेत्रे व मंदिरे यांना भेट देणाऱ्यांची व त्या भागात पर्यटन करणाऱ्यांची संख्या वाढत गेली. हे नवे यात्रेकरू आणि पर्यटक पूर्वीच्या प्रवाशांसारखे पायी न फिरता या प्रदेशात बस, गाडी व सुमो यांच्यासारख्या गाड्यांमधून येत होते. त्यांच्या गरजा भागवण्यासाठी हॉटेले, निवासस्थाने यांच्या मालिका तयार होत होत्या. ही सर्व बांधकामे नद्यांच्या काठांवर केली जात होती. प्रवाशांच्या वाढत्या संख्येचा दबाव रस्त्यांवर वाढत चालला होता आणि त्यात वेगवेगळ्या प्रकारच्या कचऱ्याची सतत भर पडत असल्यामुळे रस्त्यांशेजारीच कचऱ्याचे

ढीगही साठत होते.

उत्तराखंड राज्याची निर्मिती १९९८ मध्ये झाली. दोन वर्षांनी भारत सरकारच्या अन्न मंत्रालयाने डोंगराळ प्रदेशातील परिसंस्थेचा अहवाल (इकॉलॉजिकल रिपोर्ट) सादर करताना त्यातील एका बिकट वस्तुस्थितीचा उल्लेख केला होता; तो म्हणजे भूमिपात अथवा भूस्खलना (लॅंडस्लाइड)चा गंभीर धोका. ज्या तीन प्रगल्भ आणि अनुभवी अशा विद्वानांनी हा अभ्यासपूर्ण अहवाल सादर केला होता, त्यांतील दोन शास्त्रज्ञ अहमदाबादमधील अनुक्रमे स्पेस ॲप्लिकेशन्स सेंटर व फिजिकल रिसर्च लॅबोरेटरी या ख्यातनाम संस्थांमध्ये काम करणारे होते आणि तिसरे गोपेश्वर या ठिकाणी 'दशौली ग्राम स्वराज्य मंडळ' संस्थेचे समाजसेवक म्हणून प्रसिद्ध होते.

एम्. एम्. किमोथी, नवीन जुयाल आणि ओमप्रकाश भट्ट या तीन अभ्यासकांनी वर उल्लेखलेला अहवाल प्रत्यक्ष त्या भागात फिरून आणि उपग्रहांकडून मिळणाऱ्या माहितीचा कुशलतेने वापर करून केंद्र सरकारच्या अन्न मंत्रालयाला सादर केला. साठ पानांपेक्षा अधिक विस्तृत असा तो अहवाल होता आणि त्यात उत्तराखंडातील डोंगराळ प्रदेशातील अत्यंत दुर्बल झालेल्या परिसंस्थेवर हा भर होता. जगातील सर्वांत अधिक भूकंपप्रवण प्रदेशांपैकी उत्तराखंड हा प्रदेश आहे. मागील दोनशे वर्षांत जागतिक भूकंपांच्या ज्या नोंदी ठेवल्या गेल्या आहेत, त्यांत उत्तराखंड प्रदेशात १२२ भूकंप झाल्याची नोंद आहे. या प्रदेशावरील आणखी काही नैसर्गिक आपत्तींचा उल्लेख करायचा, तर जंगलातील वणवे आणि कधी कधी घडणारे हिमपात; शिवाय ठिकठिकाणी होणारे भूस्खलन- नैसर्गिक व बरेचसे मानवनिर्मित. जंगलातील वृक्षतोडीमुळे डोंगरउतारांवरील वनराजी नष्ट होऊ लागली आहे. अत्यंत निष्काळजीपणाने बांधलेले रस्ते आणि त्यांच्यासाठी सुरुंगांचा केलेला अतिरिक्त वापर यामुळे जमिनीतील खडकांना भेगा जाऊन काही ठिकाणी त्या खूप रुंदही झाल्या आहेत. जमिनीतून वर आलेले दगड-धोंडे, माती इत्यादी आणि त्यांच्यासोबत साठलेला कचरा हे सर्व उतारावरून पावसाच्या पाण्याबरोबर वाहत जाऊन नद्यांच्या प्रवाहात पडते आणि त्यांचे प्रवाह अडवले जातात. त्या प्रवाहात तात्पुरती छोटी-छोटी तळी निर्माण होतात. जेव्हा या प्रदेशात मुसळधार पाऊस पडतो, तेव्हा या तळ्यांचे बांध फुटतात. साचलेले पाणी वरून येणाऱ्या प्रवाहाच्या रेट्यामुळे नद्यांचे काठ फोडून बाहेर येते; सर्वत्र पसरते. त्यात पुढील प्रवाहाच्या जवळपासच्या वसाहती, घरे आणि शेते यांचा नाश होतो.

सन १९७० च्या पुराची मूळ कारणे शोधली, तर ती आधीच्या दशकात या प्रदेशातील रस्तेबांधणीला आलेला वेग आणि कारखान्यांसाठी व इतर आर्थिक लाभांसाठी झालेली अमर्याद वृक्षतोड हीच आहेत, असे आढळते. त्यामुळे डोंगरउतार उघडे पडले आणि अलकनंदा व तिच्या उपनद्या यांच्यामध्ये दगड-मातीचे ढीग साचले. त्या वर्षी जुलै महिन्यात जी मोठी ढगफुटी झाली, त्यातून २७५ मि.मी. इतका पाऊस केवळ चोवीस तासांत झाला. त्याचा परिणाम म्हणून या नद्यांमध्ये वाहत गेलेल्या पाण्याच्या अभूतपूर्व लोंढ्याचा जोर इतका होता की, भूस्खलनामुळे नद्यांच्या प्रवाहात निर्माण झालेले बंधारे फुटले आणि पुराचे पाणी सर्वत्र पसरून मोठी हानी झाली.

मागच्या काळातील व आजच्या परिस्थितीचे विश्लेषण करताना किमोथी, जुमाल आणि भट्ट यांनी पुढील अंदाज वर्तवले आहेत.

भविष्यात उद्‌भवणाऱ्या अशा महापुराचे संकट फार मोठ्या लोकसंख्येवर कोसळणार आहे आणि आधीच्या सर्व महापुरांत ग्रासला गेलेला सर्व प्रदेश पुराच्या पाण्याखाली जाणार आहे. त्यामुळे नदीकाठच्या सर्व वसाहतींना- निवासी किंवा कार्यालये मनाई करण्यात आली पाहिजे, असे आम्हाला वाटते. नद्यांच्या काठांवर अनधिकृत आरामगृहे बांधण्यात येणार नाहीत, याबद्दल दक्ष राहून त्यांच्या बांधकामावर नियंत्रण ठेवणे जरुरीचे आहे. अलकनंदा व तिच्या उपनद्या यांच्या खोऱ्यातील पाच मोठी गावे आणि नदीच्या प्रवाहाजवळ असलेल्या असंख्य लहान-मोठ्या वसाहती यांना १९७० इतकाच पुराचा मोठा तडाखा बसण्याचा संभव व त्यामुळे अपरिमित हानीचा संभव आहे.

अशा प्रकारचा संभाव्य हाहाकार टाळण्यासाठी या शास्त्रज्ञांनी काही उपाय सुचविले आहेत. त्यांपैकी पहिला उपाय म्हणजे- भूस्खलनाची शक्यता असणाऱ्या विभागाची पाहणी करून अशा प्रकारच्या जमिनी, त्यांत पडलेल्या भेगा, ढासळण्याचा संभव असलेले नैसर्गिक बंधारे यांची दुरुस्ती उपग्रहाकडून झालेल्या पाहणी तंत्राचा वापर करून करण्यात यावी. मॉन्सूनच्या आधी आणि नंतर अशा दोन वेळेला या देखरेखीचे काम अधिक काळजीपूर्वक करण्यात यावे. दुसरा उपाय म्हणजे- ढिसाळ झालेल्या उतारांची जमीन घट्ट व्हावी म्हणून त्या उतारांवर शास्त्रज्ञांच्या सल्ल्यानुसार देशी वृक्षांची लागवड करण्यात यावी. पाणी

थांबविण्यासाठी किंवा वळविण्यासाठी घातलेले बंधारे आणि भिंती यांची दुरुस्ती व उभारणी करण्यात यावी. आणखी एक उपाय आणि सर्वांत महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे– स्थानिक लोकांना अशा संकटांना थोपविण्याचे आणि त्यातून सुटका करून घेण्याचे प्रशिक्षण देणे. त्यासाठी ग्रामपंचायती, गावातील तरुण मुले आणि स्त्रिया यांना हाताशी धरून संभाव्य धोक्यातून बचाव कसा करावा याबाबत पूर्ण सूचना देऊन त्यांचे शिक्षण करावे लागेल.

प्रशासनाला सादर केलेल्या अशा इतर वैज्ञानिक अहवालांप्रमाणे सर्वसामान्य माणसांना या अहवालासंबंधी माहिती मिळाली नाही किंवा तो अहवाल मिळवताही आला नाही. मला स्वत:लाच त्याची प्रत गेल्या आठवड्यात उत्तराखंडातील नुकत्याच घडलेल्या भयानक दुर्घटनेनंतर मिळाली आणि तो अहवाल वाचून माझ्या मनात असंख्य प्रश्न उभे राहिले. केंद्रीय अन्न मंत्रालयाकडे ज्या अधिकाऱ्यांनी हा अहवाल सुपूर्द केला होता, त्यांनी स्वत: तो पूर्णपणे वाचला होता काय? केंद्रीय मंत्रालयाने तो राज्य सरकारकडे पाठवला होता काय? तिथे कोणी तो वाचून, विचार करून त्याची अंमलबजावणी करण्याचा आणि शास्त्रज्ञांनी दिलेल्या सावधानतेच्या इशाऱ्यांसंदर्भात हालचाली करण्याचा प्रयत्न केला होता काय? त्या अहवालात शास्त्रज्ञांनी दिलेल्या सज्जड पुराव्यांना डोळ्यांआड करून अलकनंदाच्या खोऱ्यात रस्त्यांचा विस्तार, निवासस्थाने, उपाहारगृहे आणि पर्यटकनिवास यांच्या विस्तारास सरकारने मुभा का दिली? या प्रश्नांची उत्तरे प्रशासनाकडे आहेत, असे वाटत नाही.

अन्न मंत्रालयाला सादर केला गेलेला अहवाल हा राज्य व केंद्र शासनाकडून अशा प्रकारच्या दुर्लक्षिल्या गेलेल्या अनेक अहवालांपैकी एक होता. याबाबत चंडीप्रसाद भट्ट यांनी असे म्हटले आहे की, भागीरथी आणि अलकनंदा या दोनही नद्या नेहमीच 'संवेदनशील' व पूरप्रवण अशा राहिल्या आहेत. अनेक वेळा आम्ही संबंधित अधिकाऱ्यांकडे त्यांच्या पुरांमुळे झालेल्या नुकसानीचे मूल्यमापन करून आकडेवारी सादर केली आहे. त्या प्रदेशात झालेले भूमिपात अगर भूस्खलन– तोडलेले देवदार वृक्ष आणि पर्वतरांगांत पेरलेले सुरुंग या सर्व नुकसानाच्या गोष्टी विकासाच्या नावावर खपविल्या गेल्या. स्थानिक वृत्तपत्रांनी या वस्तुस्थितीला प्रसिद्धी दिली होती, आम्ही अधिकाऱ्यांना वारंवार इशारे देत होतो आणि होणाऱ्या नुकसानीची जाणीव करून देत होतो; पण कशाचाही उपयोग झाला नाही.

उत्तर प्रदेशातील गेल्या महिन्यातील पुरांचे कारण नैसर्गिक असले, तरी निसर्गातील मानवाच्या हस्तक्षेपामुळे त्याचा परिणाम आणखी उग्र झाला. दि. १५ जूनची ढगफुटीची घटना अनपेक्षित होती, कारण या पर्वतमय प्रदेशात मोसमी पाऊस (मॉन्सून) साधारण जुलैच्या पूर्वार्धात सुरू होतो. तरीही या पावसाळ्यात येथे आलेली उद्ध्वस्तता ही नेहमीपेक्षा किती तरी पट अधिक प्रमाणात आहे आणि त्याचे कारण माणसांनी परिसंस्थेच्या भाषेत– त्या अतिशय संवेदनशील ठिसूळ भागात बेदरकारपणे चालविलेल्या बांधकाम प्रकल्पांत आहे.

उत्तराखंडात हे पुनर्वसनाचे वेदनादायक कार्य आता संथ गतीने चालू झालेले असताना, हिमालयाच्या इतर भागांतून मिळणाऱ्या इशाऱ्यांकडे दुर्लक्ष करू नका, असा दबाब राजकारण्यांवर आणावा लागेल. अरुणाचल प्रदेशात तेथील पर्यावरण आणि सामाजिक परिस्थिती यांच्यावर होणाऱ्या परिणामांचा अजिबात विचार न करता मोठ्या धरणांच्या अनेक योजना आखण्यात आल्या आहेत. त्यांना मंजुरी मिळून काही प्रमाणात काम सुरूही झालेले आहे. हा प्रदेशसुद्धा जोरदार मोसमी पावसाचा आणि दुथडी भरून वेगाने वाहणाऱ्या नद्यांचाच आहे. खोल व उभ्या उतरणींचे हे प्रदेश जंगलांनी व्यापलेले आहेत. धरणांचे बांधकाम येथील जंगलतोड आणि जमिनीची झीज घडवून आणणारे आहे. त्यामुळे जमिनीवरून वाहणाऱ्या प्रवाहांचा नैसर्गिक मार्ग बदलून पूर निर्माण करणारे आहे, अनेक खेड्यांचा नाश करणारे आहे.

या प्रकल्पांचे अल्पकालीन फायदे (जे ठेकेदार आणि शहरी ग्राहक यांना अधिक प्रमाणात आहेत) त्यांच्या अल्पकालीन आणि दीर्घकाळ टिकणाऱ्या पार्श्वभूमीच्या संदर्भात जोखणे महत्त्वाचे आहे. यात शहाणपणाचा मार्ग हा आहे की, उत्तराखंडाच्या या भयानक घटनांनंतर आता हिमालयातील चालू झालेल्या सर्व बांधकामांना तात्पुरती स्थगिती ताबडतोब द्यावी; आणि देशातील या विषयांचे तज्ज्ञ शास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांच्याबाबत कोणत्याही पूर्वग्रहांशिवाय या प्रकल्पांचा अभ्यास करून त्यांतील फायद्यांचे योग्य मूल्यमापन त्यांच्याकडून करून घ्यावे.

**– रामचंद्र गुहा**

(अनुवाद : कुमुद करकरे)



काल-परवा
१७

रामचंद्र गुहा

# हिमालयीन कर्तृत्वाच्या स्त्रिया

माझ्या मागील लेखामध्ये मीराबेन यांच्या पर्यावरणविषयक कार्याचा मी उल्लेख केला होता. मीराबेनचे मूळ नाव मॅडलिन स्लेड होते. ब्रिटिश नौदलातील एका सर्वोच्च अधिकाऱ्याची ही कन्या भारतात येऊन गांधीजींची अत्यंत विश्वासू सहकारी होऊन राहिली. आज मी अशाच दुसऱ्या एका ब्रिटिश महिलेची कथा सांगणार आहे, जिची हिमालयाशी बांधिलकी आणि या सुंदर पण ठिसूळ नगाधिराजाबद्दलची समज खूप सखोल होती.

त्या महिलेचे नाव होते कॅथरिन मेरी हेल्मन. तिचा जन्म १९०१ मध्ये लंडन येथे झाला. वडील जर्मन आणि आई ब्रिटिश. वडिलांचा व्यवसाय सोनाराचा होता. पण तो 'परक्या' वंशाचा होता म्हणून पहिल्या महायुद्धात त्याच्यावर स्थानबद्धता लादली गेली. त्याच्या मुलीच्या पदरातही सर्व बाजूंनी उपेक्षाच पडली. अशा विमनस्क परिस्थितीत तिची काही हिंदी विद्यार्थ्यांशी गाठ पडली. त्यांच्याकडून कॅथरिनला गांधींबद्दल व भारताच्या स्वातंत्र्यलढ्याबद्दल माहिती मिळाली. ते सर्व ऐकून कॅथरिनला एक नवी उमेद आली आणि तिने १९३२ मध्ये उदयपूर येथील एका शाळेमध्ये नोकरी मिळवून भारताच्या भूमीवर पाय ठेवला. दोन वर्षांनंतर तिची गांधीजींशी पहिली भेट झाली. त्यानंतर पुढील दोन वर्षे तिने गांधीजींच्या सेवाग्राम आश्रमात पायाभूत शिक्षणाचे (बेसिक एज्युकेशन) प्रयोग करण्यात घालविली. गांधीजींबद्दलचा तिचा आदर सतत वाढतच गेला; तरीही कस्तुरबांच्या ठाम आणि मोठ्या खडकासारख्या भक्कम व्यक्तिमत्त्वाचा कॅथरिनवर फार मोठा प्रभाव पडला. महात्माजींच्या कार्याच्या सफलतेमागे कस्तुरबांच्या स्वयंसिद्ध पाठिंब्याचा फार मोठा भाग होता, याची तिला जाणीव झाली.

कॅथरिनने स्वत:ला 'सरलादेवी' असे नाव घेतले. गांधींच्या आश्रमात तिला आपण समृद्ध होत चालल्याचा अनुभव येत होता. तथापि, मध्य भारतातील सेवाग्रामची हवा तिला मानवत नव्हती. अतिसार आणि हिवताप या विकारांनी तिच्या शरीरात ठाण मांडले. गांधींचे एक मित्र व सहकारी आचार्य जे. बी. कृपलानी यांच्याकडून अल्मोरा येथील खादीच्या प्रचारार्थ स्थापन केलेल्या एका आश्रमाची सरलादेवींना माहिती मिळाली आणि त्या अल्मोरा आश्रमात दाखल झाल्या. आश्रमाचे संचालक आणि गांधीजींचे एक अनुयायी शांतिलाल त्रिवेदी यांच्या देखरेखीखाली त्या तिथे राहून काम करू लागल्या. डोंगर, दऱ्या, जंगले आणि निसर्गातील देखावे यांचे त्यांना जणू वेडच होते. त्यामुळे तेथील परिस्थितीत त्या चट्कन् रमून गेल्या.

सन १९४२ मध्ये 'चले जाव' आंदोलनात आल्मोरा जिल्ह्याचा सहभाग मोठा होता. शेतकरी आणि विद्यार्थी यांचे मोर्चांवर मोर्चे निघत होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याचे प्रतीक असलेला तिरंगा नाचवत, ब्रिटिशविरोधी घोषणा देत निदर्शक वातावरण ढवळून टाकत होते. त्यामध्ये काही महिलांसह शेकडो निदर्शकांना अटक झाली. सरलादेवी जरी प्रत्यक्ष निदर्शनांत सामील झाल्या नाहीत, तरी त्यांची त्या आंदोलनकर्त्यांना असणारी सहानुभूती जाहीर होती. राजबंद्यांना तुरुंगात जाऊन भेटत असत, त्यांच्या कुटुंबीयांना वेळोवेळी साह्य करीत असत आणि पुढे-पुढे तर त्या भूमिगत कार्यकर्त्यांचे निरोप एकमेकांना पोहोचविण्याचे कामही करू लागल्या. याचा परिणाम त्यांना अटक होण्यात झाला आणि त्यांना दोन वेळा कारावास भोगावा लागला.

भारतीय उद्दिष्टांसाठी सरलादेवींनी काढलेले कष्ट आणि भोगलेल्या हाल-अपेष्टा यांच्यामुळे त्यांची भारतीय जीवनाशी झालेली एकात्मता सिद्ध झाली. तुरुंगातून सुटका झाल्यानंतर त्यांनी कस्तुरबा गांधी यांच्या स्मरणार्थ मुलींची शाळा सुरू केली. (त्या कारावासात असतानाच कस्तुरबांचा अंत झाला होता.) उत्तराखंडामधील सनातनी समाजातील मुली एक तर शेतात राबत, नाही तर घरकाम करीत. शिक्षणासाठी त्यांना समाजातून कोणत्याही प्रकारचे उत्तेजन मिळत नव्हते. ब्रिटिश संस्कृतीत वाढलेल्या पण भारतीय वातावरणाशी एकरूप झालेल्या सरलादेवींनी हे आव्हान



स्वीकारायचे ठरवले. कौसानी या ठिकाणी जागा घेऊन त्यांनी लक्ष्मी आश्रम सुरू केला आणि आपल्या मुलींना शिक्षणासाठी तेथे पाठविण्याचे आवाहन काँग्रेस कार्यकर्त्यांना केले. याबाबत त्या आपल्या आठवणी सांगतात– आम्ही मुलींच्या शिक्षणाचे कार्यक्रम आखत असताना, काही सनातनी आणि ज्यांची मान हलल्यामुळे डोके डुगडुगते आहे असे वृद्ध गावकरी 'तुम्ही सामाजिक परंपरांना बाधा आणत आहात' अशी ओरड करीत होते. अशामुळे जातीबाहेर जाणाऱ्या मुलींची पुढे लग्ने कशी होणार, ही चिंता त्यांना सतावीत होती.

लक्ष्मी आश्रमातल्या या मुली स्वत:ला लागणारा सर्व भाजीपाला पिकवीत होत्या, कालवडी आणून त्यांची जोपासना करीत होत्या आणि मोठ्या गाईंची निगा राखीत होत्या. त्यांचा अभ्यासक्रम गांधीजींच्या शैक्षणिक तत्त्वांवर आधारलेला होता. त्यात भाषा, विज्ञान आणि सामाजिक शास्त्रे याबद्दलच्या अभ्यासक्रमाबरोबर उदरनिर्वाहासाठी आवश्यक असणारी बुनाई (मागावरचे विणकाम) सारखी कौशल्येही शिकविली जात होती. आश्रमाचे सर्व व्यवस्थापन या मुलींच्या हाती होते, हिशोब आणि पैशाचे व्यवहारही त्या पाहत.

सरलादेवींच्या आश्रमातल्या मुलींनी आपले कर्तृत्व सिद्ध केले. त्या आत्मविश्वास बाळगणाऱ्या सक्षम स्त्रिया बनल्या. आश्रमातून शिक्षण पूर्ण करून त्यांनी बाहेरील जगात पाऊल टाकले, ते शिक्षक आणि समाजसेवक या भूमिकांत. काहींनी स्वत:च्या शिक्षणसंस्था, शाळा काढल्या. त्या सर्वांनी मिळून उत्तराखंडात एक शांततापूर्ण, नि:शब्द क्रांती घडविली. त्या समाजातील काही गुणी व्यक्तींचे प्रबोधन करून सरलादेवींनी त्यांना गांधींच्या चळवळीमध्ये दाखल करून घेतले. १९६० व १९७० च्या दशकांमध्ये लक्ष्मी आश्रमातील स्नातकाची (पदवीधर) योग्यता संपादन केलेल्या अनेक महिला आणि आश्रमाचे अनेक कार्यकर्ते, हितचिंतक यांनी दारू, जंगलतोड व हिमालयातील मोठ्या धरणयोजना, त्यांचे स्थान या संदर्भात मोठमोठे लढे उभारले.

सरलादेवी जसजशा वृद्ध होत गेल्या तसतशी त्यांच्या मनाची अस्वस्थता (देशाने आणि जगानेही स्वीकारलेली प्रगतीची दिशा पाहून) वाढत गेली. १९७६ मध्ये एका लेखात त्यांनी हताश मनोवस्थेत लिहिले आहे, 'उत्पादन आणि मनोरंजन या दोन क्षेत्रांत माणसाला यंत्राचे गुलाम बनवून, त्याला निसर्गापासून दूर करून, झपाट्याने वाढणाऱ्या वायू, जल आणि नैसर्गिक ऊर्जास्रोतांच्या प्रदूषणामुळे, शब्द व वेग यांच्या अतिरेकाने, कौटुंबिक नात्यांचा ऱ्हास आणि सामाजिक हितसंबंधांची झीज होत गेल्यामुळे– अशा कारणांमुळे सर्व मानवजातीच्या शारीरिक-मानसिक आरोग्यासमोर एक अभूतपूर्व आणि बिकट संकट उभे राहिले आहे.'

सरलादेवींनी लिहिलेल्या आपल्या आठवणींत त्यांच्या जीवनातील प्रमुख टप्प्यांची नोंद केली आहे. या पुस्तकाचे पहिले प्रकाशन हिंदीत १९७६ मध्ये झाले. (सरलादेवींचे १९८२ मध्ये निधन झाले). त्याचे इंग्रजीमध्ये सुबक भाषांतर डेव्हिड हॉपकिन्स यांनी केले आणि नैनितालच्या 'पहाट' प्रकाशनाने ते प्रसिद्ध केले. 'एक लाइफ इन टू वर्ल्डस्' असे त्याचे शीर्षक आहे. दरम्यानच्या काळात पुरातत्त्वसंशोधक (ॲन्थ्रॉपॉलॉजिस्ट) डॉ. रिबेका क्लेंक यांनी सरलादेवींचा वारसा आणि त्यांचे कार्य यांवर दीर्घ संशोधन करून अलीकडेच 'एज्युकेटिंग ॲक्टिव्हिस्ट्स : डेव्हलपमेंट ॲण्ड जेंडर इन द मेकिंग ऑफ मॉडर्न गांधीयन्स' या नावाचे पुस्तक प्रसिद्ध केले आहे. डॉ. क्लेंक यांनी १९९१ मध्ये लक्ष्मी आश्रमाला पहिली भेट दिली आणि नंतर त्या पुन: पुन्हा येऊन तेथील मुलींशी संवाद साधत. त्यांच्या शिक्षणावर, कामावर देखरेख करीत, त्यांना मदत करीत आणि तेथील परिस्थितीचा अभ्यास करीत. काही आठवडे किंवा महिन्यांचेही त्यांचे तेथे वास्तव्य असे.

'एज्युकेटिंग ॲक्टिव्हिस्ट्स' या ग्रंथाचे बलस्थान होते, ते म्हणजे या आश्रमाच्या सर्व उपचारांतून बाहेर निघालेल्या महिलांची आत्मकथने. आश्रमात १९९१ मध्ये दाखल झालेल्या श्रीमती राधा भट यांच्या प्रदीर्घ मुलाखती येथील परिस्थितीची विस्तृत माहिती देतात. आश्रमात राधाबहेन दाखल झाल्यानंतर पंधरा वर्षांनी आश्रमाची सर्व जबाबदारी त्यांच्यावर सोपवून सरलादेवी स्वेच्छेने बाजूला झाल्या. चारित्र्यसंपन्न असलेल्या राधाबहेनचे व्यक्तिमत्त्व मोठे प्रसन्न होते. तीस वर्षांपूर्वी पिठोरगड जिल्ह्यातील चांडक-शिखराना विभागातील बेकायदा उत्खननाच्या (खाणकामाच्या) विरोधात त्यांच्या नेतृत्वाखाली निघालेल्या मोर्चात सामील होण्याची संधी मला मिळाली होती; त्या वेळच्या विविध आठवणी माझ्यासोबत आजही आहेत. त्या वेळी कुमाउंनी गावातील नागरिकांमध्ये त्यांनी आपल्या भाषणांनी आणि सहवासाने निर्माण केलेले चैतन्य मला त्यांच्या क्षमतेचा साक्षात्कार घडवून गेले.

रिबेका क्लेंक यांच्या निवेदनात एक ठळकपणाने पुढे आलेले नाव होते, विमला बहुगुणा (नौटियाल). टिहरी- गढवालमधील एका पितृसत्ताक आणि सनातनी संस्थानात तिचे बालपण गेले, ज्यात मुलींसाठी साधी शाळाही नव्हती. सुदैवाने तिच्या वडिलांच्या ऐकीवात सरलादेवी आणि त्यांच्या लक्ष्मी आश्रमाचे नाव होते, म्हणून त्यांनी शिक्षणासाठी व त्यापुढील

प्रशिक्षणासाठी विमलाबहेनना तेथे पाठविले. ते पूर्ण झाल्यावर विमलाबेन घरी परतल्या व आपल्या जिल्ह्यात त्यांनी स्वत:ची शाळा व आश्रम यांची स्थापना केली. या विमलाबहेनचा पुढे प्रख्यात पर्यावरण अभ्यासक सुंदरलाल बहुगुणा यांच्याशी विवाह झाला आणि मग दोघांनी मिळून त्या पर्वतमय प्रदेशातील पर्यावरण चळवळीत कळीची भूमिका बजावली.

उत्तराखंडाची ज्यांना माहिती आहे, त्यांना राधा भट्ट आणि विमला बहुगुणा ह्या स्त्रिया वंदनीय वाटतातच! पण लक्ष्मी आश्रमातील स्नातक पदवी घेतलेल्या पण फारशा माहीत नसलेल्या अशा इतरही काही स्त्रियांची माहिती डॉ. क्लेंक देतात; त्यांच्या व्यक्तिगत आणि बौद्धिक विकासाची कथा सांगतात. गरीब कुटुंबातील लाजाळू, भित्र्या मुलींचे परिवर्तन आत्मविश्वासाने वावरणाऱ्या आणि बोलक्या व स्पष्टपणे विचार मांडणाऱ्या प्रगत स्त्रियांमध्ये कसे झाले; त्यांनी उत्तराखंडात व आजूबाजूच्या प्रदेशात सामाजिक बदल घडवून त्यांना प्रगतिपथावर कसे नेले याची जवळून अनुभवलेली कहाणीही डॉ. क्लेंक सांगतात. त्यांच्या कथनात सरलादेवींना ज्यांनी पाहिलेले नाही, अशा कार्यकर्त्यांच्या अनेक पिढ्या त्यांच्या जीवनसंदेशाचा प्रचार करताना दिसतात.

लक्ष्मी आश्रमाला रिबेका क्लेंक 'गांधीवादातील आधुनिकते'चा एक प्रयोग मानतात. ज्यातून मागासलेल्या प्रदेशातील ग्रामीण मुलींना जवळीक, महत्त्व, जीवनहेतू आणि वेळेची किंमत यांचा अनुभव व शिक्षण मिळते. नव्याने स्वतंत्र देशात येथील स्त्रियांना प्रशिक्षित करून, आधुनिक नागरिक बनवून त्यांच्यामधून ग्रामीण नेतृत्व घडवून उत्तराखंड हिमालयाला स्थान मिळवून देऊन देशाशी एकरूप करणे आणि गांधींच्या स्वातंत्र्य व स्वराज्य यासंबंधीच्या खऱ्या कल्पनांचा प्रसार करणे, हे सर्व या प्रयोगात अध्याहृत आहे. आश्रमात येणाऱ्या मुली ब्राह्मण, रजपूत, बनिया, दलित आणि भूतिया आदी सर्व प्रकारच्या सामाजिक पार्श्वभूमीतून आलेल्या असतात. त्यांची मुलाखत घेणाऱ्या अमेरिकन 'मॅडम'ना त्यांनी दिलेल्या माहितीत ह्या आश्रमाचे उद्दिष्ट सामाजिक संघर्ष व परिवर्तन असून या राष्ट्राशी आणि जगाशी उत्तरखंडाला सुसंवादी बनविणे आहे, असे स्पष्ट केले आहे. 'साठ वर्षांच्या काळात लक्ष्मी आश्रमाच्या स्नातक महिलांनी स्त्रियांचे हक्क, त्याचप्रमाणे आर्थिक व पर्यावरणविषयक न्याय या त्यांच्या मागण्या तर पणाला लावल्याच; पण ज्यांचा घोष वारंवार चाललेला आहे, त्या उदारीकरण आणि लोकशाही यांच्या नावाने टाकण्यात येणारी पावले सर्व भारतीयांना सुरक्षित व समाधानी जीवनमान मिळवून देण्याआड कशी येत आहेत याचा आढावा समाजासमोर त्या आपल्या सुस्पष्ट आणि विधायक विचारांतून मांडत राहिल्या,' असे डॉ. क्लेंक यांनी लिहून ठेवले आहे.

'एज्युकेटिंग सिटिझन्स' हे पुस्तक वाचत असताना या सामाजिक कार्यकर्त्यांनी कोणत्याही तत्त्वबोधाच्या गुंत्यात न अडकता अगदी सरळपणाने आणि खुल्या मनाने गांधीजींचा संदेश जगासमोर मांडला, ती पद्धत माझ्या मनाला स्पर्शून गेली. समकालीन आशा-आकांक्षांशी त्यांनी तो संदेश सहजपणे जोडला. रोजगारनिर्मिती व जीवनसुरक्षा या गोष्टी त्यांच्यासाठी स्वयंनियंत्रण आणि व्यक्तिगत साधेपणा यांच्या इतक्याच निकडीच्या होत्या. संस्थेमधल्या सहज बदलाचे व सातत्याचे वृत्तही मला प्रभावित करून गेले. आश्रम स्थापन केल्यानंतर वीस वर्षांनी सरलादेवींनी त्याचे सर्व अधिकार सोडले. त्यांच्या पावलावर पाऊल टाकून राधाबहेननीही आश्रमाचा कारभार दोन दशके चालवून नंतर एका तरुण सहकारिणीच्या हाती आश्रमाची जबाबदारी सोपविली. हे सर्व वाचत असताना मला अहमदाबाद येथील 'सेल्फ एम्प्लॉइड वुमेन्स असोसिएशन' या संस्थेत जे सहज परिवर्तन झाले, त्याची आठवण झाली. या संस्थेच्या संस्थापक इला भट्ट यांनीही संस्थेच्या कामांतून निवृत्त होण्याचे ठरविल्यानंतर दररोजच्या कामातून हळूहळू स्वत: अलिप्त राहण्यास सुरुवात केली; त्याचा परिणाम म्हणून अपेक्षेप्रमाणे तरुण मुलींनी त्या जबाबदाऱ्या उचलण्यास सुरुवात केली. अशा संस्थांची नावे अपवादात्मकच आहेत. कारण स्वत: स्थापन केलेल्या खासगी संस्थेचे अधिकारपद आणि नियंत्रण सोडण्यास संस्थापक कधीही तयार नसतात.

उत्तराखंडाला अलीकडेच ज्या शोकांतिकेला तोंड द्यावे लागले, त्यानंतरच्या काळात वर उल्लेख केलेल्या दोन पुस्तकांचे वाचन मी केले. त्यांचे वाचन हा एक बोचरा अनुभव होता. त्यानंतर माझ्या मनात अनेक प्रश्नांची गर्दी झाली. ज्या प्रदेशात अशी नि:स्वार्थी, कर्तृत्वसंपन्न माणसे जन्माला आली, त्या प्रदेशावर असे भयानक दुर्दैव का ओढवावे? त्या प्रदेशाच्या दुरुस्तीचे आणि पुनर्रचनेचे काम जे सर्वांसमोर आहे, त्यासाठी राज्य व केंद्र सरकार या प्रदेशातील अद्यापही कार्यरत असणाऱ्या सामाजिक कार्यकर्त्यांचे साह्य अगर पाठिंबा मागतील काय? त्यांच्याकडून अधिक माहिती काढू शकतील काय? की, ते अजूनही काही उथळ आणि तात्पुरत्या उपायांच्या आहारी जाणार आहेत.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.



काल-परवा १८

रामचंद्र गुहा

# 'फाळणी'ची स्मरणयात्रा

मागील वर्षी माझ्या तीन सधन आणि बहुश्रुत परिचितांनी मला एकाच विषयाची कल्पना देत, पण वेगवेगळे सुनावले. भारताच्या फाळणीप्रक्रियेत ज्यांचा बळी गेला, त्यांचे एखादे स्मारक- किमान एखादे माहिती अगर वस्तुसंग्रहालय- त्यांच्या स्मरणार्थ उभे राहिले पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता. 'होलोकॉस्ट'मध्ये हत्याकांड झालेल्या अगर छळछावणीत बळी गेलेल्या लक्षावधी ज्यूंची इस्राईल, युरोप व अमेरिकेत स्मारके उभी राहिली आहेत. पण हिंदुस्थानची फाळणी होतानाही काही लाख लोकांचे बळी गेले; त्यांच्या स्मृती आपण भारतीय का जपू शकत नाही, याचा जाब जणू ही जगभर उभी राहिलेली स्मारके दक्षिण आशियाई देशांकडे मागत आहेत, असा त्यांच्या बोलण्याचा भावार्थ होता.

सदर प्रस्ताव माझ्याकडे स्वतंत्रपणे तीन व्यक्तींकडून यावा, हा केवळ योगायोग नाही. भारतामध्ये आता स्वत:ची बुद्धिमत्ता, कौशल्य आणि उपक्रमशीलता वापरून कर्तृत्वाच्या आधारे सधन झालेल्या स्त्री-पुरुषांचा एक मोठा वर्ग निर्माण झाला आहे. माझ्याशी वरील विषयाबाबत संवाद साधणाऱ्या तिघांपैकी कोणालाही आई किंवा वडिलांकडून संपत्तीचा वारसा मिळालेला नाही. ते तिघेही जगभर फिरलेले आहेत. त्यांच्यामध्ये एक महिला आहे. ती पाश्चात्त्य विद्याविभूषित असून तिचे पाश्चात्त्य राष्ट्रांत, विशेषत: अमेरिकेत व्यक्तिगत आणि व्यावसायिक संबंध दृढ झालेले आहेत. त्या देशात ज्यूंच्या शोकांतिकेचा इतिहास आजही तितकाच ताजा आहे. त्या वेदनेवर आजही सतत लिहिले-बोलले जात आहे; दु:ख-संताप व्यक्त होत आहे. स्मारकांद्वारे आणि वस्तुसंग्रहालयात जपल्या जाणाऱ्या या स्मृती असे अघोरी प्रकार पुन्हा कधीही घडू नयेत- घडणार नाहीत, असा सक्त इशारा देत आहेत. त्यामुळेच या समजूतदार, उदारमनस्क भारतीय सधन व्यक्ती असे विचारताना दिसतात की, आपल्याही बांधवांनी फाळणीच्या काळात भोगलेल्या त्यांच्या दु:ख-वेदनांचे स्मारक आपण का उभारू नये?

या प्रकल्पाला आपले योगदान पहिले असावे, या इच्छेने साह्याचा चेक फाडण्यासाठी हे तिघेही आपापले चेकबुक काढून तयार होते; पण मी हाताने त्यांना थांबवत थोड्या विषादानेच त्यांचा उत्साहभंग केला. त्यांना मी हे समजावून सांगितले की, त्यांच्या या कल्पनेमागचा उद्देश कितीही उदात्त असला, तरी फाळणीचे स्मारक किंवा वस्तुसंग्रहालय यांचा प्रकल्प येथे प्रत्यक्षात येण्याचा संभव नाही. 'होलोकॉस्ट'मध्ये भस्मसात झालेले ज्यू आणि फाळणीच्या प्रक्रियेत मारले गेलेले लोक यांची कथा मुळातच वेगळी आहे, हे या दोन

'फाळणी' या विषयावर आधारलेले संग्रहालय ही कल्पना अशक्य आणि असमाधानकारकही असू शकेल, पण १९४७ च्या उन्हाळ्यात आणि त्यानंतरच्या काळात ज्या भयाण घटना घडल्या; त्यांचे स्मरण कादंबरी, स्मृतिचित्रे, नाटक-सिनेमा किंवा थेट ऐतिहासिक लिखाण यांच्यासारख्या व्यापक व खुल्या माध्यमांद्वारे होऊ शकेल. माझ्या सधन मित्रांनी ह्या पर्यायांना आर्थिक साह्य देण्याचा सहानुभूतीपूर्वक विचार करावा.

प्रकरणांची तुलना केल्यावर आपल्या लक्षात येईल. ‘होलोकॉस्ट’मध्ये अत्याचार करणारे गुन्हेगार कोण आणि त्यांचे बळी कोण, हे स्पष्ट झालेले आहे; तर फाळणीच्या घटनेत एकीकडे बळी जाणारे दुसरीकडे आक्रमक गुन्हेगार ठरले आहेत.

दुसऱ्या महायुद्धात आर्यांचे श्रेष्ठत्व सिद्ध करण्याच्या ध्यासातून नाझींच्या नेतृत्वाखाली जर्मनांनी युरोपमधील साठ लाख ज्यूंची कत्तल संघटितपणे केली. त्याउलट, हिंदुस्थानची फाळणी होत असताना व त्यानंतरचा काही काळ सर्व संबंधित गटांकडून हिंसाचार चालूच होता. पूर्व पंजाबातील हिंदूंनी मुस्लिमांची कत्तल करून वांशिक हिंसाचार केला. अमृतसर हे मुस्लिम बहुसंख्यांकाचे शहर निर्मुस्लिम झाले. त्याउलट, सीमेपीलकडील पश्चिम पंजाबात हिंदू व शीख यांची ससेहोलपट करून, त्यांचा पूर्ण संहार करून मुस्लिमांनी त्यांच्या प्रदेशात हिंदूंचे अस्तित्व नावालाही ठेवले नाही. हिंदू व शीख यांना अतिप्रिय असणारे लाहोर शहर आता फक्त मुस्लिमांचीच ‘शान’ बनले. शहरामध्ये उफाळलेल्या हिंसाचाराला तशाच अघोरी हत्याकांडाची साथ ग्रामीण भागातूनही मिळाली.

उपखंडाच्या दुसऱ्या टोकाला, बंगालमध्येही काही वेगळे चित्र नव्हते. हिंदू विरुद्ध मुस्लिम अशी थेट लढाई येथे होती. शिखांसारखा तिसरा पक्ष त्या लढाईत नव्हता. पंजाबप्रमाणे येथील हिंसाचार पूर्ण नायनाट करणारा नसला, तरी तेवढाच रानटी होता. पूर्व बंगालमध्ये फाळणीनंतरही अनेक हिंदू शिल्लक राहिले; पण इतर खूपसे मारलेही गेले किंवा जीव बचावण्यासाठी ते पूर्व बंगालच्या पश्चिम सरहद्दीकडे सरकले. पश्चिम बंगालमध्ये काही मुस्लिमांची वस्ती कायम राहिली तरी बऱ्याच जणांची हत्या झाली आणि काहींनी मुस्लिम बहुसंख्य असणाऱ्या सरहद्दीजवळील गावांत किंवा पूर्व बंगालमध्ये स्थलांतरित होऊन आश्रय घेतला.

‘होलोकॉस्ट’च्या घटनेत ज्यूंचा संहार करणारे जर्मन होते. फाळणीच्या घटनेत मुस्लिम, शीख व हिंदू हे सर्वच हिंसाचारात सहभागी होते आणि हिंसाचाराचे बळीही होते. या फाळणी-प्रक्रियेला आणखीही एका पक्षाचा हातभार लागला होता- ब्रिटिश. त्यांनी फाळणीच्या भीषणतेला प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष उत्तेजन दिले याकडे दुर्लक्ष करून किंवा त्या घटकाला कमी लेखून चालणार नाही. भारतीय स्वातंत्र्य जसजसे जवळ येत चालले, तसतसे ब्रिटिश सत्ताधारी लबाडीने किंवा काही बाबतींत अगदी थेटपणे हिंदू व मुस्लिम नेत्यांच्या मनातील संशय आणि वैर अधिक प्रबळ होईल, अशा कारवाया करीत होते. हिंदू आणि मुस्लिम या दोघांनी एकत्र येऊन त्यांच्याविरुद्ध आघाडी उघडू नये, हा अर्थातच त्यामागील उद्देश होता. स्वातंत्र्य व फाळणी या दोन घटना हातांत हात घालून सामोऱ्या आल्यानंतर ब्रिटिशांनी सैन्यातील महत्त्वाच्या तुकड्या गोऱ्यांच्या वसाहतींभोवती तैनात केल्या आणि उसळलेल्या भीषण दंगलींना आळा घालण्यासाठी वापरावयाची लष्करी ताकद स्वत:च्या संरक्षणासाठी वापरली. या भीषण संहाराचे खापर आपल्यावर फुटू नये, म्हणून भारत व पाकिस्तान या दोन देशांतील निश्चित सरहद्दीचा तपशील देणारा निर्णय पंधरा ऑगस्टनंतरही काही काळ लांबवला आणि या कटू घटनांचे ओझे भारत व पाकिस्तान सरकारवर टाकून ते मोकळे झाले.

‘होलोकॉस्ट’ वस्तुसंग्रहालयाचे नियोजन व व्यवस्थापन करणाऱ्यांसमोर त्या इमारतीची बांधणी, त्यातील खोल्यांचा आकार, प्रदर्शनीय वस्तूंची निवड आणि त्यांच्या मांडणीचा क्रम हे सौंदर्य व अभिरुचीच्या कसोटीवरचे प्रश्न उभे होते. त्यांत थोडीफार गुंतागुंत असली, तरी ती नैतिक नव्हती. त्यांचा मार्ग सरळ होता. त्यांच्यासमोर जर्मन आणि त्यांचे सहकारी गुन्हेगार म्हणून स्पष्टपणे उभे होते; त्याचबरोबर ज्यू आणि त्यांचे संहारक त्यांच्यालेखी चांगले, निर्दोष नागरिक सिद्ध झाले होते.

संकल्पित फाळणी वस्तुसंग्रहालयाचे काम हे वस्तुत: अधिकच गुंतागुंतीचे आहे. त्यात ब्रिटिशांची खलनायकाची भूमिका स्पष्ट करून दाखवणे सोपे आहे. पण या नाट्यातील दुसऱ्या पात्रांबद्दल लिहिताना समतोल राहणे फार अवघड आहे. याचे कारण या कथेचे निवेदक असलेले हिंदू, मुस्लिम व शीख हे सर्व त्या कथानकातले बळीही आहेत. भारतीय हिंदूंच्या कथनात येते की, देशद्रोही मुस्लिमांना महंमद अली जीना यांच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेची भुरळ पडली आणि त्यांच्या नेतृत्वाखाली त्यांनी आपल्या मातृभूमीचा तुकडा पाडला. पाकिस्तानी मुस्लिमांचे म्हणणे होते की, हिंदूंचा उर्मटपणाच याला कारणीभूत आहे. मोहनदास गांधी या बनियाच्या कारस्थानी योजनांमुळे मुस्लिमांचा खूनखराबा करण्यास ते सरसावले आणि त्यांनी रक्तपात घडवून आणल्यामुळेच मुस्लिमांना वेगळी मातृभूमी निर्माण करावी लागली. शीख आपल्या निवेदनात मुस्लिम व हिंदू या दोघांनाही दोष देतात. मोगलांच्या काळापासून मुस्लिमांनी शिखांविरुद्ध हाडवैर कसे जोपासले, हे सांगत असताना हिंदूंनी फक्त आपला स्वार्थ साधण्यासाठी त्यांना जवळच्या असलेल्या शिखांचा विश्वासघात कसा केला याची कहाणीही ते सांगतात.

फाळणीचे स्मृतिसंग्रहालय उभारण्याचा प्रस्ताव मांडणाऱ्या काही सज्जन व समजूतदार व्यक्तींना हा प्रकल्प पुन्हा सर्वांना एकत्र आणील, अशी आशा वाटते. पण वास्तवात अशा तऱ्हेच्या संग्रहालयांच्या उभारणीतून संबंधित लोकमानसांना काही नव्या जखमा होतील किंवा जुन्या जखमांवरच्या खपल्या निघतील, अशीच शक्यता जास्त आहे. कारण फाळणीच्या कहाण्या या दोनही बाजूंनी इतक्या धारदार आणि संकुचित मनोवृत्तीच्या निदर्शक आहेत की, एखादी प्रदर्शनीय वस्तू किंवा इमारत वा स्मृतिस्थळ यांच्या बांधकामातून या समाजाचे मनोमीलन होईल, ही आशा करणे व्यर्थ आहे.

वस्तुसंग्रहालयाची कल्पना निष्फळ असली, तरी फाळणीसंबंधी चर्चा अगर विचार करण्याचे दुसरे काही मार्ग अस्तित्वात आहेत. अलीकडेच मी या संदर्भात एक पुस्तक वाचले. 'सिंध : स्टोरीज फ्रॉम अ व्हॅनिश्ड होमलँड' हे त्याचे नाव. त्याची लेखिका साज आगरवाल ही भारतातच जन्मली आणि वाढली. पण तिच्या कुटुंबाची पाळेमुळे पाकिस्तानमधील सिंधमध्ये पसरलेली. तिचे पुस्तक फाळणीपूर्वीच्या अखंड सिंध प्रांतातील जीवनाचा अनुभव देते. सिंधमधील त्या वेळची गावे व खेडी, त्यांच्यामध्ये राहणाऱ्या हिंदू आणि मुस्लिम नागरिकांचे व्यवहार यांचा इतिहास आपल्या निवेदनातून तिने मोठ्या कौशल्याने सादर केलेला आहे. पुढे ते निवेदन १९४७ पर्यंत येते आणि मग सिंधी हिंदूंची ससेहोलपट, त्यांचे सक्तीने झालेले सीमेपलीकडे स्थलांतर आणि मग भारतात आल्यावर नशिबी आलेले निर्वासिताचे खडतर जीवन, त्यातून धैर्याने सावरून नवजीवनाकडे त्यांनी घेतलेली झेप... यांच्या कथा.

फाळणीसंबंधीच्या संशोधक दृष्टिकोनातून निर्माण केलेल्या अगर लोकमानसाला भावणाऱ्या अशा दोनही प्रकारच्या वाङ्मयावर पंजाबी अगर बंगाली ठसा उमटलेला दिसतो. दंगली आणि फाळणी यांच्यामुळे या प्रदेशांची जी पडझड झाली आणि मानवी जीवन उद्ध्वस्त झाले, त्याची पार्श्वभूमी या लिखाणाला असणे स्वाभाविक आहे. सिंधबद्धल रीता कोठारी यांनी केलेल्या लिखाणासारखेच साज आगरवाल यांनीही सिंधी हिंदूंचे त्या काळात दुर्लक्षित केले गेलेले जीवन व त्यांच्या व्यथा आपल्या लिखाणात स्पष्टपणे मांडल्या आहेत आणि त्यांचे अनुभव प्रकाशात आणले आहेत. सिंधी लोकांची शोकांतिका ही या सर्वांत अधिक बोचरी आहे. बंगाल आणि पंजाबमधल्या मुसलमानांना त्यांचे राष्ट्र मिळाले आहे; बांगलादेश आणि पाकिस्तान, पंजाब आणि बंगालमधील निर्वासित हिंदूंनाही भारतात त्यांची मातृभूमी गवसली आहे. पण सिंधी हिंदू भारतीय सत्तेपासून दूर आहेत; तर पाकिस्तानातील सिंधी मुस्लिम त्यांच्याच देशात नव्याने दाखल झालेल्या उर्दू भाषिक मोहाजीर व पंजाबी भाषिक आणि पाकिस्तानच्या इतर भागांतून आलेले पुश्तू भषिक यांच्या दडपणाखाली जगत आहेत.

साज आगलवालचे पुस्तक सध्या या विषयावरील चर्चेत आहे. त्या मागोमाग कदाचित इतरही घडामोडींवर अगर कथासूत्रांवर प्रकाश टाकणारी संस्मरणे प्रसिद्ध होत राहतील. पण संग्रहालयांचा आवाका बंदिस्त असतो. एका विशिष्ट दिशेनेच त्यांचे संदेश जातात. म्हणून राजकीय घटनांची नोंद घेणारे वस्तुसंग्रहालय तेव्हाच योग्य परिणाम साधू शकते, जेव्हा त्याद्वारे केले जाणारे निवेदन स्पष्ट आणि थेट असते. 'होलोकॉस्ट' संग्रहालय या मर्यादांत बसते. त्याचप्रमाणे दक्षिण आफ्रिकेतील जोहान्सबर्ग शहराबाहेर उभे राहिलेले वर्णभेद- विरोधी संग्रहालय (ॲपार्थिड म्युझियम) त्या प्रश्नाची कृष्ण-धवल चौकट स्पष्टपणे दाखवते.

'फाळणी' या विषयावर आधारलेले संग्रहालय ही कल्पना अशक्य आणि असमाधानकारकही असू शकेल, पण १९४७ च्या उन्हाळ्यात आणि त्यानंतरच्या काळात ज्या भयाण घटना घडल्या; त्यांचे स्मरण कादंबरी, स्मृतिचित्रे, नाटक-सिनेमा किंवा थेट ऐतिहासिक लिखाण यांच्यासारख्या व्यापक व खुल्या माध्यमांद्वारे होऊ शकेल. माझ्या सधन मित्रांनी ह्या पर्यायांना आर्थिक साह्य देण्याचा सहानुभूतीपूर्वक विचार करावा.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**

22-A, Bruntan Road, Bangalore 560025.

---

दि. १० ऑगस्ट २०१३ या अंकातील रामचंद्र गुहा यांच्या लेखाच्या अनुवादामध्ये पृष्ठ १०, उजवा स्तंभ, नववी ओळ यामध्ये अँथ्रॉपॉलॉजी या इंग्रजी शब्दाला 'पुरातत्त्वशास्त्र' हा शब्द वापरला गेला आहे. तो चुकीचा असून अँथ्रॉपॉलॉजी या शब्दाचा 'मानववंशशास्त्र' हा योग्य अनुवाद आहे. चुकीबद्दल दिलगीर आहोत.

**– अनुवादक**



काल–परवा
१९

रामचंद्र गुहा

# विकास की विध्वंस?

तीस वर्षांपूर्वी दिल्ली विद्यापीठातील काही विद्यार्थ्यांनी नर्मदा खोऱ्यात पायीच भटकण्याचा एक संकल्प करून तो पार पाडला. प्रवास बराच अडचणीचा व कठीण होता; पण त्याचे नियोजन एक सहल म्हणून केलेलेच नव्हते. त्या खोऱ्यामध्ये विद्युत्‌निर्मिती आणि पाणीपुरवठा यांच्यासाठी जे भव्य प्रकल्प उभे राहत होते, त्यांचा तेथील पर्यावरणावर आणि परिसंस्थेवर (इकॉलॉजी) होणाऱ्या संभाव्य परिणामांचा अभ्यास त्यांना स्वत:च्या अनुभवातून करायचा होता. त्याचबरोबर नर्मदा नदीच्या खोऱ्यातील स्वाभाविक आणि सांस्कृतिक वारसा धुंडाळून त्यांना त्याची नोंद करून घ्यायची होती. या सर्व भ्रमंतीवर त्यांनी जो अहवाल लिहिला, त्यातील महत्त्वाचा मजकूर लंडन येथील 'इकॉलॉजिस्ट' या नियतकालिकात आणि मुंबईतील 'इकॉनॉमिक अॅण्ड पोलिटिकल वीकली'मध्ये प्रसिद्ध झाला. माहितीने समृद्ध आणि कोणत्याही अभिनिवेशाशिवाय साध्या शब्दांत लिहिलेला हा वृत्तांत ऐतिहासिक व कुतूहल जागृत करणारा ठरला. कारण हा ई.पी.डब्ल्यू.मधील वृत्तांत वाचूनच मुंबईतील एक सामाजिक कार्यकर्त्या मेधा पाटकर यांनी नर्मदा खोऱ्यामध्येच राहून आपल्या पुढील कार्याची पायाभरणी करण्याचे ठरविले.

नर्मदा खोऱ्याबाबत सरकारने जी महत्त्वाकांक्षी योजना आखली होती, त्यात तीस मोठी धरणे या प्रदेशात बांधली जाणार होती. मध्यम आवाक्याच्या आणखी १३५ धरणांचे नियोजन त्या आराखड्यात केले जात होते. तेथे आलेल्या विद्यार्थी संशोधकांनी एकच मूलभूत प्रश्न उपस्थित केला– 'या प्रकल्पाच्या सामाजिक आणि पर्यावरणविषयक परिणामांची नोंद प्रकल्पाचे संयोजन करणाऱ्यांनी नीटपणे घेतली आहे काय?' आणि तशी ती घेतली गेलेली नाही, हे एकच उत्तर त्या संशोधकांना मिळाले. या खोऱ्यात विविध प्रकारच्या वनस्पतींची मोठमोठी असंख्य जंगले आहेत आणि ती जैवविविधतेने अत्यंत संपन्न अशी आहेत. जेव्हा संकल्पित धरणे उभी राहतील, तेव्हा येथील वनस्पती व वन्य जीवन यांना किती व कशा प्रकारची हानी पोहोचेल याचा अंदाजही कोणी घेतलेला नाही; मग अभ्यास तर दूरच. त्याचप्रमाणे या वनराजीवर ज्यांचे जीवन अवलंबून आहे, त्या आदिवासी खेड्यांतील नागरिकांच्या उपजीविकेवर या प्रकल्पाचे काय परिणाम होतील याचाही विचार येथे झालेला नाही. शिवाय यातील अनेक भूकंपप्रवण भागात एवढ्या मोठ्या संख्येने धरणे

दिल्ली विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांचा हा अहवाल आधुनिक भारताच्या इतिहासात एक विसरून गेलेला मैलाचा दगड ठरला. मेधा पाटकर यांनी हा अहवाल ईपीडब्ल्यूमध्ये वाचला नसता, तर नर्मदा बचाव आंदोलनाची सुरुवात झालीच नसती; हे आंदोलन उभे राहिले नसते. आंदोलन व्यापक असूनही अहिंसक राहिले. या आंदोलनाला खोऱ्यातील खेडुतांचा पाठिंबा मिळवून आणि गावागावांतून व शहरांतून सहानुभूती मिळवून ही एक सामाजिक चळवळ बनली. आजच्या विषम आर्थिक विकासाने पर्यावरण आणि सामाजिक परिस्थिती यांच्यावर जे दुष्परिणाम घडवले, त्यांवर या अहवालाने प्रखर प्रकाशझोत टाकलेला आहे.

बांधली गेली, तर त्याचे भूपृष्ठावर संभाव्य परिणाम काय होतील, याचाही विचार झालेला दिसत नव्हता.

या प्रकल्पग्रस्त क्षेत्राची जी शास्त्रीय दृष्टिकोनातून हेळसांड झाली होती, तिला सामाजिक बाजूचीही जोड मिळाली होती. नर्मदेचे हे खोरे म्हणजे असंख्य आदिवासी, शेतकरी आणि कारागीर यांचे आगर होते. या सर्व जमातींचे जीवनव्यवहार आणि सामाजिक लागेबांधे यांचा काहीही अभ्यास तर झालेला नव्हताच; पण त्याचबरोबर या प्रकल्पातील धरणांमध्ये बुडणारी गावे व जंगलसंपत्ती यांच्यामध्ये वसलेली देवस्थाने आणि अन्य पवित्र मानल्या जाणाऱ्या वास्तू यांच्या विसर्जनाचीही दखल घेतलेली नव्हती. या संशोधक विद्यार्थ्यांना सर्वांत तीव्रतेने जाणवलेली गोष्टी ही की, प्रकल्पाच्या उभारणीच्या कोणत्याही स्तरावर स्थानिक लोकांना सामावून घेण्यात आले नव्हते.

या विद्यार्थ्यांच्या अंदाजानुसार, या धरणांच्या पाणीसाठ्याच्या क्षेत्रफळातील दहा लाख रहिवासी या बांधकामामुळे विस्थापित होणार होते. या विस्थापितांच्या गरजा कशा भागवल्या जाणार, यासाठी कोणत्याही प्रकारचा मानववंशशास्त्रीय अभ्यास हाती घेतलेला नव्हता. त्यांना पर्यायी जमिनी देण्याचे अभिवचन बहुसंख्यांबाबत अपूर्ण राहिले होते. त्यांना देण्यात यावयाची नुकसानभरपाई बाजारभावापेक्षा कितीतरी कमी होती. दुसऱ्या बाजूला विस्थापितांसाठी करण्याचे बांधकाम आणि पुनर्वसन इत्यादींचा खर्च प्रत्यक्षापेक्षा कितीतरी, म्हणजे सुमारे ३०० टक्क्यांनी कमी धरला गेला होता.

नर्मदा खोऱ्यातील हे सर्व प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर पर्यावरणाचे होणारे अपरिमित नुकसान तर साफच डोळ्यांआड करण्यात आले होते. खोऱ्यातील जंगलांमुळे जमिनीवरील मातीचे थर घट्ट राहून जमिनीत पाणी मुरत होते आणि त्याला पूरक असे हवामानही राहत होते. ही जंगले आता तोडली गेल्यामुळे अगर धरणाच्या पाण्यात बुडल्यामुळे परिसंस्थेचे हे फायदे नष्ट झाले. या प्रदेशात यापूर्वीच बांधल्या गेलेल्या मोठमोठ्या कालव्यांमुळे जमिनीतील क्षारांचे प्रमाण खूप वाढले आणि जमिनी पाणथळ बनत गेल्या. तरीही या नव्या योजनांखाली कालवे बांधले जात असताना अशा संभाव्य दुष्परिणामांची अजिबात नोंद घेण्यात आलेली नाही.

हा नर्मदा प्रकल्प म्हणजे या देशात पर्यावरण संरक्षणाकडे झालेल्या अक्षम्य दुर्लक्षाचा एक नमुना आहे, असे या विद्यार्थी संशोधकांना वाटते. त्यांच्या दृष्टिकोनातून 'आर्थिक प्रगतीचा भारताने निवडलेला मार्ग, उत्कर्षाचे प्रतीक हे केवळ परिसंस्थेच्याच नव्हे तर सामाजिक-सांस्कृतिक दृष्टीनेही घातक आहे. त्यामुळे विषमता वाढली आहे, काही मूठभर लोकांच्या हातीच सत्ता एकवटली आहे; पारंपरिक सांस्कृतिक मूल्ये आणि ज्ञानसाधनेच्या पद्धती तुडवल्या जात आहेत. आपला आत्मा आपण थोडा-थोडा गमावत आहोत; एकरूप झालेल्या सामाजिक संबंधांची मोडतोड होत आहे आणि व्यक्ती-व्यक्ती एकमेकांपासून आणि निसर्गापासून अलग पडली आहे.'

दिल्ली विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांचा हा अहवाल आधुनिक भारताच्या इतिहासात एक विसरून गेलेला मैलाचा दगड ठरला. मेधा पाटकर यांनी हा अहवाल ईपीडब्ल्यूमध्ये वाचला नसता, तर नर्मदा बचाव आंदोलनाची सुरुवात झालीच नसती; हे आंदोलन उभे राहिले नसते. आंदोलन व्यापक असूनही अहिंसक राहिले. या आंदोलनाला खोऱ्यातील खेडुतांचा पाठिंबा मिळवून आणि गावागावांतून व शहरांतून सहानुभूती मिळवून ही एक सामाजिक चळवळ बनली. आजच्या विषम आर्थिक विकासाने पर्यावरण आणि सामाजिक परिस्थिती यांच्यावर जे दुष्परिणाम घडवले, त्यांवर या अहवालाने प्रखर प्रकाशझोत टाकलेला आहे. मुख्यत: धरणग्रस्त विस्थापितांची अवस्था त्यांनी जगासमोर आणली. ज्यांच्यावर आपली घरे, झोपड्या, शेते आणि मंदिरेसुद्धा सोडून जाण्याची सक्ती करण्यात आली होती; त्यांनी रिकाम्या केलेल्या जागांवर दुसऱ्या लोकांचे जीवनमान सुधारावे व इतर अनेकांचे ऐषाराम चालावेत म्हणून उभ्या केलेल्या प्रकल्पांचीही माहिती येथे आहे.

नर्मदा बचाव आंदोलनाने आपले सर्व लक्ष सरदार सरोवर या मुख्य प्रकल्पावर केंद्रित केले होते. त्याचे मुख्य कारण असे होते की, त्याचे सर्व फायदे एकाच राज्याला- म्हणजे गुजरातला मिळणार होते; पण त्याच्या खर्चाचा व प्रगतीचा जास्तीत जास्त भार दुसऱ्या राज्यावर म्हणजे मध्य प्रदेशावर पडणार होता. सरदार सरोवरामुळे विस्थापित होणारे अधिकाधिक नागरिक आदिवासी होते. मेधा पाटकर व त्यांच्या सहकाऱ्यांनी त्यांच्यात जागृती करून विस्थापित होणाऱ्या या आदिवासींची चळवळ उभी केली, त्याला अनेक बुद्धिवाद्यांची साथही मिळवली. 'बांध नहीं बनेगा, कोई नहीं हटेगा' या त्यांच्या घोषणेमध्ये त्यांच्या चळवळीचे ध्येय व्यक्त झाले होते.

'नर्मदा बचाओ' चळवळीच्या संदर्भात आता बरेचसे वाङ्मय प्रसृत झाले आहे. या विषयावरील उत्कृष्ट पुस्तकांपैकी अमिता बाविस्करचे 'इन द बेली ऑफ द रिव्हर

: आदिवासी ॲसर्शन इन द नर्मदा व्हॅली' (१९९५) आणि रणजित द्विवेदीचे 'कॉन्फ्लिक्ट ॲण्ड कलेक्टिव्ह ॲक्शन : द सरदार सरोवर प्रोजेक्ट इन इंडिया' (२००६) ही पुस्तके विशेष उल्लेखनीय आहेत.

मेधा पाटकर यांचा करिष्मा, धैर्य आणि सहकाऱ्यांशी व कार्याशी असलेली त्यांची प्रतिबद्धता यांचा आदर करीत असतानाही त्यांच्या या संघर्षातील एकूण डावपेचांबाबत माझ्या मनात थोडा संदेह आहे. हा विषय अमेरिकन संघराज्याच्या आमसभेसमोर (यू.एस. काँग्रेस) नेऊन त्याचे आंतरराष्ट्रीयीकरण झाले, ही मोठी चूक होती, असे मला वाटते. सर्वोच्च न्यायालयासमोर जेव्हा या प्रश्नाची चर्चा चालू होती, त्या वेळी आंदोलनाने थोड्या तडजोडीची तयारी दाखवायला हवी होती; कारण धरणाचे बरेच मोठे बांधकाम तोपर्यंत पूर्ण झाले होते आणि त्यावर जनतेचे हजारो कोटी रुपये खर्ची पडले होते. या गोष्टी नजरेसमोर ठेवून पुण्याच्या काही इंजिनिअर्सच्या एका गटाने हुशारीने एक योजना तडजोडीसाठी सुचविली होती, ज्यामुळे धरणाच्या भिंतीची संकल्पित उंची धरणकर्त्यांना गाठता आली नसती. त्यामुळे विस्थापनप्रक्रिया मंदावली असती आणि धरणातील अतिरिक्त पाणी खास पद्धतीने तयार केलेल्या कालव्यांतून (ओव्हर फ्लो कॅनॉल्स) थेटपणे कच्छ व सौराष्ट्र या दुष्काळी भागांत पोचले असते.

तडजोडीचा हा पर्याय सर्वोच्च न्यायालयासमोर जर ठोसपणाने मांडला गेला असता, तर कदाचित न्यायालयाकडून तो स्वीकारला गेलाही असता. पण त्या न्यायालयासमोर धरणाच्या भिंतीचे काम पूर्ण करणे किंवा ते पाडून टाकणे, हे दोनच पर्याय आले होते. त्यांपैकी पहिलाच पर्याय न्यायमूर्तींनी निवडला, यात नवलविशेष असे काही नव्हते.

सर्वोच्च न्यायालयाच्या निकालालाही आता दशक उलटले आहे. नर्मदेचे पाणी आता मध्य गुजरातपर्यंत पोहोचले आहे आणि अद्यापही कच्छ व सौराष्ट्रही तसेच तहानलेले आहेत. मध्य प्रदेशातील विस्थापित धरणग्रस्तांचे पुनर्वसन फारच असमाधानकारक आहे. प्रकल्पामुळे झालेली जंगलतोड आणि वस्त्यांचे झालेले उच्चाटन यांच्यामुळे झालेल्या नुकसानीचा आकडा वाढतोच आहे!

सरदार सरोवराविरुद्धची लढाई कदाचित 'नर्मदा आंदोलन' हरले असेल; पण या लढ्याचा लोकमानसावर एक तीव्र ठसा उमटला आहे. मेधा पाटकर आणि त्यांचे सहकारी यांनी जागरूकता दाखवली नसती; तर धरणे, कारखाने आणि महामार्ग यांच्यामुळे विस्थापत झालेल्यांबाबत शहरी मध्यमवर्ग व प्रसारमाध्यमे यांच्याकडून होणारी उर्मट उपेक्षा आणि त्यांच्या हक्कांवर होणारे आक्रमण चालूच राहिले असते. ज्यांच्या जमिनी काही प्रकल्पांसाठी सार्वजनिक किंवा खासगी बांधकामांसाठी याआधी हस्तगत करण्यात आल्या, त्यांना नाममात्र मोबदला देऊन देशाच्या प्रगतीसाठी थोडा त्याग करण्याचे आवाहन करण्यात येत असे. पण 'नर्मदा बचाव'सारख्या चवळवळींमुळे विकास प्रकल्पांच्या उभारणीमध्ये ज्यांना आपली घरे व जमिनी गमवाव्या लागल्या आहेत, त्यांना त्याचा न्याय्य मोबदला मिळाला पाहिजे, याबाबत देशभर चर्चा व वादविवाद होत आहेत. त्यातून या विस्थापितांची दखल प्रथमच मोठ्या प्रमाणावर घेतली जात आहे.

दिल्ली विद्यापीठातील विद्यार्थ्यांनी नर्मदा खोऱ्यात फिरून जो मूळ अहवाल लिहिला, त्यामुळे हे सर्व घडले. या प्रदेशात १९८३ च्या पावसाळ्यात फिरलेल्या विद्यार्थ्यांपैकी बरेचसे 'कल्पवृक्ष' या संस्थेशी संबंधित आहेत. सन १९७९ मध्ये निर्माण केलेल्या या संस्थेचे सभासद अद्यापही बरेच सक्रिय आहेत. दिल्ली व पुणे येथे त्यांची कार्यालये आहेत. पर्यावरणीय अभ्यासकांच्या समूहात त्यांचा उल्लेख प्रेमाने 'केव्ही' असा करतात. या संस्थेने तिच्या स्थापनेपासूनच अनेक महत्त्वाच्या उपक्रमांना हात घातला आहे. त्यांत सामाजिक जपणूक, नागरी खाणउद्योगाचे पर्यावरणावरील परिणाम, नागरी परिसंस्था, पर्यावरणशिक्षण यांचा समावेश आहे. या संस्थेने दिल्ली परिसरात व अरवली पर्वतरांगांमध्ये महत्त्वाचे कार्य केले असले; तरी १९८४ मधील त्यांच्या नर्मदा अहवालाने त्यांच्याकडे देशाचे लक्ष वेधले गेले. तेव्हापासून 'कल्पवृक्ष' कधी एकाकी, पण बहुतेक वेळा दूरदृष्टी राखून व स्वत:च्या मूळ विचारांशी प्रामाणिक राहून विकासप्रक्रियेसंबंधीच्या चर्चेत देशात आणि देशाबाहेरही आपला आवाज पोचवीत आहेत.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road,
Bangalore 560025.

टीप : 'कल्पवृक्ष' शी संपर्क साधण्यासाठी–
http//www.kalpariksh.org/index/php/publication.html वर चौकशी करावी.



काल-परवा
२०

रामचंद्र गुहा

# राजकारणी आणि राजकीय बहुविधता

भारतीय समाजातील बहुविधता ही मोठ्या कष्टांनी जोपासली गेलेली गोष्ट आहे. देशाच्या फाळणीच्या काळात झालेल्या दंग्याधोप्यांमुळे येथील अल्पसंख्यांकाच्या मनात असुरक्षिततेची तीव्र भावना जागृत झाली. महात्मा गांधींच्या हत्येमुळे निर्माण झालेल्या प्रक्षुब्धतेच्या वातावरणात कडव्या हिंदूंना दूर सारून, मध्यममार्गी सर्वसमावेशक आणि बहुविधतेची जाणीव असणाऱ्या जनतेला भारतीयत्वाच्या मुख्य प्रवाहात सामील करून घेणे नेहरू सरकारला आवश्यक वाटले. देशात १९५० च्या दशकात हिंदू-मुस्लिम दंग्यांचे प्रमाण फारसे नव्हते. त्याचा फायदा घेऊन देशाला एकत्र राखणारी लोकशाहीवादी आणि सार्वभौम राज्यघटना (संविधान) निर्माण करण्यात आली. या संविधानाद्वारे प्रत्येक मोठ्या भाषिक गटाला स्वत:चे राज्य मिळाले आणि त्याच्या आर्थिक विकासाला मोकळीक मिळाली.

सामाजिक शांतता व स्वास्थ्य यांचा हा बराच मोठा कालखंड जबलपूर व राऊरकेला येथील दंगलीमुळे १९६३ मध्ये भंग पावला. त्यानंतरच्या वीस वर्षांत उत्तर व मध्य भारतातील अनेक गावे व शहरे हिंदू-मुस्लिम संघर्षात पेटून निघाली. प्रत्येक ठिकाणच्या दंगलीचे कारण वेगवेगळे होते आणि या दंगली एकमेकांशी जोडलेल्या किंवा संबंधित अशाही नव्हत्या. पण प्रत्येक उठावात हिंदू-मुस्लिम यांच्यामध्ये संशयाचे वातावरण निर्माण होऊन त्यांचे अलग-अलग गट निर्माण झाले आणि हिंसाचार घडलेल्या शहरांमध्ये भय व दहशतीचे वातावरण पसरले. त्यानंतर १९८० च्या दशकात हिंदू व शीख यांच्यामध्ये संघर्ष उसळले. प्रथम पंजाबमध्ये खलिस्तानी दहशतवाद्यांचा उठाव झाला. त्यानंतर इंदिरा गांधींची हत्या झाली आणि दिल्ली इतर शहरांमध्ये काँग्रेस नेत्यांच्या पुढाकारात संतप्त जमावाने हजारो शिखांचे शिरकाण केले.

याच दशकाच्या उत्तरार्धात हिंदू-मुस्लिम वैमनस्य आणखीच तीव्र झाले. अयोध्या चळवळीमुळे हा वैरभाव देशभर पसरला आणि लहान-मोठ्या दंगलींना सुरुवात झाली. विशेषत: उत्तर आणि पश्चिम भारत यात होरपळून निघाला. त्यामध्ये हजारो भारतीय बळी गेले आणि लक्षावधी निर्वासित झाले. या घटनांचा अभ्यास केलेल्या अनेक अभ्यासकांच्या, पत्रकारांच्या आणि मानवी हक्क कार्यकर्त्यांच्या निवेदनानुसार, या दंगलीत मुस्लिमांची फार मोठी हानी झाली; पण याच काळात म्हणजे ८० च्या दशकाच्या अखेरीस जम्मू-काश्मीर राज्य मात्र यास मोठाच अपवाद ठरले. कारण त्या राज्यात फुटीरतेची जी चळवळ चालू होती, तिच्यावर मूलतत्त्ववादी आणि जिहादी यांचा पगडा एव्हाना वाढला होता आणि त्याचा परिणाम म्हणून काश्मीर खोऱ्यातील तीन लाख काश्मिरी पंडितांना त्यांच्या हिंस्र कारवायांमुळे निवासी गावांमधून विस्थापित व्हावे लागले.

माझे वास्तव्य १९८० व १९९० या दोन दशकांत बहुतांशी उत्तर भारतात होते. त्या काळात

सन १९८० व १९९० या दोन दशकांचा काळ संघर्षग्रस्त होता- ज्याचे जनकत्व त्या काळातील राजकारण्यांकडे जाते; त्यांच्या विशिष्ट कृतींकडे जाते. त्यात शाहबानो केसचा निकाल उलटवण्याचे राजीव गांधींचे प्रयत्न, एल. के. अडवाणींची रथयात्रा आणि भारतीय जनता पक्षाच्या राजकीय प्रगतीसाठी मुस्लिमांचे अकारण बळी घेण्याच्या कारवाया यांचा समावेश होतो.

हिंदू आणि मुस्लिम यांच्यामधील फूट पाहून मी चांगलाच हादरलेला होतो. मी १९८९ मध्ये भागलपूरला गेलो होतो. तिथे रामजन्मभूमी चळवळीतील कार्यकर्ते मुस्लिम वस्त्या आणि खेडी उद्ध्वस्त करण्यासाठी जमावाला प्रोत्साहन देऊन त्यांची ससेहोलपट कशी करत होते, हे मी पाहिले आहे. उच्चशिक्षित व्यावसायिकांचे अतिरेकी परधर्मद्वेष पाहून मी विस्मित झालो आहे. दि.६ डिसेंबर १९९३ या दिवशी, म्हणजे बाबरी मशिदीच्या विध्वंसाला एक वर्ष पूर्ण झाले, त्या दिवशी जी. बी. पंत इन्स्टिट्यूट फॉर हिमालयन इकॉलॉजी अॅन्ड डेव्हलपमेंट या संस्थेमध्ये नव्या संचालकांची नेमणूक करण्यासाठी विचारविनिमयासाठी बोलावलेल्या निवड समितीचा मी एक सदस्य होतो. समितीच्या दुसऱ्या सदस्यांपैकी एक पर्यावरण मंत्रालयाचे सचिव, दुसरे हिमालयातील वनस्पतींचे तज्ज्ञ आणि दक्षिण दिल्लीमधील एका विद्यापीठात शिकवणारे विज्ञानाचे प्राध्यापक तिसरे- असे त्या समितीचे सदस्य होते. ठरवलेल्या सभेच्या वेळेनंतर एक तास उलटून गेला तरी तिसऱ्या सदस्याचा पत्ता नव्हता. कदाचित तो मुस्लिम होता व रस्त्यावर हिंदुत्ववादी गुंडांचे घोळके मुक्तपणे विजयी उन्मादात फिरत होते याची त्याला भीती वाटली असेल! माझ्याबरोबरच्या पर्यावरण खात्याच्या सचिवांनी आणि मी त्या सहकाऱ्यांच्या गैरहजेरीसंबंधी तर्क करताना त्यांच्याबद्दल सहानुभूती व्यक्त केली, तेव्हा वनस्पती शास्त्रज्ञाने त्याला हिंदीमध्ये एक गलिच्छ शिवी मुक्तपणे हासडली. त्याचा साधारणपणे अर्थ असा होता, 'बसला असेल कुठे तरी शेण खात!'

एम. जे. अकबर यांनी १९८० आणि ९० च्या दशकातील या रानटीपणाचा समाचार आपल्या 'रॉयट आफ्टर रॉयट' या पुस्तकात परखडपणे घेतला आहे. मार्च २०१२ मध्ये मात्र मला खरोखरीच समाधान वाटले; कारण देशात हिंदू-मुस्लिम दंगलीची मोठी घटना पूर्ण एक दशकभर कोठेच घडलेली नव्हती. सन १९५० नंतर देशामध्ये ही परिस्थिती प्रथमच होती. आणि त्या शांततेचे कारण मला तीन घटनांमध्ये दिसते. एक तर सर्वसाधारण हिंदूंचा अतिरेकी हिंदुत्वाकडे मध्यंतरी वाढलेला ओढा कमी झाला होता आणि अयोध्येमध्ये रामाचे भव्य, वैभवशाली मंदिर बांधण्याचे स्वप्नही धूसर झाले होते. हिंदूंप्रमाणे सर्वसाधारण मुस्लिमांचासुद्धा धर्मगुरूंच्या मूलतत्त्ववादी शिकवणुकीबद्दल थोडा भ्रमनिरास झालाच होता आणि मध्ययुगीन मुस्लिम वैभवाचा त्यांचा ध्यासही विरून जात होता. महत्त्वाची गोष्ट अशी की, या दोनही जमातींतील तरुणांसमोर आता शिक्षण आणि नोकरी ही ध्येये प्रखरपणे केंद्रित झाली होती.

पण माझ्या आशावादाला लवकरच जोरदार धक्का बसणार होता. कारण जुलै २०१२ मध्ये आसाममध्ये हिंदू व मुस्लिम यांच्यामध्ये दंगल सुरू झाली. या दंग्यांचे प्रमाण व तीव्रता कदाचित १९८४ ची दिल्ली व २००२ चा गुजरात यांच्यामधील दंगलींपेक्षाही अधिक होती. ही वस्तुस्थिती देशातील लोकांनी फार गांभीर्याने घेतली नाही, कारण आपल्या राष्ट्रीयत्वाच्या आराखड्यात उत्तर-पूर्व भारत अगदी काठावर आहे; शिवाय या दंगलींना बांगलादेशामधून बेकायदारीत्या भारतात घुसणाऱ्या नागरिकांचीही पार्श्वभूमी आहेच. तथापि, त्यानंतर अलीकडच्या काही महिन्यांत व आठवड्यांत जातीयवादाच्या कॅन्सरने उत्तर भारतात हात-पाय पसरायला सुरुवात केली होती. उत्तर प्रदेशातील काही जिल्ह्यांमध्ये दंगलींनी डोके पुन्हा वर काढले. आणखी अलीकडे बिहार आणि राजस्थानमध्ये- ज्यांमध्ये आतापर्यंत तुलनेने शांतता होती त्यांच्यामध्येही- धार्मिक झगडे सुरू झालेले दिसतात. त्यापेक्षाही गंभीर घटना म्हणजे, जम्मू आणि काश्मीरमध्ये किश्तवाड जिल्ह्यात ऑगस्ट महिन्याच्या सुरुवातीच्या काही दिवसांत भीषण दंगली उफाळल्या आहेत. या सर्व घटना कदाचित कोणाला क्षुल्लक वाटतील; पण १९८० व ९० च्या दशकात उत्तर भारतात राहत असलेल्या माझ्यासारख्याला- ज्याने त्या दिवसांत हा संघर्ष स्वत: पाहिला किंवा दुसऱ्याकडून प्रत्यक्ष पाहिलेला ऐकला, अगर वृत्तपत्रांतून म्हणजे तिसऱ्या माध्यमाकडून समजावून घेतला- त्याला ते द्वेषाचे आणि रक्तरंजित दिवस परत अनुभवावेत, असे सुतराम वाटण्याची शक्यता नाही. पण असेही असंख्य भारतीय आहेत की, ज्यांनी त्या काळातला धर्म किंवा पंथवादाचा कडवा अनुभव घेतलेला नाही. त्यांच्यामध्ये दक्षिण भारतीयांचा, देशाबाहेर वास्तव्य असलेल्यांचा आणि त्या वेळी वृत्तपत्रांत येणाऱ्या त्या भयंकर व शोकांत बातम्या समजण्याची किंवा लक्षात ठेवण्याची कुवत नसलेल्या लहान वयाच्या भारतीयांचा समावेश आहे.

वर उल्लेखलेल्या सर्व भारतीयांसाठी हे लिखाण आहे; ते या काळजीपोटी आहे की, हिंदू व मुस्लिम यांच्यामधील संघर्षाच्या अलीकडच्या घटनांचा मोठा हिंसक वणवा पेटू नये. विश्व हिंदू परिषदेची अयोध्या यात्रा सुदैवाने बारगळली; पण त्या यात्रेत अपेक्षित असलेली असुरक्षितता आणि परधर्मद्वेषापायी आलेला वेडसरपणा अद्याप आपला प्रभाव दाखवू पाहत आहे. सार्वत्रिक निवडणुका पुढील वर्षी सामोऱ्या येत आहेत. देशातील अनैतिक व गुन्हेगार प्रवृत्तीचे राजकारणी संधीचा फायदा घेऊन ही फूट वाढविण्यासाठी आणखी प्रयत्न



करणार. भारतीय जनता पक्ष हिंदूंमधील असुरक्षिततेच्या भावनेवर फुंकर घालणार आणि काँग्रेस व समाजवादी पक्ष तीच गोष्ट मुस्लिमांसंदर्भात केल्याशिवाय राहणार नाही.

एकोणीसशे पन्नासचे दशक हिंदू-मुस्लिम कलहापासून थोडे दूर राहिले याचे कारण काही राजकारणी मंडळींनी त्यासाठी घेतलेली विशेष मेहनत, हे होते. नेहरूंचे नेतृत्व तर यासाठी कारणीभूत होतेच, पण अनेक राज्यांत एस. निजलिंगप्पा, के. कामकाज, यशवंतराव चव्हाण आणि सुचेता कृपलानींसारखे प्रभावी नेतृत्व काँग्रेसकडे होते. राममनोहर लोहिया, ई.एम.एस. नंबुद्रीपाद आणि जयप्रकाश नारायण यांच्यासारखे नेते विरोधी पक्षांत होते. हे सर्व नेते मनाने आणि कृतीनेही भारतीय राजकारणाच्या बहुविधतेशी आणि सामाजिक सुसंवादाशी प्रतिबद्ध होते; पूर्ण निष्ठा बाळगून होते.

सन १९८० व १९९० या दोन दशकांचा काळ संघर्षग्रस्त होता- ज्याचे जनकत्व त्या काळातील राजकारण्यांकडे जाते; त्यांच्या विशिष्ट कृतींकडे जाते. त्यात शाहबानो केसचा निकाल उलटवण्याचे राजीव गांधींचे प्रयत्न, एल. के. अडवाणींची रथयात्रा आणि भारतीय जनता पक्षाच्या राजकीय प्रगतीसाठी मुस्लिमांचे अकारण बळी घेण्याच्या कारवाया यांचा समावेश होतो.

पण मार्च २००२ ते जुलै २०१२ या काळात देशामध्ये जे शांततेचे वातावरण होते, त्याचे श्रेय राजकीय पक्षांचे नाही तर या देशातील नागरिकांचेच आहे. येथील सामान्य हिंदू आणि मुस्लिम नागरिक त्या काळात कोणत्याही प्रकारच्या जातीयवादी कृत्यापासून दूर राहिले आणि सामाजिक कार्यकर्त्यांनी व्यक्ती व समाज यांच्यामध्ये परस्पर-संपर्कासाठी पूल बांधण्याचे कार्य केले. गुजरात दंगलींबाबत माध्यमांनी वृत्तांत देण्यात जी जागरूकता दाखवली, त्यामुळेच लोकभावनांना चिथावणी देऊन दंगल पेटविणाऱ्यांच्या कृत्यांना आळा बसला.

भारतीय समाजातील व राजकारणातील बहुविधता ही मोठी कष्टांनी जोपासावयाची गोष्ट आहे. ती १९५० च्या दशकात तत्कालीन नेत्यांनी मोठ्या धीराने आणि मेहनतीने जोपासली; आता तिचे भवितव्य या देशातील सर्वसामान्य माणसाच्या हाती आहे. आगामी वर्षांत सर्व पक्षांतील राजकारणी त्यांची अल्पकालीन उद्दिष्टे हस्तगत करण्यासाठी या देशातील बहुविधतेला जेव्हा बाधा आणतील, तेव्हा त्यांना आपल्या या तरुण तरीही कमकुवत राहिलेल्या प्रजासत्ताकाच्या सर्वसमावेशक आदर्शांची जाणीव आपल्यासारख्या सामान्य माणसांना पुन्हा पुन्हा करून द्यावी लागेल आणि स्वत:लाही त्या आदर्शांशी प्रतिबद्ध राहावे लागेल.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.



काल–परवा
२१

रामचंद्र गुहा

# ‘करंट सायन्स’ नियतकालिकाचे अभिनंदन

मी जवळजवळ डझनभर नियतकालिकांना लिखाण पाठवीत असतो; त्यांपैकी बहुतेक सर्वच परदेशी प्रकाशित होणारी आहेत. एक अपवाद वगळता सर्व समाजविज्ञान आणि शुद्ध साहित्यविषयक विषयांना (ह्युमॅनिटीज्) वाहिलेली आहेत. अपवाद असलेले ‘करंट सायन्स’ हे नियतकालिक मात्र बंगळुरू येथील इंडियन ॲकॅडमी ऑफ सायन्सेस या संस्थेमार्फत प्रकाशित केले जाते.

माझा स्वत:चा जन्म एका वैज्ञानिक कुटुंबात झाला आहे. माझे वडील, आजोबा आणि दोन चुलते यांनी आपला सर्व जन्म भारतीय संशोधनशाळांमध्ये रात्रंदिवस काम करीत घालवला आहे. माझे तिसरे चुलते अमेरिकन भौतिकशास्त्रातील अग्रगण्य शास्त्रज्ञ आहेत. माझा एक चुलतभाऊ भारतातील एक नामवंत आहारतज्ज्ञ आहे.

– हा अशा प्रकारचा वारसा असलेल्या कुटुंबात मीही शास्त्रज्ञ बनावे, अशी सर्वांची अपेक्षा असणारच. माध्यमिक शाळेत मला रसायनशास्त्रात चांगले गुण मिळाले होते, गणितातही माझी बऱ्यापैकी प्रगती होती; पण भौतिकशास्त्रात (फिजिक्स) माझी चांगलीच दांडी उडाली होती. पण माझ्या बाजूने, कादंबऱ्या, चरित्रे वगैरे साहित्याचे वाचन करण्यात आणि शाळेतील नियतकालिकात लेख लिहिण्यात मला फार स्वारस्य होते. माझ्या वडीलधाऱ्यांनी माझ्यावरच सोडले असते, तर कॉलेजमध्ये मी इंग्रजी साहित्यच अभ्यासाचा विषय म्हणून निवडले असते. पण माझ्या कुटुंबीयांना त्यांच्या पार्श्वभूमीवर तो विषय एकदमच टाकाऊ वाटला. मग मध्यम मार्गाचा तोडगा काढण्यासाठी मी अर्थशास्त्र घेण्याचे ठरवले, कारण त्या विषयाला विज्ञानाचा ‘टच’ होता.

पण अर्थशास्त्रातील माझी कामगिरीही किरकोळच ठरली. जेव्हा एम.ए.च्या परीक्षेत मला दुसऱ्या वर्गात तळाजवळची जागा मिळाली, तेव्हा माझ्या शिक्षकांनी मला त्यातल्या त्यात एक चांगला आणि अर्थशास्त्राला जवळचा पर्याय सुचवला. मी त्यांचा सल्ला मान्य करून माझ्या डॉक्टरेटसाठी समाजशास्त्राला (सोशिऑलॉजी) हा विषय निवडला आणि तो पूर्ण करताना कालांतराने अधिक वर्णनात्मक किंवा तपशिलावर भर देणारा, पण कमी विश्लेषणाचा विषय निवडला– इतिहास!

या सर्व पार्श्वभूमीवर विचार करता आणि प्रशिक्षणाची कमतरता असताना मी ‘करंट सायन्स’कडे कसा काय ओढला गेलो? माझ्याबद्दल काही विशिष्ट अपेक्षा बाळगणाऱ्या किंवा मार्गदर्शन करणाऱ्या वडीलधाऱ्यांची मी जी निराशा केली; त्याचे प्रायश्चित्त माझ्या अबोध मनाकडून नकळत घेतले गेले असावे– असेही फ्रॉइडचे अनुयायी माझ्या या कृतीला म्हणतील! पण वास्तव असे आहे की, मी या पत्रामध्ये लिहायला सुरुवात केली, कारण त्यातले अग्रलेख अतिशय सुरेख आणि सर्वसामान्य माणसापर्यंत पोहोचणारे असतात, असे माझ्या मित्राने मला



शालेय जीवनात विज्ञानाशी जवळजवळ फारकत घेतलेला मी– बलरामांच्या शास्त्रीय लेखनाशी माझा दूरान्वयानेही संबंध आहे, असे म्हणू शकत नव्हतो. ‘करंट सायन्स’मधले त्यांचे वैज्ञानिक कुतूहल शमविणारे लेखन मला ४० टक्के ते ८० टक्के एवढ्याच प्रमाणात समजे. पण त्यांची भाषा मला आकर्षित करत असे. त्यातील चटकदार वाक्प्रचार आणि साक्षेपाने मांडलेला मजकूर मनात घोळत राहत असे. व्यक्ती आणि लेखक म्हणून माझ्याच पिढीच्या शब्दांत सांगायचे झाले, तर तो एक ‘भला माणूस’ आहे. ‘करंट सायन्स’च्या दर्जाला शोभेल अशाच पद्धतीने ते निवृत्त झाले आहेत.

खात्रीपूर्वक सांगितले होते.

या अग्रलेखांबद्दल मला इथे लिहायचेच आहे; पण प्रथम या नियतकालिकाच्या इतिहासाबद्दल थोडेसे! सन १९३२ मध्ये ‘करंट सायन्स’ प्रथम प्रकाशित झाले, तेव्हा सी. व्ही. रामन या शास्त्रज्ञांना त्यांच्या पदार्थविज्ञानातील संशोधनाबद्दल नुकतेच नोबेल पारितोषिक मिळाले होते. भारतीय विज्ञानक्षेत्रातील इतर नामवंतांप्रमाणे रामन हेही या नव्या साप्ताहिकामागे उभे राहिले. त्यांच्याबरोबर बिरबल साहनी आणि एस. एस. भटनागर हे विख्यात शास्त्रज्ञही होते. पण सुरुवातीच्या काळात त्याची धुरा सी. आर. नारायणराव आणि सुब्रह्मण्यम् या दोघा संपादकांनी सांभाळली. हे दोघेही फार मोठे नामवंत नसले, तरी प्राध्यापक होते. सी. आर. नारायण राव हे बंगलोरच्या सेंट्रल कॉलेजमध्ये झुऑलॉजीचे प्राध्यापक म्हणून आणि व्ही. सुब्रह्मण्यम हे इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये बायोकेमिस्ट्रीचे प्राध्यापक म्हणून काम करीत होते.

सन १९३० व ४० च्या दशकांत ‘करंट सायन्स’ला बराच मोठा लौकिक व प्रतिष्ठा मिळाली, पण नंतर हळूहळू त्या पत्राचा ऱ्हास सुरू झाला. स्फटिकाच्या आंतररचनेवर संशोधन करणारे एक वैज्ञानिक एस. रामशेषन् यांनी त्या पत्राच्या संपादकपदाची जबाबदारी १९८० च्या दशकात स्वीकारली. त्यानंतर हळूहळू ते पत्र मूळ पदावर आले; त्याची उन्नती सुरू झाली. रामशेषन् यांनी तरुण वैज्ञानिकांना या पत्रासाठी लिहिते केले आणि देशभरातून अनेक लेखही त्यासाठी जमा केले.

रामशेषन् यांनी ‘करंट सायन्स’च्या पुनरुत्थानाचा भक्कम पाया घातला आणि त्यांच्यानंतर १९९५ मध्ये संपादकपदावर आलेले पद्मनाभम् बलराम यांनी त्या पत्राचा नावलौकिक वाढविण्यासाठी भरपूर परिश्रम घेतले. आय.आय.टी.-कानपूर आणि कार्नेजी मेलनमध्ये रेण्वीय जीवशास्त्राचे (मोलेक्युलर बायॉलॉजी) शिक्षण घेतलेले बलराम त्यांच्या संशोधनाच्या गुणवत्तेच्या जोरावर या देशातील शास्त्रज्ञांच्या रांगेत बऱ्याच वरच्या क्रमांकावर होते. शिवाय त्यांचे एक वैशिष्ट्य होते. त्यांच्या बरोबरच्या शास्त्रज्ञांप्रमाणे परराष्ट्रांकडे व राजकारण्यांकडे त्यांचे डोळे लागलेले नव्हते; उलट त्यांचे आवाहन नाकारण्याकडेच त्यांचा कल होता. संशोधकांच्या तरुण पिढीचे त्यांना आकर्षण होते. बलराम यांना त्यांचा भरवसा वाटत होता आणि स्वतःच्या विषयाखेरीज इतर वैज्ञानिक शाखांमध्येही त्यांना रस होता. वाङ्मय आणि इतिहास या विषयांच्या वाचनाचा त्यांचा आवाकाही मोठा होता.

‘करंट सायन्स’चा वर्गणीदार मी झालो, त्याचे कारण म्हणजे- बलराम यांचे त्यांतील अग्रलेख. विज्ञानाच्या दुय्यम महत्त्वाच्या बाजूंचे विश्लेषण कधी कधी त्यांच्या अग्रलेखात असे. (उदाहरणार्थ- पुरस्कारांमागील राजकारणाबद्दल किंवा महिला शास्त्रज्ञांबद्दल बाळगल्या जाणाऱ्या सार्वत्रिक गैरसमजांसंबंधीचे त्यांचे लेखन) काही वेळा काही महत्त्वाच्या अगर कसोटीच्या संशोधनाचे विशिष्ट दिवस आणि प्रसंग त्यांच्या लेखांतून वाचकांना समजत किंवा विज्ञानातील नवनवीन उपक्षेत्रांची माहिती अगर समाजाला नवनव्या संशोधकांची जाणवणारी गरज सर्वदूर वाचकांपर्यंत पोहोचविण्याचे कार्य त्यांचे लेख करीत. त्यांच्या अग्रलेखांची भाषा अभिरुचीपूर्ण असे आणि वास्तव घटना अधिक सौम्य करून सांगितलेल्या असल्यामुळे त्यांच्या लेखनातील संयम त्यातून स्पष्टपणे प्रतीत होत असे.

‘करंट सायन्स’मधील माझे स्वारस्य वाढण्याची आणखीही काही कारणे होती. मला ज्यांच्यात फार कुतूहल होते, ते हवामानबदल आणि जैवविविधतेची जपणूक (बायोडायव्हर्सिटी कॉन्झर्व्हेशन) हे दोन विषय त्यात विस्ताराने चर्चिले जात. शिवाय, त्यात अत्यंत चांगले मृत्युलेख किंवा श्रद्धांजलीपर लिखाण असे. भारतीयांना त्यांच्या अलीकडेच दिवंगत झालेल्या समकालीनांबद्दल काय व कसे लिहावे, हे कळतच नाही, असे माझे अवलोकन आहे. उदाहरणच द्यायचे, तर एखाद्या थोर कन्नड लेखकाच्या निधनानंतर बंगळुरूमधील इंग्रजी वृत्तपत्रे त्याचे कार्य व त्याचा वारसा यांच्याबद्दल न लिहिता राज्याच्या मुख्यमंत्र्यांच्या ‘कोमट’ सांत्वनालाच अधिक प्रसिद्धी देतात. त्यांची तीच भाषणे पुन्हा उद्धृत करतात. ‘करंट सायन्स’मधील असे लेख याला अपवाद असत.

विस्मृती आणि बौद्धिक मूल्यांची हेळसांड (फिलिस्टिनिझम) करणाऱ्या या संस्कृतीत ‘करंट सायन्स’ उठून दिसे. भारतीय विज्ञानातील स्त्री-पुरुष वैज्ञानिकांची परंपरा व इतिहास यांच्याबद्दल हे पत्र जागरूक होते. त्यामध्ये येणारे मृत्युलेख (दर अंकात सुमारे एक किंवा दोन) आदर्शवत् असतात. त्यात त्या शास्त्रज्ञाचा बौद्धिक विकास, त्याचे/तिचे विज्ञानास झालेले मौलिक योगदान यांची माहिती तर असेच; पण त्याचबरोबर त्या व्यक्तीच्या जीवनातील महत्त्वाच्या टप्प्यांचीही (जन्मस्थळ, मृत्युस्थळ, विवाहित/अविवाहित, मुले... इत्यादी) नोंद असे.

भारतीय विज्ञानक्षेत्रात या साप्ताहिकाचे प्रामाण्य वाढावे म्हणून बलराम यांनी केलेल्या प्रयत्नांचा एक भाग म्हणजे,

त्यांनी केलेला संपादक मंडळाचा विस्तार आणि त्याची गुणवत्ता. देशातील सर्व ज्ञानशाखांचे प्रतिनिधी या संपादक मंडळात आणण्याचा प्रयत्न त्यांनी केला. दरम्यानच्या काळात ‘इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स’ या संस्थेमध्ये त्यांची संचालक म्हणून नेमणूक करण्यात आली, त्यामुळे त्यांवरील जबाबदाऱ्यांचे ओझेही वाढले. बलराम यांनी अग्रलेख लिहिण्याचे काम इतर ज्येष्ठ वैज्ञानिकांकडे सुपूर्द केले. त्यानंतर चालू वर्षाच्या सुरुवातीलाच ते संपादकीय जबाबदाऱ्यांतून पूर्णपणे मुक्त झाले आहेत.

‘करंट सायन्स’चा अगदी नवा अंक (खंड १०५, अंक ४, दि.२५ ऑगस्ट २०१३) आताच माझ्या हातात पडला आहे. त्याच्यामध्ये ‘भारतीय सिंह’ या विषयावरील एका वादग्रस्त ग्रंथाचा परिचय आहे. शिवाय थोर जीवशास्त्रज्ञ ओबेद सिद्दिकी यांच्यावरील दोन मृत्युलेख आहेत. भारताच्या सर्व बाजूंकडून या पत्राकडे लेखांचा ओघ वाहत असल्याची प्रसिद्धी झाल्यामुळे त्याला बऱ्यापैकी आंतरराष्ट्रीय प्रतिसादही मिळतो आहे. एक ईस्टोनियम व एक अमेरिकन असे दोन परदेशी त्याच्या सध्याच्या नियमित लेखकसूचीवर आहेत.

‘करंट सायन्स’ अंकाची दोन पाने वाचकांच्या पत्रव्यवहारासाठी राखून ठेवलेली असतात. या अंकात मोहाली, चेन्नई, सोलापूर, हैदराबाद, कॅलिफोर्निया आणि न्यू साऊथ वेल्स येथून आलेली अकरा वैज्ञानिकांची पत्रे या सदरात छापलेली आहेत. बलराम यांच्याशिवाय ‘करंट सायन्स’ हे त्या पत्रव्यवहारविषयक स्तंभाचे शीर्षक आहे. ‘करंट सायन्सच्या प्रत्येक अंकात बलरामांचे संपादकीय असणारच, हे मी गृहीत धरून चाललो,’ असे एका पत्रलेखकाने म्हटले आहे. पुढे ते म्हणतात, ‘पण निवृत्ती ही अपरिहार्य असते, असे हळूहळू मला पटू लागले आहे. तरीही आशा वाटतेच की, हे अपरिहार्य थोडे पुढे ढकलता आले तर?...’ दुसरे एक पत्रलेखक लिहितात, ‘बलरामांनी काही विषयांबाबत जहाल मते व विचार अगदी निर्भयपणे व्यक्त केलेले आहेत. पण ते त्यांच्या उत्तराधिकाऱ्यांना जमेलच असे नाही’. तिसऱ्या पत्रलेखकाची प्रतिक्रिया अशी– ‘बलराम सर्वांपेक्षा निराळे ठरले, कारण ते कधीच निराशावादी किंवा स्वयंकेंद्रित नव्हते. तरुण शास्त्रज्ञांच्या आदर्शांना धक्का लागेल, असे त्यांनी कधीच काही लिहिले नाही’... ‘विशेषत्वाचे (स्पेशलायझेशन) वर्तुळ अधिकाधिक संकुचित होत असताना त्या बौद्धिक वातावरणात बलरामांनी अनेक विद्याशाखा धुंडाळून त्यांचा परिचय वाचकांना करून दिला’, असे मत आणखी एका पत्रलेखकाने व्यक्त केले. पाचव्या पत्रलेखकाने ‘सर्व चांगल्या गोष्टींना शेवट असतोच’, हे मत व्यक्त केले. तरीही ‘बलराम जेव्हा मोकळे असतील, लेखनाच्या मन:स्थितीत असतील, तेव्हा त्यांच्या वाचकांच्या विशाल वर्तुळाचे समाधान करण्यासाठी ते मधून-मधून अतिथी संपादकाच्या भूमिकेतून करंट सायन्समध्ये लेखन करतील का?’ असेही त्यांनी पुढे लिहिले. अशी अपेक्षा व्यक्त करणे चुकीच तर नाही ना, असाही संदेह त्यांनी व्यक्त केला.

बंगळुरूमध्ये माझे वास्तव्य वीस वर्षे आहे. पण या काळात पद्मनाभन बलराम यांना मी फारच थोडा ओळखू शकलो. ते फक्त माझे परिचित होते. मित्र असल्याचा आरोप मी त्यांच्यावर करू शकत नाही. प्रसिद्धिपराङ्‌मुख असे त्यांचे व्यक्तिमत्त्व असल्यामुळे ते वृत्तपत्रांसमोर कधीच येत नसत. सी. व्ही. रामन रोडचा परिसर हेच त्यांच्या वावराचे क्षेत्र असे. त्या रस्त्याच्या एका बाजूला ‘इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स’ आणि दुसऱ्या बाजूला ‘इंडियन ॲकॅडमी ऑफ सायन्सेस’ची इमारत. प्रसिद्धीचा गवगवा टाळून आपली प्रयोगशाळा, आपले विद्यार्थी आणि आपले सहकारी यांच्यातच बलराम रमलेले असत. उरलेल्या वेळात त्यांची पुस्तके आणि अर्थातच त्यांचे कुटुंब आणि ते स्वत:– एवढेच! मी त्यांना जेव्हा जेव्हा भेटलो, तेव्हा इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्समध्ये इकॉलॉजी सेमिनार किंवा एखाद्या मित्राचा गौरवसमारंभ एवढ्याच निमित्ताने ते भेटणे असे. त्यात परिचय अधिक वाढीला लागण्याचा संभव नसे.

शालेय जीवनात विज्ञानाशी जवळजवळ फारकत घेतलेला मी– बलरामांच्या शास्त्रीय लेखनाशी माझा दूरान्वयानेही संबंध आहे, असे म्हणू शकत नव्हतो. ‘करंट सायन्स’मधले त्यांचे वैज्ञानिक कुतूहल शमविणारे लेखन मला ४० टक्के ते ८० टक्के एवढ्याच प्रमाणात समजे. पण त्यांची भाषा मला आकर्षित करत असे. त्यातील चटकदार वाक्प्रचार आणि साक्षेपाने मांडलेला मजकूर मनात घोळत राहत असे. व्यक्ती आणि लेखक म्हणून माझ्याच पिढीच्या शब्दांत सांगायचे झाले, तर तो एक ‘भला माणूस’ आहे. ‘करंट सायन्स’च्या दर्जाला शोभेल अशाच पद्धतीने ते निवृत्त झाले आहेत. बलराम यांना क्रिकेटमध्ये कितीसे स्वारस्य आहे, ते मला माहीत नाही; पण स्वत:च्या हाती पूर्ण सत्ता असताना त्यांनी घेतलेली निवृत्ती मला विजय मर्चंट आणि सुनील गावसकर यांनी खेळातून योग्य वेळी घेतलेल्या निवृत्तीइतकीच दमदार वाटते!

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.



काल-परवा
२२

रामचंद्र गुहा

# काही गांधीवादी आफ्रिकन

मी अलीकडे केनियन कादंबरीकार न्गुगी-वा-थियोंग यांची स्मरणचित्रे वाचत होतो. त्यात त्यांनी आपल्या लहानपणी १९४० च्या दशकात आपल्या गावाजवळच वसलेल्या एका भारतीयाच्या दुकानात एका गमतीदार चष्मेवाल्या माणसाची काही चित्रे लावलेली पाहिली होती. शाळेतील एका शिक्षकाने मग न्गुगीला ती व्यक्ती कोण आहे हे सांगून, आपल्या जीवनात तिचे स्थान काय आहे, हे समजावून सांगितले. ''ब्रिटिशांनी हिंदुस्थान नावाच्या देशात जवळजवळ दीड शतक इतका दीर्घ काळ वसाहती करून राज्य केले. महात्मा गांधी आणि नेहरू यांच्या नेतृत्वाखाली हिंदी लोकांनी स्वातंत्र्यासाठी लढे दिले- अगदी आपल्याकडे आता जोमो केन्याटा आणि म्बियू कोइनान्गे यांच्या मार्गदर्शनाखाली केनियन लोक लढा देत आहेत, त्यांच्याचसासारखे. आणि त्यांचा हा नेता कसा आहे हे पाहा तरी!'' आणि पुढे त्यांनी गांधींचे वर्णन केले. ''अशक्त, हाडकुळे दिसणारे महात्मा गांधी. पंचासारखे नेसलेले आखूड धोतर हा त्यांचा पोषाख. पण जगातले सर्व भारतीय त्यांच्यावर अतिशय प्रेम करतात आणि त्यांच्या दुकानात गांधींची चित्रे लावतात.''

आपल्या शिक्षकांचे हे बोलणे ऐकून न्गुगीच्या आणखी काही स्मृती जाग्या झाल्या. 'महात्मा गांधी? हिंदी लोकांचे नेते? आखूड धोतर घातलेले? लिमुरूमधील भारतीय दुकानात मी हेच तर चित्र भिंतीवर लटकलेले पाहिले आहे. मला वाटले की, ते चित्र एका हिंदूंच्या देवाचे असावे, कारण माझ्या आईने मला एकदा असेच काही सांगितलेले आठवते.'

न्गुगीच्या शिक्षकांनी त्याला असेही पुढे सांगितले की १९४७ मध्ये हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाले; तर मग आपल्या देशालाही १९५७ मध्ये ते न मिळण्याचे कारण नाही. गांधी ब्रिटिशांशी सत्याच्या शस्त्राने लढले. केन्याटा त्या ब्रिटिशांशी न्यायासाठी लढेल; निकराने लढेल. भारताने आणि अर्थातच गांधींनी मार्ग दाखवून दिला आहे.

त्या शिक्षकांनी मग केनियन देशभक्त आणि महात्मा गांधी यांच्यामधील जुन्या संबंधांचे स्पष्टीकरण केले. कामगारनेते हॅरी थुकू यांना मणिभाई देसाई नावाच्या भारतातून आलेल्या एका गुजराती नागरिकाने १९२० च्या दशकात साह्य केले होते. ते गांधींचे अनुयायी होते.

दक्षिण आफ्रिकेत गांधींच्या कार्याचा व तत्त्वज्ञानाचा जो ठसा उमटला आहे, त्यासंबंधी ई.एस.रेड्डी यांच्याइतकी माहिती दुसऱ्या कोणालाही नसावी. १९४० च्या दशकातील जहाल मतवादी रेड्डी १९६० ते ८० या काळात युनोच्या वर्णद्वेषविरोधी केंद्रातील महत्त्वाच्या निर्णयांमागची एक ताकद बनले. रेड्डींनी १९९६ मध्ये एका लेखात लिहिले आहे की, १९४६ आणि १९५२ च्या सार्वत्रिक प्रतिकार मोहिमेत गांधींचे अहिंसक प्रकार हे एकच शस्त्र वर्णद्वेषविरोधी चळवळीत वापरले गेले. त्यानंतर ते लिहितात, 'जेव्हा आफ्रिकन नॅशनल काँग्रेसने सशस्त्र प्रतिकाराचा मार्ग स्वीकारला, तेव्हाही संघर्षात प्राणहानी टाळली जाईल, हे कटाक्षाने पाहिले गेले. पुढील संघर्षात अहिंसक प्रतिकाराचे एक नवेच रूप पुढे आले.

त्यानंतर खूप वर्षांनी अमेरिकेत अध्ययन करत असताना न्गुगींना याचा लेखी पुरावाच मिळाला. गांधींचे एक मित्र व ख्रिश्चन मिशनरी सी.एफ.ॲण्ड्र्यूज हे थुकू यांना भेटले आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाने प्रभावित झाले होते. ''हा मुलगा त्या देशातील एक अत्यंत बुद्धिमान, तेजस्वी युवक आहे'', असे उद्‌गार त्यांनी थुकूंबद्दल काढले होते.

एका संपानंतर जेव्हा थुकू यांना अटक होऊन ते हद्दपार झाले, तेव्हा देसाई यांनी ॲण्ड्र्यूजना रदबदली करण्याची विनंती केली. ॲण्ड्र्यूजनी त्यासंबंधात इंग्लंडमध्ये थुकू यांची बाजू मांडण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला, पण त्यांना यश आले नाही. मग त्यांनी गांधीजींना पत्र लिहून कामगारनेते थुकू यांना भोगाव्या लागणाऱ्या यातनांची माहिती दिली. गांधींनी ती लगेच आपल्या 'यंग इंडिया' पत्रातून जाहीर केली. 'बिचारा हॅरी थुकू!' त्यांनी लिहिले- 'मि.ॲण्ड्र्यूजकडे त्यांनी वेळोवेळी केलेली याचना आणि त्याबद्दल या पत्रामध्ये मी केलेले लेखन, सत्ता आणि हाव यांचा बळी ठरलेल्या थुकू यांना क्वचितच अपेक्षित दिलासा देणारे ठरणार आहे. पण जर या ओळीतील मजकूर कधी त्यांच्या वाचनात आला; तर त्यांना एवढेच समाधान लाभेल की, हिंदुस्थानसारख्या दूरच्या देशातही त्यांची हद्दपारी व त्यामुळे त्यांच्यावर होणारा अन्याय यांची कथा लोकांमध्ये त्यांच्याबद्दल सहानुभूती निर्माण करीत आहे.'

त्या काळातील या संबंधात लिहिल्या गेलेल्या इतर लेखनावरून हे जाणवते की, थुकू त्या वेळी स्वत:ला केनियातील दुसरे गांधी समजू लागले होते. एका ब्रिटिश वसाहतवाद्याचे थुकूंबद्दलचे त्या वेळचे लिखाण उपहासपूर्ण तुच्छतेने केलेले आहे. 'हा पोरटा... हॅरी थुकू, स्वत:ची भारताशी (गांधींशी) तुलना करू पाहत आहे.' जेव्हा एकदा एका यशस्वी संपानंतर केनियामधील काही हिंदी मंडळींनी थुकूंच्या सत्कारार्थ एक पार्टी आयोजित केली, तेव्हा थुकूंनी असे उद्‌गार काढल्याचे समजते की, 'गांधी हिंदुस्थानचे राजे होतील आणि मी इथला- केनियाचा राजा!'

वसाहतवादविरोधी लढ्याचे अध्वर्यू म्हणून गांधींना आफ्रिकन राष्ट्रवाद्यांमध्ये अत्यंत आदराचे स्थान होते. केनियाचे नेते जोमो केन्याटा आणि टॉम बोया, झांबियाचे केनेथ कौंडा, टान्झानियाचे ज्यूलियस न्येरेरे आणि घानाचे नेते क्वामे एन्क्रूमा या सर्वांसमोर गांधी मार्गदर्शक म्हणून मानले जात होते. बोटस्वाना या देशाच्या इतिहासाच्या उभारणीत गांधींचाही हातभार लागला होता. जेव्हा १९५२ मध्ये बोटस्वानाचे लोकप्रिय राजे सेरेत्से खामा यांना ब्रिटिशांनी पदच्युत करून अज्ञातवासात पाठविले, तेव्हा त्या देशातील विभागप्रमुख आणि गटनायक यांनी नवा नेता निवडण्यास साफ नकार दिला; शिवाय सेरेत्से परत येऊन त्यांना पूर्वीचे पद व मानसन्मान प्रदान होईपर्यंत जनता कोणतेच कर भरणार नाही, असाही इशारा जनतेच्या नेत्यांनी दिला. त्यांच्या या कायदेभंगाच्या व असहकार आंदोलनामागे गांधींनी पुकारलेल्या सत्याग्रह आंदोलनाचीच प्रेरणा होती.

पण अर्थातच या आफ्रिका खंडाच्या दक्षिण टोकाजवळ, म्हणजे दक्षिण आफ्रिकेत गांधींचा प्रभाव विशेषच आणि दीर्घ काळ टिकणारा होता. त्यांचे तेथे दीर्घ काळ वास्तव्य होते. भारतात परतल्यानंतर गांधीजींनी आपला मुलगा मणिलाल याला दक्षिण आफ्रिकेतील फिनिक्स वसाहत आणि 'इंडियन ओपिनियन' वृत्तपत्र यांच्या व्यवस्थेसाठी परत दक्षिण आफ्रिकेत पाठविले. मणिलालना साहजिकच आपल्या पित्याबद्दल परमादर होता. त्यांच्याहीपेक्षा युसूफ दादू आणि मॉंटी नायकर या दोन भारतीय कार्यकर्त्यांना गांधींबद्दल प्रचंड निष्ठा होती. गांधींशी त्यांचा नियमित पत्रव्यवहार होता आणि १९४६ मध्ये विषमता मूलक जमीनविषयक कायद्यांच्या विरोधी संघटित केलेल्या सत्याग्रहात गांधीजींच्या तत्त्वांचा फार मोठा प्रभाव पडला होता.

मार्च १९४७ मध्ये दादू आणि नायकर यांनी भारतीयांच्या लढ्याची सांगड वर्णद्वेषविरोधी व्यापक लढ्याशी घातली. या लढ्याचे नेतृत्व आफ्रिकन नॅशनल कॉंग्रेस (ए.एन.सी.) या संस्थेकडे होते. सन १९४० व ५० च्या दशकात आफ्रिकन नेत्यांची वाटचाल गांधींच्या पावलावर पाऊल टाकून चाललेली होती. त्यांची गांधीनिष्ठा पारदर्शक होती. ए.एन.सी.च्या बऱ्याचशा सभा जोहान्सबर्गमध्ये 'गांधी सभागृहा'च भरवल्या जात. आफ्रिकन आंदोलनाचे नेते आल्बर्ट लुथुली यांनी पन्नासच्या दशकात- जेव्हा चळवळ आणीबाणीच्या अवस्थेत होती, तेव्हा- गांधीविचारांचा अभ्यास केला होता; भारताला भेट दिली होती आणि अहिंसक प्रतिकाराची ताकदही जोखली होती. आफ्रिकन नॅशनल कॉंग्रेसचे दुसरे एक नेते झेड.के.मॅथ्यूज हे गांधींच्या चळवळ तंत्राची व्यवहार्यता आणि त्याचा पडणारा नैतिक प्रभाव पाहून त्यांच्या वैचारिक छावणीत जवळजवळ दाखल झाले होते.

वर्णभेदांवर आधारलेल्या दक्षिण आफ्रिकन राजवटीविरुद्ध १९५२ मध्ये देशभर विद्रोहाचे वातावरण उभे राहिले. चळवळीच्या कार्यवाहीवर अर्थातच गांधीजींचा मोठा प्रभाव होता. त्यांच्या कायदेभंग कार्यक्रमात- १. परवान्याशिवाय

एखाद्या विभागात प्रवेश, २. कर्फ्यूपासशिवाय रात्रीच्या वेळी भटकणे, ३. रेल्वेगाडीमध्ये युरोपियनांसाठी राखून ठेवलेल्या जागांवर बसून राहणे, ४. युरोपियन लोकांच्या प्रतीक्षा दालनांमध्ये प्रवेश करणे, ५. पोस्ट ऑफिसमध्ये युरोपियनांच्या विभागात जाऊन बसणे– हे महत्त्वाचे कार्यक्रम होते.

दक्षिण आफ्रिकेच्या सर्वच राज्यांत १९५२ च्या सत्याग्रहाचे वारे पसरले. विरोधी निदर्शनांत सुमारे ८,५०० लोकांना अटक झाली. निदर्शकांच्या अग्रभागी मौलवी आणि युसूफ अहमद कचालिया हे गांधीजींचे एक जवळचे सहकारी ए.एम.कचालिया यांचे सुपुत्र होते. मार्च १९५२ मध्ये केलेल्या एका भाषणात युसूफ कचालियांनी असे प्रतिपादन केले की, माणसाची ताकद ही मशिनगनच्या ताकदीहून मोठी आहे. येथील एका काळ्या माणसाचा– मग तो भारतीय असो अगर दुसऱ्या एखाद्या वर्णाचा असो– दृढनिश्चय हा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीच्या निश्चयापेक्षा श्रेष्ठतम आहे आणि आमच्या बाजूला न्याय व सत्य ही दोन मूल्ये असतील; तर मग मशिनगन्स, पोलीस अगर इतर कसलीही ताकद आमची चाल (प्रगती) रोखू शकत नाही.'

आफ्रिकेमधील गांधीवाद्यांमध्ये १९५० च्या दशकात भारतीय, आफ्रिकन आणि गोरे अशा सर्वांचा समावेश होता. त्या गोऱ्या अनुयायांमध्ये पॅट्रिक डंकन नावाचे गृहस्थ होते. त्यांच्या वडिलांनी एके काळी ट्रान्सवालमध्ये वर्णभेदावर आधारित कायदे तयार करण्यात मोठे सहकार्य केले होते आणि गांधींनी त्यांना विरोध दर्शविला होता. गांधीवादाच्या प्रसारामध्ये पॅट्रिक डंकन यांचा सहभाग फार महत्त्वाचा ठरला. त्यांच्या हाती लागेल त्या गांधीविचाराचे वाचन करून त्याचे आफ्रिकन भाषांतर रूपांतर करून ते तो लोकांपर्यंत पोहोचविण्याचे कार्य करीत राहिले. 'या देशाची सर्वांत मोठी सेवा म्हणजे, या दक्षिण आफ्रिकेतील लोकांमध्ये गांधींच्या कार्यपद्धतीबद्दल जागरूकता निर्माण करणे, ही आहे,' अशी पॅट्रिक डंकन यांची श्रद्धा होती.

शार्पविले येथे १९६० मध्ये झालेल्या भयानक कत्तलीच्या रूपाने राज्यकर्त्यांचा वर्णद्वेष प्रकट झाला. त्यानंतर आफ्रिकन नॅशनल काँग्रेसने अहिंसक प्रतिकाराच्या धोरणाचा त्याग केला. तरीही ऑलिव्हर टॅम्बो, नेल्सन मंडेला यांच्यासारखे नेते उदारपणे गांधींच्या गौरवात व्यग्र होते; कारण दक्षिण आफ्रिकेतील सरकारच्या बेमुर्वतखोर वागणुकीला सामूहिक प्रतिकाराने तोंड देण्याचे गांधीजींनी दिलेले धडे! हा मार्ग त्या जनतेला दाखवणारे गांधी हे पहिलेच महापुरुष होते. वर्णद्वेषी राजवटीच्या अस्तानंतर मंडेलांनी आपल्या विरोधकांची भेट घेऊन गांधींच्याच सद्भावनेने त्यांची विचारपूस केली. मंडेलांचे तुरुंगातील एक सहप्रवासी अहमद काथ्राडा यांनी अलीकडेच मंडेलांबद्दल म्हटले आहे, 'महात्मा गांधींप्रमाणेच मंडेला हेसुद्धा राग-द्वेषांपासून मुक्त होते.' गांधी आणि मंडेला यांच्यामध्ये आणखीही साम्य दर्शविणारे काही मुद्दे आहेत. दोघेही कायदेतज्ज्ञ असून वकिलीचा पेशा दोघांनीही स्वीकारला होता. दोघेही जोहान्सबर्गचे निवासी होते आणि कायदेभंगाच्या चळवळीत दोघांनाही शहरातील 'फोर्ट प्रिझन' या ठिकाणी स्थानबद्ध करण्यात आले होते. दक्षिण आफ्रिकेवरील वर्णद्वेषी राजवट संपल्यावर आता हा तुरुंग 'कॉन्स्टिट्युशनल कोर्ट'मध्ये आला आहे. त्याच्या परिसरात मंडेला आणि गांधी यांचे जीवन आणि कार्य यांची माहिती देणारे कायम स्वरूपाचे चित्रफलक सर्वत्र लावण्यात आले आहेत.

दक्षिण आफ्रिकेत गांधींच्या कार्याचा व तत्त्वज्ञानाचा जो ठसा उमटला आहे, त्यासंबंधी ई.एस.रेड्डी यांच्याइतकी माहिती दुसऱ्या कोणालाही नसावी. सन १९४० च्या दशकातील जहाल मतवादी रेड्डी १९६० ते ८० या काळात युनोच्या वर्णद्वेषविरोधी केंद्रातील महत्त्वाच्या निर्णयांमागची एक ताकद बनले. रेड्डींनी १९९६ मध्ये एका लेखात लिहिले आहे की, १९४६ आणि १९५२ च्या सार्वत्रिक प्रतिकार मोहिमेत गांधींचे अहिंसक प्रकार हे एकच शस्त्र वर्णद्वेषविरोधी चळवळीत वापरले गेले. त्यानंतर ते लिहितात, 'जेव्हा आफ्रिकन नॅशनल काँग्रेसने सशस्त्र प्रतिकाराचा मार्ग स्वीकारला, तेव्हाही संघर्षात प्राणहानी टाळली जाईल, हे कटाक्षाने पाहिले गेले. पुढील संघर्षात अहिंसक प्रतिकाराचे एक नवेच रूप पुढे आले. त्यानंतर झालेली तडजोड आणि १९९४ मध्ये आकाराला आलेले लोकशाहीवादी प्रशासन या घटनांमध्ये गांधींचा परिणाम जाणवल्याशिवाय राहिला नाही. माझा असा विश्वास आहे की, दक्षिण आफ्रिकेच्या मुक्तिलढ्यात गांधींचे विचार नुसतेच कसोटीला लागले नाहीत; तर ते समृद्धही झाले.'

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**

22-A, Bruntan Road, Bangalore 560025.

रामचंद्र गुहा

# वेगळेपण जपून एकत्र राहता येईल



**१५ ऑगस्ट २०१० चा साधना विशेषांक 'विदर्भाला सुखी करा' या विषयावर काढला होता. त्यात विदर्भाचा विकास व स्वतंत्र विदर्भ राज्याची मागणी हे दोन मुद्दे केंद्रस्थानी ठेवून 'कैफियत', 'कैवार' व 'कोंडी' या तीन विभागांत मिळून एकूण १५ लेख प्रसिद्ध केले होते. त्या विशेषांकाने चांगली चर्चा घडवून आणली आणि राज्याच्या अविकसित भागाच्या अनुशेषाच्या संदर्भात काम करणाऱ्या केळकर समितीनेही त्या विशेषांकाची दखल घेतली होती... या पार्श्वभूमीवर साधना वाचकांसमोर रामचंद्र गुहा यांचा 'द हिंदू' या इंग्रजी दैनिकात ३० जाने. २०१३ रोजी प्रसिद्ध झालेला लेख अनुवाद करून देत आहोत.**
**– संपादक**

नुकतेच माझ्या पाहण्यात काही जुने वृत्तांत आले. १९१४ पासून तेलगु भाषिकांसाठी वेगळ्या राज्याची मागणी चालू झाल्याची नोंद त्यात मी वाचली. गुंटूर, बेल्लोर आणि विजयवाडा (त्या वेळचे बेझवाडा) यांसारख्या छोट्या शहरांतील अनेक सभांमधून 'मद्रास इलाख्यातून तेलगुभाषिक जिल्हे अलग करावेत', ही मागणी करण्यात आली होती. शिवाय योग्य परिस्थिती निर्माण होईल तेव्हा निजामाच्या वर्चस्वाखाली असलेले जिल्हेही तेलगुभाषिक राज्याला जोडण्यात यावेत ही सूचनाही पुढे मांडण्यात आली होती.

**तमीळ बुजुर्गांचा विरोध**

'आंध्र प्रदेश' राज्यासाठीच्या या चळवळीला तमीळ बुजुर्गांचा अर्थातच विरोध राहिला. त्याचे प्रत्यंतर 'स्वदेसमित्रम्' या मद्रासबाहेरून प्रसिद्ध होणाऱ्या आणि मोठा वाचकवर्ग लाभलेल्या पत्राच्या ६ जून १९१४ च्या अंकात मिळाले. त्यात गुंटूरमधील एका सभेचा उल्लेख होता, ज्यात आंध्राच्या प्रगतीत तमीळ लोकांच्या वरचढपणाचा अडथळा येतो, असा आरोप केला गेला होता. आणि पुढे असेही म्हटले होते की, आंध्रमधील तेलगु लोकांची स्वप्ने आणि आशा साकार होण्यासाठी त्यांना तमिळींपासून मुक्ती मिळाली पाहिजे.

हा वृत्तांत देऊन स्वदेसमित्रमने लिहिले होते, "या विधानामागील विचारसूत्र समजणे कठीण आहे. तमीळ लोक शिक्षण अगर अन्य क्षेत्रांत पुढारलेले असतील तर त्यांच्या सहवासाने आंध्रवाद्यांच्या अनुकरण प्रवृत्तीला चेतना मिळाली पाहिजे. दुसऱ्यांची प्रगती तमिळी कशी थांबवणार? आंध्रवादी काही असंस्कृत रानटी माणसे नाहीत; प्राचीन संस्कृतीचा वारसा लाभलेले ते अत्यंत बुद्धिमान नागरिक आहेत; आणि तमीळ लोकांची उदाहरणे त्यांच्यामध्ये नव्या आशा-आकांक्षा निर्माण करण्यास पूरक अशीच आहेत... आणि तेच आताही घडते आहे. आंध्रामध्ये आज आपली नीट प्रगती होत नाही अशी तीव्र भावना आहे आणि तमीळ लोकांसारखेच हक्क आणि अधिकार मिळायला हवेत; त्यासाठी आपल्याला स्वतंत्र राज्य हवे, ही त्यांची मागणी त्यांच्या नव्या आशा-आकांक्षांचे प्रतीक आहे. पण तमिळांपासून अलग व्हावे या त्यांच्या मागणीचा अर्थ मात्र आम्ही समजू शकत नाही, तमिळांनी या देशातील त्यांच्या प्रदेशात पाऊलसुद्धा टाकू नये असा त्याचा अर्थ आहे काय? या देशातील देशभक्त नेत्यांनी लोकांच्या ऐक्याच्या आड येणारे जात, पंथ यांसारखे घटक नष्ट करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा चालविली आहे. विकासाला पायबंद घालण्याचा त्यांचा प्रयत्न या देशभक्तांनी मोडून काढला आहे. आणि तरीही आंध्रांनी चालविलेला इतरांपासून अलग होऊन स्वत:चा स्वतंत्र प्रदेश निर्माण करण्याचा प्रयत्न निश्चितच त्यांचा तेजोभंग करणारा आहे."

वरील मागणीकडे तमिळांनी दुर्लक्ष केले तरी स्वतंत्र तेलगु राज्याची चळवळ चालू राहिलीच. १९२० व १९३०च्या दशकात आंध्र जिल्ह्यातील काँग्रेस नेत्यांनी पक्षाच्या बैठकीत स्वतंत्र आंध्रची मागणी पुढे केली. या मंडळींचा मुख्य आधार होता, महात्मा गांधी– ज्यांना राज्याच्या भाषावार पुनर्रचनेची आवश्यकता पटली होती. पण जवाहरलाल

नेहरू आणि वल्लभभाई पटेल यांच्यासारख्या नेत्यांचा तिला विरोध होता; कारण राष्ट्राची उभारणी नव्याने चालू असताना अशा प्रकारची मागणी राष्ट्राला दुर्बल करील अशी भीती त्यांना वाटत होती. आधीच १९३० च्या दशकात अनेक मुस्लिम बुद्धिवादी काँग्रेसपासून दूर होऊन बॅ.महंमद अली जीना या प्रगल्भ आणि महत्त्वाकांक्षी नेत्याच्या पुनर्निमीत मुस्लिम लीग या संघटनेकडे ओढले गेले होते.

**स्वतंत्र राज्याच्या मागणीचा पाठपुरावा**

मुस्लिमांसाठी स्वतंत्र प्रदेशाच्या मागणीचे राजकारण यशस्वी होऊन पुढे पाकिस्तान अस्तित्वात आले. भारत स्वतंत्र झाल्यानंतर काही वर्षांतच आंध्र नेत्यांनी स्वतंत्र आंध्र प्रदेश राज्याची मागणी लावून धरली. त्याचबरोबर देशात सर्वत्र एक भाषा बोलणाऱ्यांचे एक राज्य या तत्त्वावर भाषावार प्रांतांची पुनर्रचना व्हावी या तत्त्वाचा आग्रह धरून प्रचार केला. परंतु मुस्लिम लीग आणि पाकिस्तान निर्मितीच्या अनुभवांचे चटके बसल्यामुळे नेहरू व पटेल यांना या भाषावार प्रांतरचनेतून निर्माण झालेली राज्ये देशापासून फुटण्याचे स्वातंत्र्य मागतील ही धास्ती होती.

मध्यंतरीच्या काळात गांधीजींची हत्या झाली आणि आंध्र प्रदेशाच्या निर्मितीचा आंध्रेतर मूलाधार कोसळला. स्वतंत्र राज्यांची मागणी हळूहळू विरून जाईल अशी आशा आता काँग्रेस नेत्यांना वाटू लागली. मात्र उलटेच घडत गेले. संपूर्ण मद्रास इलाख्यात निषेधसभांचे पेव फुटले.

ऑक्टोबर १९५२ मध्ये पोट्टी श्रीरामुलु यांनी आंध्र राज्याच्या निर्मितीची ताबडतोबीने मागणी केली आणि त्यासाठी उपोषण केले. मद्रास राज्याचे मुख्यमंत्री सी.राजगोपालाचारी आणि प्रधानमंत्री जवाहरलाल नेहरू यांनी त्याकडे दुर्लक्ष केले, पण श्रीरामुलु जराही हटले नाहीत. त्यांनी उपोषण चालूच ठेवले व शेवटी ५६ दिवसांच्या उपोषणानंतर १५/१६ डिसेंबरच्या रात्री त्यांचे निधन झाले. त्यांच्या हौतात्म्याने लोकांमध्ये असंतोषाची मशाल पेटली. तेलगु प्रदेशात सर्वत्र धरणे, हरताळाचे वातावरण निर्माण झाले. सरकारी कचेऱ्या व रेल्वे स्टेशने यांची नासधूस करण्यात आली, त्यांना आगी लावण्यात आल्या.

लोकक्षोभाची तीव्रता आणि संतापाचा उद्रेक यांच्यापुढे माघार घेण्याशिवाय गत्यंतर नाही हे लक्षात आल्यामुळे आंध्र प्रदेशच्या निर्मितीला १९५३ मध्ये नेहरू व राजाजी यांनी संमती दिली व ते राज्य अस्तित्वात आले; पण देशातील कानडी, मराठी आणि मल्याळी भाषिकांच्या अस्मितेला खतपाणी घालूनच! या सर्वांनी स्वतंत्र मागणी केली म्हणून शेवटी राज्य पुनर्रचना आयोग (स्टेटस् री-ऑर्गनायझेशन कमिशन) स्थापन करण्यात आला. या आयोगाने भाषिक राज्यांच्या रचनेसंबंधी शिफारसी केल्या.

**भाषावार राज्ये आणि देशाचे ऐक्य**

दीर्घ काळापासून माझे असे मत बनले आहे की, भाषिक राज्यांची निर्मिती देशाचे ऐक्य राखण्यास उपयुक्त ठरली आहे. पाकिस्तानचे विभाजन झाले आणि श्रीलंकेमध्ये यादवी युद्धाचा भडका उडाला, यांची कारणे अशी की पाकिस्तानमध्ये बंगाली भाषिकांची गळचेपी झाली आणि श्रीलंकेमध्ये तमीळ भाषिकांना हवी असलेली स्वायत्तता सामाजिक दर्जा नाकारण्यात आला, ज्यासाठी ते पूर्णपणे पात्र होते. याउलट, भारतामध्ये नागरिकांना त्यांच्या मातृभाषेत शिक्षण आणि राज्यकारभार या दोनही गोष्टींचे स्वातंत्र्य होते, त्यामुळे त्यांना प्रगती आणि सुरक्षितता यांची हमी मिळत होती.

भारतीय इतिहासाच्या एका टप्प्यात भाषिक राज्ये अपरिहार्य होती, हे खरेच आहे. पण आता त्यांची उपयुक्तता संपली तर नाही? उत्तर कर्नाटक, आंध्र प्रदेशाच्या अंतर्भागातील काही जिल्हे, महाराष्ट्राच्या पूर्व भागातील विदर्भ आणि उत्तर बंगालमधील डोंगराळ प्रदेश या सर्व भागांत मूळ राज्यापासून अलग होण्याच्या चळवळी चालू झालेल्या आहेत. या सर्व चळवळी कायदेशीर आहेत, आणि त्या चालूच राहणार असे म्हणायचे की त्या तात्पुरत्याच आहेत, अनधिकृत आहेत म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष करायचे?

स्वतंत्र राज्य मागणाऱ्या या सर्व चळवळींत तेलंगणाची मागणी फार जुनी आणि प्रखर आहे. जेव्हा आंध्र प्रदेशची निर्मिती झाली तेव्हा अंतर्भागातील हा प्रदेश पूर्वी निजामाच्या राज्याचा घटक होता. नवनिर्मित आंध्र प्रदेशात किनाऱ्याजवळील समृद्ध प्रदेशात आणि मद्रास राज्याच्या पूर्वीच्या शासनाखालील जोडलेल्या भागातील पुढारलेल्या सुशिक्षित लोकांच्या वर्चस्वाखाली आपल्याला सतत दबून राहावे लागणार अशी भीती त्यांना वाटत होती. त्या भीतीपोटी या अंतर्भागातील लोकांनी स्वत:च्या सुरक्षेसाठी काही मागण्या करण्यास सुरुवात केली, पण त्यांच्याहीकडे सरकारचे दुर्लक्ष झाल्याचे पाहून १९६९ मध्ये स्वतंत्र तेलंगण राज्याची मागणी पुढे करून चळवळ उभारली. तेव्हापासून चळवळीचा जनप्रक्षोभ अद्याप अस्तित्वात असल्यामुळे हे आंदोलन टिकून राहिले आहे.

आंध्रच्या किनारपट्टी प्रदेशातील नेतेमंडळी आणि मतप्रवर्तक यांना अर्थातच आंध्रचे दोन तुकडे पाहणे मंजूर नाही. आंध्र प्रदेशच्या निर्मिती विरोधात १९१४ साली किंवा त्यानंतर तमिळी लोकांचा जो युक्तिवाद होता तोच आंध्र किनारपट्टीतील नेत्यांनी तेलंगणवाद्यांविरुद्ध आता केला आहे. एकदा मिळवलेल्या राज्याच्या ऐक्यावर कुऱ्हाड का चालवायची? तेलंगणमधील लोकांना प्रगती करायची आहे ना, मग किनारी प्रदेशातील लोकांबरोबर राहून, त्यांच्या उदाहरणातून हिंमत मिळवून प्रगती करणे त्यांना अशक्य का वाटते? असा त्यांचा युक्तिवाद आहे.



*के. चंद्रशेखर राव*



*पोट्टी श्रीरामुलू*

**तेलंगणचे राजकारण**

स्वतंत्र आंध्र प्रदेशच्या आपल्या मागणीतील तथ्य पूर्वीच्या मद्रास इलाख्यातील तमीळ भाषिकांना पटवून देण्यास तेलगु भाषिकांना चाळीसहून अधिक वर्षांचा अवधी लागला. तेलंगणाच्या मागणीलाही चाळीस वर्षे कधीच उलटून गेली आहेत आणि तरीही ते आपले उद्दिष्ट साध्य करू शकलेले नाहीत. २००४ सालच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या वेळी तेलंगण राष्ट्र समितीने काँग्रेसशी सहकार्य केले, कारण निवडून आल्यास आपण राज्य पुनर्रचना मंडळाची स्थापना करू असे जाहीर अभिवचन निवडणूक जाहीरनाम्यात काँग्रेसने दिले होते. तेलंगण राष्ट्र समितीलाही त्यांच्या मुख्य मागणीचा प्राधान्याने विचार होईल असे शाब्दिक आश्वासन मिळाले होते. २००४ मध्ये काँग्रेस आघाडी सत्तेवर आली, पण तेलंगण राज्याची निर्मिती झाली नाही. कारण राज्य पुनर्रचना मंडळच अस्तित्वात आले नाही. साहजिकच पुन्हा निषेध निदर्शक कार्यक्रम सुरू झाले आणि अस्वस्थता माजली. मग २००९ च्या डिसेंबर महिन्यात त्या वेळचे केंद्रीय गृहमंत्री पी.चिदंबरम् यांनी तेलंगणाची मागणी लवकरच मान्य होईल असे आश्वासन दिले आणि ते लवकरच मोडल्याचेही दाखवून दिले. अगदी अलीकडेच भारतीय जनता पार्टीने 'आपण केंद्रात सत्तेवर आल्यास फक्त शंभर दिवसांत तेलंगण राज्याची निर्मिती करू' असे 'गाजर' तेथील चळवळ्या मंडळींना दाखवले आहे. २००४ साली काँग्रेसने दिलेल्या आश्वासनाप्रमाणे हेही तत्त्वनिष्ठेपेक्षा संधिसाधूपणाचाच अनुभव देणारे (रालोआसाठी मते आणि जागा पदरात पाडून घेण्यासाठीच) असावे.

इतिहासाचा एक अभ्यासक आणि एक नागरिक म्हणून माझे स्वत:चे असे मत आहे, की भारतीय स्वातंत्र्याच्या सुरुवातीच्या काही कालखंडात भाषिक राज्ये अस्तित्वात येणे अपरिहार्य होते; पण आता राज्यांच्या पुनर्रचनेची पुन्हा एकदा वेळ आली आहे. तेलंगण, विदर्भ आणि गोरखा लँड यांच्या मागणीमागे भक्कम कारणमीमांसा आहे. त्यांचे प्रदेश परिसंस्था (इकॉलॉजी) आणि संस्कृती या कसोट्यांवर एकसंध आहेत आणि राज्यातील समृद्ध आणि अधिक शक्तिशाली भागांकडून इतिहासकालापासून दुर्लक्षिले गेले आहेत. त्याचप्रमाणे, उत्तर प्रदेश हे संपूर्ण एक राज्य म्हणून त्याचा कारभार चालवणे त्याच्या विस्तारामुळे अवघड आहे. त्याचे तीन किंवा चार भागांत विभाजन करणे हे राज्यकारभार अधिक एककेंद्री आणि कार्यक्षमतेने चालविण्यासाठी आवश्यक आहे.

स्वातंत्र्यानंतरच्या पासष्ट वर्षांत देशाला अनेक कसोट्यांतून जावे लागले. आता भारतापुढे फाटाफुटीचे आव्हान राहिलेले नाही. देशाचे तुकडे पडण्याचे भय आता नाही किंवा एकतंत्री हुकूमशाहीची शक्यताही उरलेली नाही. आता भारतासमोर खरा प्रश्न आहे तो राज्यकारभार सुधारणेचा, प्रशासनाचा दर्जा उंचावण्याचा. या प्रश्नाची सोडवणूक करण्याच्या कामी लहान राज्यांचा मोठाच हातभार लागू शकेल.

(अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.
ramguha@gmail.com.



निबंध

# एका नेहरूवाद्याची चीनमधील सफर

रामचंद्र गुहा

आजच्या भारतातील समाजजीवनावर व राज्यकर्त्यांवर प्रभाव टाकणाऱ्या प्रमुख बुद्धिवंतांमध्ये रामचंद्र गुहा यांचे नाव प्राधान्याने घेतले जाते. क्रिकेट, पर्यावरण आणि राजकीय-सामाजिक इतिहास हे गुहा यांच्या अभ्यासाचे प्रमुख विषय आहेत. 'इंडिया आफ्टर गांधी' या पुस्तकाद्वारे त्यांनी स्वातंत्र्योत्तर भारताची ओळख करून देताना, इतिहासाकडे पाहण्याचा एक वेगळा दृष्टिकोनही दिला आहे. सध्या ते 'गांधी बिफोर इंडिया' या त्रिखंडात्मक चरित्रग्रंथाचे लेखन करीत आहेत. एप्रिल २०१३ मध्ये त्यांनी, 'नेशन बिल्डिंग ॲन्ड कल्चरल डायव्हर्सिटी' या विषयावरील चर्चासत्राच्या निमित्ताने चीनला भेट दिली. 'हाइन्रीच बॉल' या लेखकाच्या नावाने चालवल्या जाणाऱ्या जर्मन फाऊंडेशनने हे चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चासत्रातील सहभाग व अन्य ठिकाणी दिलेल्या भेटी यांवर आधारित 'अ नेहरुवियन इन चायना' या शीर्षकाचा दीर्घ निबंध त्यांनी Caravan या मासिकासाठी लिहिला आहे, त्याचा हा अनुवाद.

मला भेटलेल्या पहिल्या निखळ चिनी बुद्धिवाद्याचे नाव फेई शिओतोंग (Fei Xiaotong) असे होते. १९८० साली कोलकाता विद्यापीठात समाजशास्त्रातील डॉक्टरेट पदवीसाठी मी नाव दाखल केले होते. कोलकाता शहरातील बौद्धिक वातावरणावर त्या वेळी मार्क्सवादी विचारांचा पगडा होता आणि त्याला माओवादाची लागणही बरीच झालेली होती. ज्यांचे मार्क्सवादाचे वाचन यांत्रिकपणे झालेले असते त्यांना इतिहास, अर्थशास्त्र आणि राज्यशास्त्र हे विषय फक्त संशोधन क्षेत्रातच उपयुक्त आणि लागू होणारे आहेत, असा एक भ्रम झालेला असतो. कारण मार्क्स नेहमीच 'राजकीय अर्थशास्त्र' या विषयाच्या व्यवहाराचा उल्लेख करीत असे, तर त्याचाच पट्टशिष्य एंगल्स याने आपल्या गुरुजींच्या निवेदनाची पद्धती, 'इतिहासाचे भौतिक दृष्टिकोनातून स्पष्टीकरण करणारी आहे' असे ठामपणाने सांगून टाकले आहे. दुसऱ्या बाजूने मार्क्सने कधी समाजशास्त्र किंवा मानववंशशास्त्र (अॅन्थ्रॉपॉलॉजी) यांचा उल्लेख केला आहे, असे निदान कोलकात्यातील विचारवंतांना आठवत नाही. दरम्यान, माओ झेडाँग (जे कोलकात्यातील बुद्धिवाद्यांचे आदर्श आहेत) यांनी समाजशास्त्र आणि मानववंशशास्त्र ही दोनही शास्त्रे प्रतिगामी पांढरपेशांचे एक कौतुक आहे, असे म्हणत निकालात काढली आहेत.

अंजन घोष या नावाचे आकर्षक व्यक्तिमत्त्वाचे व उमद्या स्वभावाचे माझे एक प्राध्यापक समाजशास्त्रज्ञ आणि मार्क्सवादी होते. आपला व्यवसाय आणि राजकारण यांची सांगड घालण्याची त्यांची धडपड चालू असताना फेई शिओतोंग यांच्याशी त्यांचा परिचय झाला. १९३० च्या दशकात फेई हे लंडनमध्ये आधुनिक सामाजिक मानववंशशास्त्राचे जनक ब्रोनिस्लाव मॅलिनोवस्की यांचे विद्यार्थी होते. पीएच.डी. चा अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर फेई चीनला परतले. १९३० व १९४० या खळबळजनक दशकांत त्यांनी आपले अध्यापन आणि लेखन चालू ठेवले होते.त्यांच्या देशातील समाजशास्त्रज्ञ आणि मानववंशशास्त्रज्ञ यांच्यावर तर त्यांच्या विद्वत्तेचा प्रभाव होताच; शिवाय अभ्यासपूर्ण ग्रंथांचे व प्रबंधांचे लेखन करीत आणि विद्यार्थ्यांना मार्गदर्शन व प्रोत्साहन देत ते वृत्तपत्रांतून भरपूर लेखन करीत राहिले.

१९४९ मध्ये कम्युनिस्ट पक्ष चीनमध्ये सत्तेवर आला आणि विस्कळीत प्रदेशाची जोडाजोड करून राष्ट्रबांधणीच्या कामाला सुरुवात झाली. फेई शिओतोंग यांना आपल्या 'निव्वळ' संशोधनाच्या इतिश्रीची वेळ आल्याचे आता जाणवू लागले; पण देशावरील अस्सल व अपरिमित प्रेमामुळे नवोदित देशाच्या गरजा भागविण्यासाठी त्यांनी आपले सारे बुद्धिवैभव त्याच कामी लावायचे ठरवले. देशामधील अल्पसंख्य समाजघटकांमध्ये जाऊन प्रत्यक्ष काम करण्याचा निर्णय त्यांनी विचारपूर्वक घेतला. देशातील मोठ्या जनसमूहामध्ये रूजलेल्या 'हान' संस्कृतीशी एकरूप होऊन जाण्यासाठी अल्पसंख्यकांना आवश्यक ती मदत व प्रशिक्षण देण्याचा त्यांचा हेतू होता.

पण फेईंनी अल्पसंख्य आणि मागास जमातींमध्ये काम करण्यास सुरुवात केली व जसजसे ते कामात खोलवर लक्ष घालत गेले आणि काळ उलटत गेला, तसतसा त्या समाजाच्या सांस्कृतिक परंपरांचा त्यांच्या जीवनावर असलेला दीर्घ प्रभाव त्यांना जाणवू लागला. सामाजिक सुधारणा आणि आर्थिक विकास त्यांच्यापर्यंत पोहोचविण्याची निकड फेईंना जाणवली. आणि या दोनही गोष्टींचा उगम या अल्पसंख्य लोकांच्या हितसंबंध रक्षणाच्या उद्दिष्टातून असायला हवा, हे त्यांनी आग्रहाने सांगितले. १९५० च्या दशकापर्यंत फेईंनी त्याच प्रकल्पावर काम केले; पण त्यानंतर राजकीय व्यवस्थेने त्यांचा बळी घेतला. १९५७-५८ मधल्या 'उजव्या शक्तींविरोधी मोहिमेत' फेईंवर समाजवाद आणि कम्युनिस्ट पक्ष यांच्या विरोधी कारवाया केल्याचा आरोप ठेवून त्यांच्याच जुन्या सहकाऱ्यांनी त्यांच्यावर कडाडून हल्ला चढवला. त्यांना शिकवण्याची आणि प्रवास करण्याची मनाई करण्यात आली.

त्यानंतर 'सांस्कृतिक क्रांतीच्या (कल्चरल रेव्होल्यूशन) काळात 'पुनर्शिक्षण' घेण्यासाठी त्यांना शेतमजूर म्हणून शेती कामासाठी पाठवण्यात आले. १९७६ साली माओंचे निधन झाले आणि राज्यकर्त्या 'चांडाळ-चौकडी' (गँग ऑफ फोरम)चा दबदबाही संपला होता. हे वातावरण फेईंना हितकारक ठरले आणि मग त्यांना पुन्हा एकदा लेखन करण्याची व शिक्षक म्हणून काम करण्याची परवानगी देण्यात आली. १९७९ मध्ये त्यांना 'चिनी विज्ञान अकादमी' (चायनीज अॅकॅडेमी ऑफ सायन्स)च्या पहिल्याच

शिष्टमंडळातून एक सदस्य म्हणून पाश्चात्त्य विद्यापीठांना भेट देण्याची संधी मिळाली.

१९८० च्या दशकाच्या सुरुवातीला एकदा मी कोलकात्यात भरणाऱ्या बोईमेलाला (ग्रंथजत्रेला) अंजन घोष यांच्या समवेत गेलो होतो. त्या वेळी बोईमेला आजच्यासारखा उपनगरामध्ये बंदिस्त जागेत न भरता उघड्या मैदानात भरत असे. त्या दिवशी नक्षलवाद्यांची ओळख करून देणारी, त्यांच्या कामाचा गौरव करून देणारा मजकूर असलेली काही पुस्तके बीजींगच्या विदेशी भाषा प्रकाशनाने (फॉरिन लँग्वेज प्रेस ऑन बीजिंग) इंग्रजीमधून प्रकाशित केली होती. त्यातील एक फेई शिओतोंग यांचे होते. त्याचे नाव होते 'जनतेच्या मानववंशशास्त्राच्या दिशेने' (टोवर्डस् अ पीपल्स ॲन्थ्रापॉलॉजी), त्याची किंमत काहीतरी तीन किंवा पाच रुपये होती; पण त्यासाठी दसपट पैसे द्यायला मी तयार होतो. कारण आम्ही ज्या जगात काम करत होतो, त्यात आमची नवी ओळख निर्माण होणार होती.

– २ –

फेई शिओतोंग यांचे लेखन मी पहिल्यांदा वाचले, त्यानंतर तीस वर्षांनी म्हणजे गेल्या महिन्यात चीनमधील एका सेमिनारमध्ये त्यांचा झालेला उल्लेख मला ऐकायला मिळाला. शेतजमिनींवर काम करणाऱ्या एका लोकसमूहाशी संबंधित एक वक्ता मोठ्या धरणांच्या विध्वंसक परिणामांबद्दल बोलत होता. या धरण प्रकल्पांना 'राष्ट्रहिताचे' असे संबोधले जात होते आणि प्रकल्पांबद्दल जे प्रश्न उपस्थित करीत होते, त्यांची 'राष्ट्रद्रोही' अशी संभावना करण्यात येत होती. तरीही सत्य हेच होते की, धरणांमुळे जे आदिवासी विस्थापित झाले होते त्यांना योग्य भरपाई कधीच मिळाली नाही. ज्या जमिनींचे, घरांचे आणि नोकऱ्यांचे आश्वासन त्यांना देण्यात आले होते, ते त्यांना कधी पाहायलाही मिळाले नाही. शिवाय त्या धरणांमुळे पर्यावरणावर होणाऱ्या परिणामांचाही विचार करणे आवश्यक होते. बोलताना सभेला निष्कर्षाकडे नेत तो वक्ता म्हणाला, ''माझे शिक्षक फेई शिओतोंग नेहमी म्हणत त्याप्रमाणे 'तडजोडीतील सौंदर्य' (ब्युटी ऑफ कॉम्प्रोमाइज) शोधीत राहण्याचा सराव आपण केला पाहिजे. अल्पसंख्याकांच्या अधिकारांची, हक्कांची सांगड देशाच्या गरजांशी नीटपणे घालता येईल असे मार्ग धुंडाळले पाहिजेत.''

हा सेमिनार दक्षिण चीनमधील फूजियन प्रांताची राजधानी फूझौ या शहरात भरविण्यात आला होता. 'राष्ट्र उभारणी



आता काही अभ्यासक, काही पक्ष कार्यकर्तेसुद्धा या टोकाच्या विकेंद्रित देशामध्ये सांस्कृतिक एकरूपता आणण्यासाठी केवढी किंमत द्यावी लागेल, याचा विचार करू लागले आहेत. त्यातूनच निघालेल्या सातव्या सेमिनारला मी एक भारतीय उपस्थित होतो. फूझौ परिषद ज्या इमारतीत होती तिच्या बाहेर जणू राखणदार असावा, असा कन्फ्यूशियसचा पुतळा होता. एकेकाळच्या या जगप्रसिद्ध विचारवंताचे कम्युनिस्ट राजवटीच्या ऐनभरात बरेच अवमूल्यन केले गेले होते; पण अलीकडे त्याचे महत्त्व विस्मयकारक रीतीने वाढलेले दिसले. त्या परिषदेत पंचवीस सहभागी सदस्य होते. त्यांच्यापैकी चार जर्मन व एक भारतीय होता. बाकी सर्व चिनी होते. त्यांच्यामध्ये निम्मे 'हान' वंशाचे होते. पण परिषदेचे उद्दिष्ट 'वांशिक अल्पसंख्याकांचा विचार हे असल्यामुळे तिबेटी, यी, आणि मंगोल यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्यांचीही उपस्थिती होती.

आणि सांस्कृतिक विविधता’ हे या सेमिनारचे मूळ सूत्र होते. सेमिनारचे सूत्रधार एक लहानसे पण प्रागतिक विचारांचे जर्मन फाऊंडेशन होते. त्याचा प्रवर्तक एक जर्मन लेखक हाइनरिच बॉल हा होता आणि चीनमधील ‘चायना सेंटर फॉर ओव्हरसीज् सोशल अँण्ड फिलॉसॉफिकल थिअरीज्’ या नावाने प्रसिद्ध असलेल्या बीजींगमधील विचार-विनिमय केंद्राशी हे फाऊंडेशन सहकार्य करीत होते. हे चर्चासत्र अशा प्रकारचे सातवे होते; पण चिनी विचारवंतांखेरीज अन्य नागरिकांनी किंवा जर्मन संस्थांनी भाग घेतलेले असे पहिलेच होते.

कम्युनिस्ट प्रशासनाच्या पहिल्या काही वर्षांत चीनमध्ये राजकीय वातावरण एककेंद्रीच होते; कारण चीनवर एका कम्युनिस्ट पार्टीचेच प्रशासन होते. सांस्कृतिक वैविध्याबद्दल बोलणेही आक्षेपार्ह होते. वांशिक किंवा भाषिक पार्श्वभूमी कोणतीही असली, तरी चिनी राष्ट्राच्या सबलीकरणासाठी सर्वांनाच झटून काम करण्याचा व त्याचबरोबर समाजवादासाठी आर्थिक पाया घडविण्याच्या कामात सर्वस्व ओतण्याचा पक्षाचा आदेश होता.

अल्पसंख्याकांच्या आशा-आकांक्षांकडे दुर्लक्ष केल्यामुळे ‘हान’चा वर्चस्ववाद अपरिहार्यपणेच खोल रुजत गेला. त्याचा परिणाम, विशेषत: अयघर्स व तिबेटिन्स या अल्पसंख्याकांमध्ये असंतोष वाढण्यात झाला. कारण, त्यांच्याजवळ त्यांच्या संस्कृतीबाबत असलेले लिखित सुविकसित वाङ्‌मय आणि धार्मिक वारसा यांचा त्यांना अभिमान होता. २००८ साली बीजींग ऑलिम्पिक सुरू होण्याआधी स्थानिक जनता आणि सुरक्षा दलाचे सैनिक यांच्यामधील चकमकी तिबेट आणि झिन्जियांग यांनी पाहिल्या. आता काही अभ्यासक, काही पक्ष कार्यकर्तेसुद्धा या टोकाच्या विकेंद्रित देशामध्ये सांस्कृतिक एकरूपता आणण्यासाठी केवढी किंमत द्यावी लागेल, याचा विचार करू लागले आहेत. त्यातूनच निघालेल्या सातव्या सेमिनारला मी एक भारतीय उपस्थित होतो.

फूझौ परिषद ज्या इमारतीत होती तिच्या बाहेर जणू राखणदार असावा, असा कन्फ्यूशियसचा पुतळा होता. एकेकाळच्या या जगप्रसिद्ध विचारवंताचे कम्युनिस्ट राजवटीच्या ऐनभरात बरेच अवमूल्यन केले गेले होते; पण अलीकडे त्यांचे महत्त्व विस्मयकारक रीतीने वाढलेले दिसले. त्या परिषदेत पंचवीस सहभागी सदस्य होते. त्यांच्यापैकी चार जर्मन व एक भारतीय होता. बाकी सर्व चिनी होते. त्यांच्यामध्ये निम्मे ‘हान’ वंशाचे होते. पण परिषदेचे उद्दिष्ट ‘वांशिक अल्पसंख्याकांचा विचार हे असल्यामुळे तिबेटी, यी, आणि मंगोल यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्यांचीही उपस्थिती होती.

परिषदेची सुरुवात चीनमधील वांशिक अल्पसंख्याकांना मिळालेल्या वागणुकीचा ऐतिहासिक आढावा घेऊन झाली. त्यानंतरचे सादरीकरण मात्र काही विशिष्ट विषयांना केंद्रीभूत करून झाले. उदाहरणार्थ, वांशिक अल्पसंख्य आणि जीववैविध्याची जपणूक, वांशिक अल्पसंख्य आणि मोठे धरण प्रकल्प, वांशिक अल्पसंख्य आणि भाषाविषयक धोरण इत्यादी चर्चा अगदी मोकळेपणी सुरू होती. काही वेळा अतिशय परखडपणानेही! कारण ही परिषद बीजींगच्या बाहेर आयोजित केलेली होती. एकटाच भारतीय म्हणून मी परिषदेतील चर्चेत स्वत: फारसे सहभागी व्हायचे नाही असे ठरवले होते; कारण चर्चा मला बारकाईने ऐकायची होती. विशेषत: काही विशेषज्ज्ञांचे वाद-प्रतिवाद ऐकण्यासाठी मन एकाग्र करायचे होते.

– ३ –

भारतात वांशिक, भाषिक आणि धार्मिक विकेंद्रितता या सामाजिक जीवनाची एक पार्श्वभूमी बनून राहिल्या आहेत. त्यांना कायमच गृहीत धरले जाते. लोक त्यांची विशिष्ट भाषा बोलतात, त्यात शिक्षण घेतात, त्यांच्या पद्धतीचा पोषाख करतात; आहाराची त्यांची पद्धत वेगळी असते आणि त्यांची उपासनाही वेगवेगळ्या देवतांची असते. भारतीयांना हे मुद्दाम पहावे, शिकावे लागत नाही किंवा त्याचा जबरदस्तीने स्वीकार करावा लागत नाही. कारण इथे एकच सर्वमान्य असे वागणुकीचे राष्ट्रीय सूत्र नाही, मानदंड नाही. म्हणूनच सोनिया गांधींची इटालियन पार्श्वभूमी आणि कॅथलिक धर्म भारतातील त्यांच्या सर्वोच्च सत्तापदाच्या आड येऊ शकला नाही. अशी इतरही काही उदाहरणे आहेत. १९६० च्या दशकात देशात सर्वांत प्रभावशाली मानला जाणारा नेता एकही हिंदी शब्द बोलू शकत नव्हता आणि इंग्रजी भाषेचीही त्यांची तीच परिस्थिती होती. त्या तमीळ नेत्याचे नाव होते- के. कामराज.

विकेंद्रितता (डायव्हर्सिटी) ही एक सामाजिक अवस्था आहे, तर बहुविधता (प्लुरॅलिझम) हा राजकीय कार्यक्रम आहे. चीन भारताइतकाच जवळजवळ विकेंद्रित आहे; पण तो शासनातील बहुविधतेपासून खूपच दूर आहे. चीनला विसंगत भासणारी भाषेमधील, धार्मिक आणि राजकीय सैद्धांतिक विविधता या देशाच्या- भारत राष्ट्राच्या- उदयापासून येथे एकत्र नांदत आहे. तिला उत्तेजन दिले जात

आहे. भारतात बहुपक्षीय लोकशाही आहे. वयात आलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुष नागरिकाला दिलेला मतदानाचा अधिकार हा या लोकशाहीचा आधार आहे. भारतीय राज्यघटना कोणत्याही एका धर्माला श्रेष्ठ मानत नाही. आणि प्रत्येक राज्याला राज्यकारभार चालविण्यासाठी त्याच्या पसंतीच्या भाषेची निवड करण्याचा अधिकारही तिने दिला आहे.

भारताच्या बहुविधतेची मुळे नेमकी कोठे आहेत? या प्रश्नाचे एक उत्तर असे मिळते की, या देशातील धार्मिक परंपरांचा प्रभाव त्यासाठी कारणीभूत आहे. पुरातन कालापासून हिंदू लोकांची 'सहिष्णु' म्हणूनच ओळख आहे. त्यांच्यामध्ये प्रत्येक कुटुंबाला, त्यातील प्रत्येक सदस्यालाही स्वत:ची श्रद्धा असेल, त्या देवतेची पूजा करण्याचे स्वातंत्र्य आहे. या आधुनिक राष्ट्रात सर्वजण आपापल्या पद्धतीप्रमाणे (समाजाच्या) भाषा, श्रद्धा, वेष, आहार आणि राजकीय विचार जोपासू शकतात, याचा त्यांना आनंद आहे.

दुसरे एक उत्तर असे की, भारतीय प्रजासत्ताकातील बहुविधता ही वस्तुस्थिती प्राचीन हिंदू भूतकाळाची देन नाही. इसवीसनाच्या बाराव्या आणि सतराव्या शतकाच्या दरम्यानच्या काळात उत्तर भारताच्या सुपीक मैदानी प्रदेशात जी संमिश्र संस्कृती निर्माण झाली, तिची ती परिणती होती. 'गंगा-जमनी तहजीब'ने हिंदू-मुस्लिमांना परस्परांचा परिचय करून देऊन परस्परांबद्दल आदर व सौहार्द निर्माण केले. एकमेकांचे सण, धार्मिक कार्यक्रम आणि धर्मग्रंथ यांचा सन्मान करण्यास शिकवले. त्यांच्या दोहोंच्याही भाषांच्या संमीलनातून नवीन भाषेची निर्मिती, त्यांचा पेहराव, आहार व अन्न, त्यांची काव्यनिर्मिती आणि संगीत यांचे संमीलन, या सर्वांतून ही भारतीय प्रजासत्ताकाची बहुविधता निर्माण झाली आहे.

पण हे दोनही दृष्टिकोन चुकीचे आहेत. कारण हिंदूंमध्येही धर्मपंथांवरून घनघोर युद्धे झालेली आहेत. (दक्षिण भारतातील शैव व वैष्णव यांच्यामधील संघर्ष)

लोकशाही आणि बहुविधता या आधुनिक मूल्य कल्पनांच्या विरोधात पारंपरिक हिंदू समाजाने दलित आणि महिला यांना दिलेली वागणूक व दाखवलेली असहिष्णुता पूर्णपणे विपरीत आणि अमानुष आहेत. 'सर्वसमावेशक संस्कृती'बद्दल बोलायचे, तर समाजाच्या कडाकडांनी किंवा केवळ वरवर तिचे दर्शन होते. काही फकीर, भिक्षेकरी, साधू आणि गायक यांचे छोटे गट फक्त या संस्कृतीच्या प्रकाराशी एकरूप झालेले आढळतात. मध्ययुगीन भारतात हिंदू आणि मुस्लिम मंडळी खेड्यापाड्यांतून अगर गावांतून जेवणासाठी सुद्धा एकत्र आलेले कोठे आढळत नाहीत. त्यांच्या



बॅरिस्टर गांधींच्या दक्षिण आफ्रिकेतील मुक्कामात म्हणजे १९०३ ते १९१२ या काळात त्यांची 'विश्वात्मकता' वाढीला लागली असे आपल्याला दिसते. त्या वेळी ते जोहान्सबर्ग येथे राहत होते. तिथे त्यांची अशील मंडळी गुजराती व्यापारी, लष्करातले पठाण, हिंदी भाषिक रस्त्यावरचे किरकोळ माल विक्रेते आणि तमीळ भाषिक कामगार होते. गांधींबरोबर कस्तुरबा रहात होत्या आणि त्यांना त्याच घरात एका इंग्रज कुटुंबाचा शेजार होता. त्या जोडप्यामधील पुरुष एक कडवा ज्यू नागरिक होता, तर त्याची बायको ख्रिश्चन सोशॅलिस्ट होती. जेव्हा गांधींना जोहान्सबर्ग येथे त्यांच्या विरोधकांनी हल्ला चढवून मारहाण केली, तेव्हा जखमी झालेल्या गांधींना एका बॅप्टिस्ट धर्मगुरूने आणि त्याच्या पत्नीने सेवाशुश्रूषा करून बरे केले. दक्षिण आफ्रिकेतील त्यांच्या राजकीय कार्यामध्ये त्यांची भक्कम पाठराखण करणारा सहकारी एक पारशी व्यापारी होता.

राहण्याच्या जागा किंवा वस्त्या कटाक्षाने अलग ठेवलेल्या असत. त्यांचा समाजातील एकत्र रहिवास हा दोहोंसाठीही एक आपद्धर्मच होता. खुल्या मनाने परस्परांच्या फायद्यासाठी विचार करून ते समाजात एकत्र राहत नव्हते. परधर्मीयांच्या धार्मिक किंवा सामाजिक व्यवहारांबद्दल चाललेली कुजबुज ही गोष्ट सर्वसामान्य होती आणि संघर्षातून होणारे रक्तपातही कमी नव्हते.

भारतीय बहुविधता ही एक आधुनिक काळातील घटना आहे; वसाहतवादाच्या साच्यातून तावून सुलाखून निघाली आहे. ब्रिटिश या देशात येईपर्यंत भारतीय राष्ट्र ही संकल्पनाच इथे अस्तित्वात नव्हती. आज जे प्रजासत्ताक उभे आहे ते त्यांनी एकत्र केलेल्या प्रदेशामुळे. त्यावरच भारतीय गणराज्य आज हक्क सांगते व त्याचे नियंत्रण करते. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी देशाचे प्रदेश एकत्र करून दाखविलेले ऐक्य कृत्रिम होते. तो एक प्रकारचा अपघातच होता. राष्ट्रीय चळवळ सुरू झाली आणि 'ब्रिटिश इंडिया'मधील जनतेला समाईक राजकीय आणि नैतिक उद्दिष्ट लाभले.

भारतातील बहुविधता (जी आज दिसते ती) अनेक व्यक्ती आणि संघटना यांचे कठोर परिश्रम आणि विवेकाने केलेली उद्दिष्टांची निवड यांची फलश्रुती आहे. त्यांतील एका एकाची नोंद करायची झाली, तर त्यांत अग्रक्रमावरील नावे मोहनदास करमचंद गांधी आणि इंडियन नॅशनल काँग्रेस यांची असतील. गांधींनी आपली क्षितिजे आपल्या तरुण वयातच विस्तारली होती. त्यांचा शाळेतील मित्र मुस्लिम होता. लंडनमध्ये कायद्याचे शिक्षण घेत असताना त्यांचे सहाध्यायी विविध ख्रिश्चन पंथातले होते. ते भारतात परतले, तेव्हा त्यांना भेटलेल्या एका जैन पंडिताकडून त्यांनी आचार धर्माचे धडे घेतले.

बॅरिस्टर गांधींच्या दक्षिण आफ्रिकेतील मुक्कामात म्हणजे १९०३ ते १९१२ या काळात त्यांची 'विश्वात्मकता' वाढीला लागली असे आपल्याला दिसते. त्या वेळी ते जोहान्सबर्ग येथे राहत होते. तिथे त्यांची अशील मंडळी गुजराती व्यापारी, लष्करातले पठाण, हिंदी भाषिक रस्त्यावरचे किरकोळ माल विक्रेते आणि तमीळ भाषिक कामगार होते. गांधींबरोबर कस्तुरबा रहात होत्या आणि त्यांना त्याच घरात एका इंग्रज कुटुंबाचा शेजार होता. त्या जोडप्यामधील पुरुष एक कडवा ज्यू नागरिक होता, तर त्याची बायको ख्रिश्चन सोशॅलिस्ट होती. जेव्हा गांधींना जोहान्सबर्ग येथे त्यांच्या विरोधकांनी हल्ला चढवून मारहाण केली, तेव्हा जखमी झालेल्या गांधींना एका बॅप्टिस्ट धर्मगुरूने आणि त्याच्या पत्नीने सेवाशुश्रूषा करून बरे केले. दक्षिण आफ्रिकेतील त्यांच्या राजकीय कार्यामध्ये त्यांची भक्कम पाठराखण करणारा सहकारी एक पारशी व्यापारी होता.

अशा विविधधर्मीय पण समानशील व्यक्तींच्या समाजात राहून गांधींना भारतातील सामाजिक, सांस्कृतिक विविधता ज्या प्रकारे आणि पूर्णत्वाने उलगडून समजली तितकी ती राजकोट किंवा मुंबई येथे राहून समजणेही कठीण होते. आफ्रिकेतून स्वदेशात परतल्यावर राजकारणात ते सक्रिय झाले, तेव्हा देशातील या वैविध्याची त्यांनी काँग्रेस संघटनेला जाणीव तर करून दिलीच; पण ती मान्य करून त्याबाबतीत जाहीर कार्यक्रम पक्षाने ठरवावेत, यासाठी सतत आग्रह धरला. त्याची सुरुवात भाषिक मुद्यावर पक्षाचे पुनर्संघटन करण्याच्या कार्यक्रमाने झाली. धार्मिक सुसंवादाची जपणूक, आणि स्त्रिया व मागासलेल्या जाती-वर्णांचे लोक यांना देशात समान नागरिकत्व यासाठी संकल्प करण्याचे जाहीर आवाहन करण्यात आले.

गांधी आणि त्यांचे सहकारी यांनी पुरस्कारिलेली ही बहुकेंद्री भूमिका भारतीय राज्यघटनेचा एक महत्त्वाचा घटक बनली. भारतीय स्वातंत्र्योत्तर काळात भारताचे पहिले प्रधानमंत्री जवाहरलाल नेहरू यांनी अत्यंत कसोशीने ही बहुविधता जपली. गांधी व नेहरू यांच्यामध्ये आर्थिक धोरण, आधुनिक विज्ञान आणि पाश्चिमात्त्य विचारसरणी यांसारख्या मुद्द्यांवर मतभेद होते; पण राष्ट्रीय अस्मितेच्या - बहुविधतेच्या कसोटीच्या प्रश्नावर नेहरूंनी गांधींचे अनुयायित्व मन:पूर्वक स्वीकारले. राजमोहन गांधी यांनी गांधींवरील एका पुस्तकात 'दि गुड बोटमन' या प्रकरणात गांधींनी आपला राजकीय वारसदार म्हणून सरदार पटेल यांच्या ऐवजी नेहरूंना का निवडले, याचा खुलासा केला आहे. देशातील युवक, अल्पसंख्यांक, शेतकरी आणि कामगार या सर्वांच्या हृदयात नेहरूंबद्दल असणारा जिव्हाळा आणि आदर यांच्याबद्दल लिहून शेवटी राजमोहन लिहितात- ''सर्व वयाच्या, वर्गांच्या आणि धर्मांच्या भारतीयांना एकत्र आणण्यासाठी आणि त्यांचे प्रतिनिधित्व करण्यासाठी वल्लभभाईंपेक्षा जवाहरलालच अधिक सक्षम होते.''

राजमोहननी यामध्ये दोन प्रकारचे घटक वगळले आहेत. एक घटक लिंग आणि दुसरा घटक भाषा. नेहरू एक असे राजकारणी होते, ज्यांची मोहिनी तरुणांवर होती. श्रीमंत वकील असूनही त्यांना गरीब किसानांबद्दल आपुलकी होती. हिंदू असूनही मुस्लिमांनाही त्यांच्याबद्दल प्रेम होते. दक्षिण भारतीयांचा विश्वास मिळवणारे नेहरू उत्तर भारतीय होते.

शिवाय महत्त्वाचे म्हणजे पारंपरिक भारतीय समाजात स्त्रियांच्या होणाऱ्या अवहेलनेची पूर्ण जाणीव त्यांना होती. सार्वत्रिक प्रौढ मतदान पद्धत अवलंबावी याबद्दलचा आग्रह त्यांचाच होता. पारंपरिक हिंदू कौटुंबिक आणि वारसाविषयक कायद्यांमधील दुरुस्तीचे विधेयक डॉ.आंबेडकरांनी लोकसभेत सादर केले आणि नेहरूंनी त्याचा पाठपुरावा केला. नेहरूंचे सर्वांत मोठे श्रेय हे की, भारताला 'हिंदू पाकिस्तान' बनवण्याचे स्वप्न बघणाऱ्यांच्या विरोधात ते ठामपणाने उभे राहिले आणि दक्षिणेकडील व पूर्वेकडील राज्यांवर हिंदी भाषेच्या सक्तीला त्यांनी विरोध केला.

गांधींप्रमाणे नेहरूंनाही हा देश म्हणजे असंबद्ध गोष्टींचे एक अजब मिश्रण वाटत होते; ज्याला विशिष्ट असे एकच तत्त्वज्ञान नव्हते. १९५२ साली नेहरूंनी ईशान्य भारतातील राज्यांच्या सीमाप्रदेशातून प्रवास केला होता. नंतर रिवाजाप्रमाणे राज्यांच्या मुख्यमंत्र्यांना लिहिलेल्या पत्रांत त्यांनी असे नमूद केले आहे, ''या प्रदेशाकडे आपले विशेष लक्ष असले पाहिजे. फक्त राज्यांच्या प्रशासनाकडेच नव्हे; तर प्रदेशातील लोकांकडेही! त्या भागात प्रवास करताना संकुचितपणा, ज्यामुळे काही काळ आपली दृष्टी झाकोळून गेलेली असते, तो हळूहळू नाहीसा होऊ लागतो.'' नेहरू पुढे लिहितात, ''रवींद्रनाथ टागोर यांनी भारताबद्दलच्या आपल्या एका प्रसिद्ध काव्यात असे लिहिले आहे की, 'कोणी साद घातली, कोणास ठाऊक! पण माणसांच्या प्रवाहांच्या लाटा, अज्ञात ठिकाणांहून निघून, एकावर एक उसळून येथे एका सागरात विलोपल्या आहेत. इथे आर्य, अनार्य, चिनी, शक-हूण इत्यादी समूह, पठाण आणि मोगल... कित्येक जण आले आणि एकजीव झाले.''

नेहरूंच्या निधनानंतर या देशाचे हिंदु राष्ट्र किंवा भाषिक राष्ट्र बनविण्याचे प्रासंगिक प्रयत्न झाले. जनसंघाची 'हिंदी, हिंदू, हिंदुस्थान' ही एके काळची घोषणा होती. ती त्यांची ओळख होती. पण 'हिंदी' या शब्दामुळे गंगेच्या खोऱ्यापलीकडे पक्षाच्या विस्ताराला बाधा येत आहे याची जाणीव पक्षाला झाली, तेव्हा त्याचा आग्रह सोडून देण्यात आला. पक्षाच्या भारतीय जनता पक्ष या नव्या अवतारात पक्षाच्या नेत्यांना भारत हे हिंदू राष्ट्र आहे किंवा असावे असे कितीही मनोमन वाटत असले, तरी ते जाहीरपणे बोलून दाखवण्याची प्राज्ञा नव्हती. काँग्रेस पक्षाच्या 'अल्पसंख्याकांच्या अनुनयास त्यांनी 'सकारात्मक धर्मनिरपेक्षता' हा पर्याय ठेवला. सावरकर, गोळवलकर यांच्यासारख्या हिंदुत्वाच्या पथदर्शकांना हा पर्याय अजिबात



नेहरू एक असे राजकारणी होते, ज्यांची मोहिनी तरुणांवर होती. श्रीमंत वकील असूनही त्यांना गरीब किसानांबद्दल आपुलकी होती. हिंदू असूनही मुस्लिमांनाही त्यांच्याबद्दल प्रेम होते. दक्षिण भारतीयांचा विश्वास मिळवणारे नेहरू उत्तर भारतीय होते. शिवाय महत्त्वाचे म्हणजे पारंपरिक भारतीय समाजात स्त्रियांच्या होणाऱ्या अवहेलनेची पूर्ण जाणीव त्यांना होती. सार्वत्रिक प्रौढ मतदान पद्धत अवलंबावी याबद्दलचा आग्रह त्यांचाच होता. पारंपरिक हिंदू कौटुंबिक आणि वारसाविषयक कायद्यांमधील दुरुस्तीचे विधेयक डॉ.आंबेडकरांनी लोकसभेत सादर केले आणि नेहरूंनी त्याचा पाठपुरावा केला. नेहरूंचे सर्वांत मोठे श्रेय हे की, भारताला 'हिंदू पाकिस्तान' बनवण्याचे स्वप्न बघणाऱ्यांच्या विरोधात ते ठामपणाने उभे राहिले आणि दक्षिणेकडील व पूर्वेकडील राज्यांवर हिंदी भाषेच्या सक्तीला त्यांनी विरोध केला.

मानवला नसता; कारण 'धर्मनिरपेक्षता' ही कल्पनाच त्यांच्या लेखी परकीय, पाश्चिमात्य संस्कृतीचा परिपाक होता. पण आता काही भाजपच्या नेत्यांना तिचा वापर अपरिहार्य वाटू लागला आहे, यातच या प्रजासत्ताकाच्या पायाभूत प्रेरणांमागील शक्तींची स्पष्ट कबुली आहे.

– ४ –

भारतात राजकीय बहुविधता फार कष्टाने जोपासून वाढविण्याचा प्रयत्न झाला, तरीही तो अद्याप ठिसूळ आहे असेच म्हणावे लागेल. भाषिक आणि धार्मिक अतिरेक्यांकडून ही बहुविधता नष्ट करण्याचा प्रयत्न कारणपरत्वे चाललेलाच असतो. सर्वधर्मसमभावाचे किंवा बहुविधतेचे हे प्रयत्न प्रत्यक्षात फलद्रुत होताना दिसत नसले, तरी सैद्धांतिकदृष्ट्या त्यांना जनतेची मंजुरी मिळाली आहे हे निश्चित. प्रमुख राजकीय पक्ष आणि सर्वसाधारण नागरिक– या देशातील एखादा धर्म किंवा एखादी भाषा या देशाच्या ऐक्याचे प्रतीक ठरली आहे, असे मानत नाहीत.

या उलट, चीनमध्ये मात्र एक विशिष्ट वंश आणि एक भाषा हीच राष्ट्राची ओळख किंवा अस्मिता म्हणून समोर येतात. संख्या, आर्थिक ताकद, राजकीय व लष्करी वर्चस्व या सर्व बाबतीत चीनमध्ये 'हान' वंशाचे वर्चस्व आहे. हानवंशीय नसलेल्या व्यक्तीला बहुतेक सर्व व्यवसायांत उच्चपदावर पोहोचणे अशक्यच असते. अमेरिकन संघराज्य आणि बहुसंख्य युरोपीय राष्ट्रे (भारताचा अपवाद) यांत एकच भाषा बोलता–लिहिता येणे, आवश्यक असते; त्याचप्रमाणे चीनमध्ये 'मांदारिन' ही राष्ट्रीय बोलीभाषा नागरिकत्वाच्या नोंदणीसाठी आवश्यक आहे. चीनच्या वेगवेगळ्या भागांत वेगवेगळ्या बोलीभाषा आहेत; पण शाळा–कॉलेज यांची अधिकृत यंत्रणा, राष्ट्रीय नियंत्रणाखालील प्रसारमाध्यमे एकाच प्रमाणित भाषेचा पुरस्कार करतात, जिचा वापर करून व्यावसायिक यश आणि राजकीय स्थान निश्चिती असे दोनही लाभ मिळतात.

पाश्चात्त्य वसाहतवादाचा अनुभव, जपानचे आक्रमण, यादवी युद्ध आणि कम्युनिस्ट क्रांती या सर्व घटनांमुळे राष्ट्राची ओळख किंवा अस्मिता ठळकपणे समोर आणण्याची गरज आधुनि चीनला वाटते. मुक्तीलढ्यानंतरच्या काळात स्वातंत्र्य आले, तरी लहान–मोठ्या वंशाच्या लोकांना 'हान' वंशाच्या लोकांनी जे नियम घालून दिले होते, तेच पाळावे लागत होते. म्हणजे प्रत्येकाला बहुसंख्याकांचा आचार धर्म पाळावा लागत होता आणि मांदारिन याच प्रमाणित भाषेत शिकावे, अगर बोलावे लागत होते.

माओच्या मुक्तिसेनेने चीन जिंकला त्याला साठ वर्षे होऊन गेली, तेव्हा आता चीनच्या राष्ट्रीय ऐक्याची चिंता 'हान'ना विशेष राहिलेली नाही, किंवा थोडी कमी झाली आहे. पण दूरदर्शी अभ्यासकांना, सर्वच नागरिकांवर एकच भाषा किंवा संस्कृती लादणे उचित वाटत नाही. अल्पसंख्य विभागांतून येणारे निषेधाचे सूर त्यांना जागरूक बनवत आहेत. त्या अल्पसंख्यांकांना संरक्षण देण्याची आणि त्यांची 'हान' वंशीयांपेक्षा अलग असलेली जीवन व वैचारिक पद्धती जमल्यास पुनरुज्जीवित करण्याची त्यांची ईर्ष्या आहे.

मी स्वत: उपस्थित असलेल्या या परिषदेत या नवीन बहुविध प्रवृत्तींचे दर्शन झाले. एका वक्त्याने या प्रश्नाच्या संदर्भात लॅटिन अमेरिकेकडून धडे घ्यावेत, असे परिषदेत भाग घेणाऱ्या सदस्यांना सांगितले. एकेकाळी तिरस्कृत मानल्या जाणाऱ्या आफ्रिकन समाजाने निर्माण केलेली, लॅटिन अमेरिकेत प्रसृत झालेली आणि नंतर त्यांच्या जीवनपद्धतीचा एक भाग झालेली टँगो आणि साम्बा गीते यांचा प्रवास त्यांनी श्रोत्यांसमोर मांडला. ब्राझील हे राष्ट्र एकेकाळी स्वत:ला युरोपीयन राष्ट्र मानत होते; पण आता स्वत:च्या नव्या सांस्कृतिक प्रथा ते उचलून धरत आहे; त्यांचा गौरव करीत आहे– ज्या प्रथा काळ्या गुलामांनी कधी काळी निर्माण केल्या होत्या. हे सांगून त्या वक्त्याने, अयघूर आणि तिबेटी संस्कृतीतील चांगल्या, आकर्षक गोष्टी अगर प्रथा सर्व चिनी समाज का उचलू शकत नाही, असा प्रश्न केला.

दुसऱ्या एका वक्त्याने अल्पसंख्य विभागात 'हान' परंपरांचा शिरकाव केला जात आहे, याबद्दल टीका केली. तिसऱ्या वक्त्याने 'हान' वंशियांच्या सांस्कृतिक दडपणाचा उल्लेख केला. चौथ्या वक्त्याने मुख्य प्रवाहातील 'हान' संस्कृती शिल्लक आहे काय, असा प्रश्न उपस्थित करून त्याला आधार म्हणून स्वत:ला 'हान' म्हणवून घेणाऱ्या लोकांच्या भाषा, पोषाख आणि जेवणातील पदार्थ यांच्यामध्ये असलेल्या विविधतेची माहिती दिली.

त्या परिषदेतले मला सर्वांत भिडलेले भाषण एका विद्वान तरुणीचे होते. तिच्यावर तिबेटमधील पक्षाच्या कार्यकर्त्यांचे शिक्षण करणे ही जबाबदारी होती. तेथील एका सीमेवरील प्रदेशात ओतला जाणारा पैसा कशासाठी, हा तिचा प्रश्न होता. एकेकाळी हा प्रदेश जवळजवळ स्वतंत्र होता आणि अद्यापपर्यंत त्यात चीनपासून फुटून निघण्याच्या चळवळी चालू आहेत. या अल्पसंख्य जमातींवर पैसा ओतल्यामुळे त्यांना काही फायदा मिळणार आहे काय? की देशाचा त्यात

फायदा आहे? असा त्या शिक्षिकेचा प्रश्न होता. या लोकांना मदत देण्याची एक विशेष प्रकारची उत्सुकता का दिसते आहे? की या देणगीमुळे तिबेटी काही कृतज्ञता व्यक्त करतील, अशी क्वचितच सफल होणारी अपेक्षा या देणग्यांच्या मागे आहे? हा पैसा स्वीकारणाऱ्यांचा दृष्टिकोन आपल्याला राज्यावर, शासनावर यापुढे अधिकाधिक अवलंबून राहावे लागेल, असा असणार आहे काय? यापेक्षा स्थानिक स्वायत्तता आणि औद्योगिकता अधिकाधिक सखोल होत जाईल, यांसाठी प्रयत्न करणे योग्य नाही काय? आपल्या विवेचनाच्या पुष्टीसाठी त्या तरुणीने असे उदाहरण दिले, की तिबेटमधील एक छोटासा उद्योजकांचा गट, स्थानिक कारागिरांनी तेथील उपलब्ध साहित्यातून बनवलेल्या उदबत्त्या आणि गळपट्टे यांचा व्यापार करण्यात कसा यशस्वी झाला, ते पाहण्याची गरज आहे.

भारतात या घटनांशी समांतर उदाहरणे सापडणे कठीण नाही. दिल्लीमध्ये ईशान्य विभाग विषयक एक खाते 'डिपार्टमेंट ऑफ नॉर्थ ईस्ट रीजन अफेअर्स' कार्यरत आहे. त्यातील नावाच्या अक्षरांचा संकोच करून त्याला 'डोनर' असे आद्याक्षरांवरून म्हटले जाते. त्याचा दररोजचा जीवनातील वापर त्या शब्दाच्या अर्थाशी सुसंगत असाच आहे.

काही वर्षांपूर्वी मी मणिपूर आणि अरुणाचल प्रदेशातून फिरत होतो, तेव्हा सरकारी अधिकारी आणि एन्जीओ कार्यकर्ते यांच्या संभाषणात 'डोनर'कडून काय काय करून घ्यावे, याची चर्चा मी ऐकली होती. कारण ईशान्येकडील राज्यात काही प्रदेशांत स्वातंत्र्यासाठी चळवळी चालू आहेत. भारतातील प्रजासत्ताकापासून अलग होऊन वांशिक स्वराज्याची स्थापना करण्याची इर्ष्या या प्रदेशांतील काही भागात आहे. तिबेट आणि चीनप्रमाणे इथेही पेचात सापडलेले केंद्र सरकार भरपूर पैसा ओतून सामाजिक स्वास्थ्य आणि राजकीय समाधान लाचलुचपतीने करण्याच्या प्रयत्नात आहे.

– ५ –

चीनच्या प्रशासनाने अल्पसंख्यांच्या संस्कृतिक बाबी कशा हाताळाव्यात, या विषयावर चीनमधील विचारवंतांचे (माझ्या माहितीप्रमाणे) तीन स्पर्धात्मक दृष्टिकोन आहेत. त्यांतील पहिला दृष्टिकोन असा की अल्पसंख्यांनी 'हान' जीवनपद्धतीशी जुळवून घ्यावे आणि आपली प्रथम व अंतिम भाषा म्हणून 'मांदारिन'चा स्वीकार करावा. 'हान' वर्चस्वाला जवळजवळ शरण जाण्याच्या या दृष्टिकोनाला, त्या परिषदेत, कोणाचाच पाठिंबा मिळाला नाही. पण बीजिंगमध्ये जे निर्णयकर्ते बसले होते, त्यांच्यामध्ये मात्र या दृष्टिकोनाला सर्वत्र मान्यताच होती. कारण सांस्कृतिक व्यवहारात त्यांना फार सूट मिळाली, तर तिबेटी आणि अयघूर यांच्या अवाजवी राजकीय मागण्यांचे केंद्र शासनावर दडपण येईल, असे त्यांचे मत होते.

दुसरा दृष्टिकोन होता तो 'हान' समाजाने मोठ्या भावाप्रमाणे इतर समाजांशी वागावे (जॉर्ज ऑरवेलच्या 'ॲनिमल फार्म'मधील 'बिग ब्रदर' प्रमाणे नव्हे). भारतीय व्यवहारात 'बडे भय्या' हे नाते प्रचलित आहे, त्यात अधिकाराबरोबर ममतेचा, जबाबदारीचाही काही भाग आहे. एका वक्त्याने, हे नाते वांशिक अल्पसंख्यांबरोबर वागताना अधिक जबाबदारीने सांभाळावे असे आवाहन केले. दुसऱ्या एका सदस्याचे असे मत होते की, सांस्कृतिक अल्पसंख्यांनी कला, पोषाख, संगीत यांच्यातील उत्तमोत्तम प्रकारांची निवड करून त्यांच्यासाठी वस्तुसंग्रहालय उभारून त्यांचे प्रदर्शन करावे. या दृष्टिकोनातून अधिक मोठ्या, ताकदवान आणि आर्थिकदृष्ट्या अधिक सुस्थिर अशा 'हान' समाजाने मोठेपणा दाखवून त्यांची अतिरिक्त संपत्ती आणि सामाजिक कौशल्ये यांचा वापर करून कनिष्ठ अल्पसंख्य बंधूंना आधुनिकतेचा परिचय करून द्यावा, असेही मत मांडले गेले. यामुळे अल्पसंख्यांना त्यांचे काही महत्त्वाचे सांस्कृतिक संदर्भ आणि व्यवहार जतन करता येतील आणि आर्थिक भरभराटीचे राष्ट्रीय उद्दिष्ट व सांस्कृतिक श्रेष्ठत्व यांची सांगड घालणे सोपे जाईल.

तिसरा पर्याय अधिक सखोल सांस्कृतिक बहुविधतेचा आहे. हा निश्चितपणेच अधिकृत सरकारी प्रचारातून बाजूला पडला असला तरी या सेमिनारमध्ये मांडण्यात आलेल्या प्रतिपादनावरून त्याचा परिणाम काही ठिकाणी विशेष जाणवला. एका तिबेटी सदस्याने परिषदेमध्ये, विद्यार्थ्यांनी मातृभाषेतून शिक्षणाचा आग्रह धरल्यावर पोलिसांनी त्यांना कसे बदडून काढले याची हकिगत सांगितली. लोकांच्या गरजांना सरकारी प्रतिसाद मिळत नाही असे तो म्हणाला. त्या वक्त्याने असेही सांगितले की, जरी आज विचारवंतांच्या समुद्रतीरावर भरलेल्या या सभेत तो या विषयांवर मोकळेपणाने बोलू शकला असला तरी तिबेटमध्ये खाजगी बैठकीतही तो हे बोलू शकत नाही. (म्हणजेच अर्थातच बीजींगमध्येही) बीजींगमध्ये तुम्ही सिंकियांग अगर तिबेटची चर्चाच करू शकत नाही. टेबलवर (विषयपत्रिकेत) ते विषय कधीच नसतात. मग चर्चा न करता हे प्रश्न तुम्ही सोडवणार कसे?

पक्षाच्या सर्वोच्च वर्तुळात सांस्कृतिक बहुविधता या

विषयाची क्वचितच चर्चा झालेली असेल; पण मला असे आढळले की विचारवंतांमध्ये या विषयावरचा विचारविनिमय कसाही का होईना, पण निश्चित चालू असणारच! तीन वेगवेगळ्या व्यक्तींनी या नियमाबाबत मारलेले शेरे भरपूर परिश्रम घेणाऱ्या दुभाष्याने माझ्यापर्यंत पोचवले आहेत ते असे :

''आम्ही जेव्हा 'जनतेचा' (लोकांच्या) उल्लेख करतो, तेव्हा 'व्यक्ती' लक्षात घेत नाही; त्याचप्रमाणे प्रांत किंवा प्रदेश यांचा विचारही न करता आम्ही 'राष्ट्राबद्दल' बोलत असतो.''

''पाश्चिमात्य जगात वंशवाद हा शब्द वाईट, घाणेरडा समजतात. पण आम्ही 'हान' श्रेष्ठत्ववाद मान्य करतो; त्याचे आचरण करतो. त्यावर कधीच विचार होत नाही. आम्ही स्वत:बद्दल सावध असले पाहिजे. आत्मटीकेला सामोरे गेले पाहिजे.''

''आम्हांला नवीन सामाजिक कल्पनाविश्वाची गरज आहे. चीन हे राष्ट्र बहुवांशिक किंवा बहुसांस्कृतिक होईल याची भीती आम्ही बाळगू नये.''

अत्यंत तीव्र भावनोद्रेकातून बाहेर आलेले हे उद्‌गार होते. त्यासाठी अर्थातच मीही थोडाफार जबाबदार होतोच! कारण पहिल्याच सत्रात मी भारत प्रथमपासूनच एक सार्वभौम प्रजासत्ताक कसे होते; धार्मिक सुसंवाद व त्याचबरोबर बहुभाषिकता वाढविण्यासाठी, तिला मान्यता मिळवून देण्यासाठी भारताने काय प्रयत्न केले, याबद्दलचे विवेचन केले होते. सुरुवातीला धार्मिक सुसंवादाच्या बाबतीतील चित्र थोडे धूसर असले, तरी बहुभाषिकत्वाच्या बाबतीत भरपूर यश देशाच्या पदरी पडले. (याचा पुरावा म्हणून मी त्यांना रुपयाची नोट दाखविली. सतरा भाषा आणि सतरा लिप्या मुद्रित केलेली ती नोट नेहरू काळातील भारतीयाची 'एक्झिबिट A' होती) आता परिषदेच्या अखेरीस अर्धा 'हान'– अर्धा तिबेटी अशा एका कार्यकर्त्याला मी एका जर्मन सदस्याकडे जाऊन बोलताना पाहिले. हे जर्मन गृहस्थ त्यांच्या विद्यापीठातील कनफ्यूशियस इन्स्टिट्यूटचे (चीन सरकारच्या साहाय्यावर चाललेल्या) संचालक होते. त्यांच्याजवळ गेलेल्या त्या कार्यकर्त्याने त्यांना विचारले, 'तुमच्या संस्थेत तुम्ही मांदारिनच का शिकवता? तुम्ही तिबेटी किंवा अयघूर भाषा का नाही शिकवत?'

माओच्या कालखंडात चीनमध्ये भूतकाळ पुसून टाकण्याचे पद्धतशीर प्रयत्न झाले. बिजींग आणि शांघाय यासारख्या शहरातील वास्तुशिल्पांची अघोरी मोडतोड पाहून याची खात्री पटते. तथापि आता मात्र चिनी राज्यकर्ते त्यांच्या सांस्कृतिक सखोलतेचा आणि परंपरेचा त्यांच्या राष्ट्रीयतेशी संबंध जोडण्याच्या धडपडीत आहेत. स्थापत्यविद्या आणि उत्खनन व पुरातत्त्वशास्त्र (आर्किऑलॉजी) यांच्या मधील त्यांचे स्वारस्य कमालीचे वाढले आहे. लिपींचे संशोधन, हस्तकला, विविध प्रकारचे दगड, हाडे आणि उत्खननातून मिळालेले पुरावे यांवरून त्यांची संस्कृती ही किती पुरातन व समृद्ध होती हे जगाला दाखवण्याचे त्यांचे प्रयत्न चालू आहेत.

अध्यक्षीय खुर्चीमध्ये लाई हेरॉंग नावाचे प्रज्ञावंत शांतपणे बसले होते. सुरुवातीलाच उल्लेख केलेल्या 'चायना सेंटर फॉर ओव्हरसीज सोशल ॲण्ड फिलॉसॉफिकल थिअरीज'चे ते कार्यकारी संचालक होते. युरोपमध्ये शिकलेले प्रा. हेरॉंग अत्यंत विद्वान होते. त्यांनी स्वत:ला पाश्चिमात्य सामाजिक विज्ञानात पूर्णपणे बुडवून घेतले होते; त्याचबरोबर त्यांनी रचलेल्या अभिजात चिनी काव्याचा त्यांचा ब्लॉगही होता. बहुभाषिकतेच्या विषयावर झालेला हा भावनोद्रेक पाहून व ऐकून त्यांनीच प्रत्युत्तर केले. ''माझ्या सर्व आयुष्यात मी परकीय भाषांतून शिक्षण घेतले, माझ्या विचारांच्या कक्षा रुंद व्हाव्यात म्हणून! मी रशियन, जॅपनीज, जर्मन, इंग्लिश या भाषा आत्मसात करण्याचा प्रयत्न केला. कदाचित आता मला तिबेटी किंवा अयघूर या भाषा शिकाव्या लागतील.''

प्रा. हेरॉंगना हे नीट ठाऊक होते की जगात जे नवीन वारे वाहू लागले आहेत, त्याचे प्रतिनिधित्व ते करीत आहेत. एकोणीसाव्या शतकाच्या शेवटी-शेवटी चीनमधील महत्त्वाकांक्षी बुद्धिमंतांनी जगातील पुढारलेल्या देशातील भाषांशी परिचय करून घेण्यास सुरुवात केली. ऐतिहासिक काळाचा निकष लावून जपानी, रशियन आणि इंग्लिश अशा क्रमाने ते शिकले. पण त्यांच्यापैकी अगदी थोड्यांनाच मंगोलियन, तिबेटी किंवा अयघूर भाषा शिकणे आवश्यक वाटले; कारण ते लोकच 'मांदारिन' शिकून तयार झालेले असतील, अशी त्यांची अपेक्षा होती.

भारतामध्ये महत्त्वाकांक्षी बुद्धिजीवी मंडळींनी आपली

विद्वत्ता वाढविण्यासाठी आणि व्यावसायिक उत्कर्षासाठी पाश्चिमात्य भाषांचा अभ्यास सुरू केला. एकेकाळच्या वसाहतवादी राजवटीची इंग्लिश भाषा आता जागतिकीकरणामुळे बाजारातील व्यवहाराची भाषा म्हणून मान्यता पावली. आणि त्यानंतर बुद्धिजीवींच्या जगतात इंग्रजीचा प्रसार अत्यंत वेगाने झाला. इतका की, अनेक भारतीय लेखक व प्राध्यापक यांना मनातले विचार मांडण्यासाठी स्वत:च्या मातृभाषेपेक्षाही इंग्रजी सोईस्कर वाटू लागली आहे. तरीही द्विभाषिकता आणि बहुभाषिकता भारतात अपरिहार्य आहेत. विशेषत: गावे आणि शहरे यांच्यामध्ये. तेलगू आणि तामिळ भाषिक मोठ्या प्रमाणात बंगलोरमध्ये वास्तव्य करतात, ते शहर प्रत्यक्षात कर्नाटकाची राजधानी आहे. त्याचप्रमाणे गुजराती व हिंदी भाषिक यांचे मुंबईतील वास्तव्य अनेक लाखांच्या घरात आहे. भारतातील बहुसंख्य नागरिकांना आपली मातृभाषा सोडून इतर भारतीय भाषांतील बोलणे, लेखन आणि वाचन समजून घेण्यास फारशी अडचण पडत नाही.

जागतिकीकरणाने ही जी एकत्रीकरणाची हवा निर्माण झाली आहे. तिचे परिणाम भारत आणि चीन यांच्या भाषाविषयक परिस्थितीवर वेगवेगळे झालेले दिसतात. सैद्धांतिक दृष्ट्या आणि व्यवहारातही भाषेच्या माध्यमातून भारत एक बहुभाषिक राष्ट्र सिद्ध झाले आहे.

– ६ –

माओच्या कालखंडात चीनमध्ये भूतकाळ पुसून टाकण्याचे पद्धतशीर प्रयत्न झाले. बिजींग आणि शांघाय यासारख्या शहरातील वास्तुशिल्पांची अघोरी मोडतोड पाहून याची खात्री पटते. तथापि, आता मात्र चिनी राज्यकर्ते त्यांच्या सांस्कृतिक सखोलतेचा आणि परंपरेचा त्यांच्या राष्ट्रीयतेशी संबंध जोडण्याच्या धडपडीत आहेत. स्थापत्यविद्या आणि उत्खनन व पुरातत्त्वशास्त्र (आर्किऑलॉजी) यांच्यामधील त्यांचे स्वारस्य कमालीचे वाढले आहे. लिपींचे संशोधन, हस्तकला, विविध प्रकारचे दगड, हाडे आणि उत्खननातून मिळालेले पुरावे यांवरून त्यांची संस्कृती किती पुरातन व समृद्ध होती हे जगाला दाखवण्याचे त्यांचे प्रयत्न चालू आहेत.

परिषद संपल्यावर एक जवळचा फेरफटका मारण्यासाठी आम्हांला हाक्का नावाच्या ग्रामीण परिसरात नेण्यात आले. अलीकडेच (२००८) या परिसराला– 'वर्ल्ड हेरिटेज साईट'चा दर्जा मिळाला आहे. आम्ही तिथे जाण्यासाठी गावातून बाहेर पडलो. कारखान्यांचा भाग ओलांडला आणि ग्रामीण भागात शिरलो. वाढत्या वैभवाच्या खुणा तेथे आम्हांला सर्वत्र दिसल्या. तिथल्या लहान अंधाऱ्या गावठी घरांऐवजी तीन–चार मजल्यांच्या आधुनिक इमारती आम्ही पाहिल्या. त्यापुढे आम्ही मैदानात गेलो आणि तेथून वर एक टेकडी चढायला सुरुवात केली. भोवतालचे दृश्य मला मेघालयाची आणि आसाममधील डोंगर–दऱ्यांची आठवण करून देत होते. त्यांना विळखा घालून वाहात जाणारी नदी... बांबूची छोटी बने आणि चहाचे मळे, पण भारताप्रमाणे मोठमोठ्या कंपन्यांच्या मालकीचे अफाट मळे नाहीत तर छोट्या छोट्या शेतातून दिसणारी चहाची झुडपे... नयनरम्य दृश्य!

हाक्का नावाच्या जमातीतील लोकांना आम्ही भेटणार होतो; त्यांचे सहज वर्गीकरण करता येण्यासारखे नव्हते. त्यांच्यामध्ये हान होते आणि नव्हतेही! या दोघांची मिश्र संस्कृती आणि विशेषत: वास्तुकला ही चीनच्या मुख्य भूमीवरील शेतकऱ्यांच्या खेड्यांपेक्षा कितीतरी वेगळी होती. दुसऱ्या बाजूने व्यापार आणि उद्योग या आघाड्यांवरचा त्यांचा अनुभव आणि इतिहास दीर्घ होता. चीनमधून परदेशांत जाऊन स्थायिक होणाऱ्यात हे लोक पहिले व त्यामुळेच महत्त्वाचे असावेत. त्यांच्या या सर्व गुणधर्मांमुळे ते अयधूर आणि तिबेटी लोकांपेक्षा वेगळे दिसतात. वरील दोनही अल्पसंख्य जमाती अधिक सनातनी, घर धरून राहणाऱ्या लोकांच्या असून त्यांच्या जीवनपद्धती व भाषा त्यांना हान लोकांपासून वांशिकदृष्ट्या अलग करतात. त्यामुळेच तिबेटी आणि अयघूर हे अल्पसंख्य म्हणून प्रशासकीय आणि अधिकृत रीतीने वेगळे करता आले; पण हाक्कांच्या बाबतीत मात्र ते झाले नाही.

आम्ही पाहिलेली हाक्कांची खेडी मोठ्या गोलाकार घरांची एकत्र वस्ती होती. फक्त लाकूड आणि चिखल यांचा वापर करून ती बांधली होती. जुन्यातले जुने दिसणारे घर तेराव्या शतकातील असावे. घराची इमारत अनेक मजल्यांची होती; त्यांचे स्वयंपाकघर आणि न्हाणीघर यांच्या खोल्या तळमजल्याला, कोठीच्या आणि वस्तू साठविण्याच्या खोल्या मधल्या मजल्यावर आणि एकदम वरच्या मजल्यावरच्या खोल्या दैनंदिन वापराच्या, अशी त्या घराची सोयिस्कर विभागणी होती. प्रत्येक घरात राहणारी माणसे एका विशिष्ट पंथाची किंवा जमातीची असत. अशा या 'जातीय' इमारतींना स्थानिक नाव 'तुलू' असे होते. मनावर एकदम छाप टाकणारी ही बांधकामे त्यांच्या भव्य आणि आसमंतातील

देखण्या निसर्गाच्या पार्श्वभूमीवर विशेषत: उठून दिसत होती.

आमची मार्गदर्शक मैत्रीण एक विशीतील मुलगी होती. या खेड्यांच्या (पुनर) संशोधनाबाबतची एक कम्युनिस्ट-राष्ट्रवादी कथा तिने सांगितली. १९६० च्या दशकात या 'तुलूंचा' पत्ता अमेरिकनांना त्यांच्या उपग्रहांमुळे लागला. चिनी कम्युनिस्टांनी ही वेगळी, चमत्कारिक वर्तुळाकार निर्माण केलेल्या बांधकामाचा वापर रॉकेटस् किंवा मिसाइल्स यांच्या प्रक्षेपणासाठी होणार अशी भीती त्यांनी व्यक्त केली होती. त्यानंतर १९८० च्या दशकात दोनही देशांमधील संशयाचे धुके विरून गेल्यावर संबंध सुधारल्यानंतर पहिला अमेरिकन हाक्का खेड्यांना भेट देण्यासाठी आला. आपण पुरातत्व विद्याविशारद आहोत असे त्याने सांगितले खरे, पण प्रत्यक्षात तो अमेरिकन हेर असावा!

या 'हाक्का' खेड्यांना भेट देण्यासाठी मुख्यत: चिनी पर्यटकांची गर्दी होते. ज्यांना वेळ व पैसा दोहोंचीही कमतरता नाही आणि माओ व त्याचे सहकारी यांनी नष्ट करण्याचा कसोशीने प्रयत्न केला तो सांस्कृतिक आणि वास्तुशिल्पाचा पारंपारिक वारसा शोधक नजरेने पाहण्यात, तो मनात जपून ठेवण्यात, त्यातील स्वारस्य वाढवण्यात सार्थकता वाटणारे चिनी येथे सतत येतात. भूतकाळाच्या या पुन:संशोधनाला सौंदर्य अभिरुची आणि राजकीय अशी परिमाणे आहेत. हाक्का ग्रामीण वसाहती फार सुरेख आहेत. त्याहीपेक्षा 'मे-फ्लावर'च्या पर्यटनाच्या पूर्वीच्या काळात ही देखणी घरे उभी राहिली याचे समाधान आणि अभिमानही चिनी नागरिकांना अनुभवायला मिळतो. काही चीनी नागरिकांच्या दृष्टीने त्यांची आर्थिक झेप ही वठलेल्या व वृद्ध झालेल्या युरोपच्याही पुढे आहे. त्यांच्याकडील टेरेकोटा सैनिकांची आणि तुलूंची मालकी ही त्या नुकत्याच जन्माला आलेल्या पोरकट अमेरिकेच्या कितीतरी पुढचे पाऊल आहे.

चीनच्या परंपरांच्या संशोधनाला उत्तेजन म्हणून एक हवेशीर, स्वच्छ आणि व्यावसायिक पद्धतीचे पर्यटक केंद्र (टूरिस्ट सेंटर) येथील टेकड्यांच्या पायाशीच तीन मोठ्या गावांच्या जवळ उभे केले गेले आहे. इथे अत्याधुनिक प्रवासी गाड्या उभ्या होत्या आणि त्यांच्याबरोबर त्यांचे तरुण तरतरीत गाइडस् होते. इथेच एक सुरेख टुमदार रेस्टॉरंट होते आणि बांधकाम चालू असलेले एक हॉटेल होते. या सर्वांच्या बाजूला एक लुटुपुटूचे हाक्का ग्राम होते - गोलाकारच पण लाकडाऐवजी बांधकामासाठी काँक्रीटचा वापर केला होता.

त्या पर्यटन केंद्रात मी गेलो असताना मला एक पत्रक देण्यात आले. त्यातला सर्व मजकूर चिनी लिपीत होता, पण त्यात अलंकारिक इंग्रजीमध्ये एक परिच्छेद होता. आम्ही जी खेडी किंवा गावे पाहायला आलो होतो. त्यांमध्ये 'सर्वात मोठी, सर्वात उंच, सर्वात जुनी आणि वैशिष्ट्यपूर्ण रचना असलेली तुलू येथे आहे अशी ग्वाही दिली होती. त्या पत्रकात पुढे म्हटले होते.

''एका प्रख्यात जपानी वास्तुशास्त्रज्ञाने हे 'तुलू' म्हणजे आकाशातील अज्ञात तबकड्या जमिनीवर उतरून मशरूमप्रमाणे रुजल्यासारख्या वाटतात,' असा अभिप्राय दिला आहे. स्टीव्हन्स या युनेस्कोमधील एका अधिकाऱ्याने, 'तुलू' हा जगातील एकमेव गूढ ग्रामीण गृहरचनेचा नमुना आहे' असे म्हटले आहे. 'तुलूं'ची निर्मिती झाली, त्या आधीच्या परिस्थितीचे संशोधन करण्यासाठी आलेले एक अमेरिकन तज्ज्ञ 'तुलू'ची रचना पाहून म्हणाले की, तुलू हे निसर्गाशी सुसंवादी असे समू घर (फोक हाऊस) बनू शकेल. लू झेवान हे चिनी सरकारच्या 'स्टेट ब्यूरो ऑफ कल्चरल रेलिक्स' या संस्थेचे अधिकारी आणि प्राचीन सांस्कृतिक अवशेष जपणारे वास्तुशिल्प तज्ज्ञ म्हणाले, ''दिसायला सारखे असले, तरी प्रत्येक 'तुलूं'ची स्वत:ची अशी एक रचना शैली आहे. खरोखरच जागतिक वास्तुशिल्पाच्या इतिहासात 'तुलू' हे एक आश्चर्यच होते.''

शिफारस पत्रांचा हा संच फक्त एक योगायोग होता असे नाही. जपानमधील तज्ज्ञांकडून मिळालेले शिफारसपत्र जरी तांत्रिकदृष्ट्या आशियातील सर्वांत प्रगत देशाने दिलेले मानले, तरी त्यांची सांस्कृतिक सभ्यता सर्वोच्च दर्जाची आहे हे लक्षात घ्यावे लागेल. अमेरिकेतील तज्ज्ञांचे शिफारसपत्र. म्हणजे पश्चिमेकडील जपान इतक्याच तांत्रिकदृष्ट्या प्रगत देशाकडून मिळालेले शिफारसपत्र, तिसरे युनायटेड नेशन्सच्या अधिकाऱ्याकडून मिळालेले; चौथे शिफारसपत्र देणारे गृहस्थ बीजींगमधलेच एक विद्वान नागरिक. बीजींग केवळ चीनची राजधानीच नाही; तर राजकारण, संस्कृती आणि बौद्धिक जीवन यांचे केंद्र आहे.

केंद्रावरील बसमधून आम्ही 'हाक्का' व्हिलेजच्या परिसरात पोहोचलो. आम्ही तेथे काय काय पहावयाचे आहे, याची पूर्वसूचना देऊन मग आम्हाला मोकळेपणाने फिरण्याची परवानगी त्या गाईडस्नी दिली. एकटेच फिरत असताना आम्ही, ताज्या सेलरीचे देठ तोडून जमवलेली भाजी धुवून लाकडी जिन्याच्या पायऱ्यांवर मांडलेली पाहिली. पोर्क (डुकराचे मांस) शिजवताना या देठांचा खास उपयोग करतात. जवळच ताज्या-ताज्या रसदार मुळ्यांना (रॅडिश) धुवून स्वच्छ करण्याचे काम चालू होते. जवळच्याच शेतात

रताळ्याची लागवड करण्याचे काम चालू होते. त्याबरोबर चहाची झुडपंही दिसत होती. रहिवाशांत मात्र स्त्रिया, लहान मुले आणि म्हातारी माणसे एवढीच दिसत होती. तरुण मंडळी अनुपस्थित होती. ती बहुधा शहरांत अगर मोठ्या गावांमध्ये कामासाठी अगर शिक्षणासाठी गेली असावीत किंवा त्यांना देशाच्या एकंदर प्रगतीमुळे मिळालेल्या थोड्याफार स्वातंत्र्याचा लाभ घेत असावीत.

तुलूंच्या भोवती आणि आजूबाजूला फेऱ्या मारताना आम्हाला एक विसंगत गोष्ट आढळली. माझ्या बरोबरचा जर्मन सहकारी चिनी भाषेचाही जाणकार होता. त्याने मला सांस्कृतिक क्रांतीच्या काळातील एक पुसट झालेली घोषणा दाखवली. एका तुलूच्या मुख्य प्रवेशद्वाराच्या कमानीवर मोठ्या अक्षरात लिहिले होते, 'चेअरमन माओ चिरायु होवोत.' माझ्या सहकाऱ्याने स्पष्टीकरण करीत सांगितले, 'चेअरमन माओंच्या तत्त्वांवर विश्वास व्यक्त करण्यासाठी आणि त्यांच्याशी असलेल्या निष्ठेचे प्रदर्शन म्हणून ही घोषणा लिहिली गेली आहे; म्हणजे या गावांचे संरक्षण आपोआप होईल.'

या तुलूच्या आत-बाहेर फिरून आम्ही वर डोंगरावर गेलो. बाजूलाच एक सुंदर झरा झुळझुळत होता. त्याचे पाणी अगदी स्वच्छ, प्रदूषणरहीत वाटत होते. पुढे एक देऊळ होते. खूप सुंदर आणि पारंपरिक पूजा-प्रार्थना पद्धती व बौद्धांची उपासनापद्धती यांचा समन्वय दाखवणारे. छोटेसेच पण कलात्मक अभिरुचीयुक्त असे ते बांधकाम होते. झऱ्याच्या शेजारीच असलेले त्याचे स्थान आणि खाली हिरव्यागार पानांनी डवरलेली पवित्र राई. देवळाच्या प्रवेशद्वाराशी कमानीखाली अनेक देव आणि पऱ्या यांच्यामध्ये माझ्या जागरूक मित्राने एक पुरुष व एक स्त्री रेड गार्डस् हेरले. दोघांच्याही आकृती लाकडामध्ये कोरल्या होत्या, अंगावरील गणवेशांसह कमानीच्या एका बाजूला स्त्री सैनिक आणि दुसऱ्या बाजूला पुरुष. हाक्कांनी ही रचना आधीच विचारपूर्वक करून रेड गार्डस्च्या क्रांतीमधील विध्वंसक प्रवृत्तींपासून स्वत:चा जणू बचाव केला होता.

– ७ –

१९५० ते १९८० या तीस वर्षांच्या काळात चिनी अभ्यासकांचा, विद्वानांचा बाहेरील जगाशी फारसा संबंध नव्हता. नंतरही, परस्पर परिचयाची प्रक्रियाही अगदी संथ होती. फेई शिओतोंग हे सांस्कृतिक क्रांतीपूर्व काळात पाश्चिमात्त्यांना चांगलेच परिचित होते. क्रांतीची हवा निवळली आणि वातावरण सुधारले, तेव्हा त्यांना पुन्हा पश्चिमेकडील राष्ट्रांचे बोलावणे आले. थोडे अप्रसिद्ध राहिलेल्या अभ्यासकांना वाट पहावी लागत होती. १९८९ मध्ये तिआनानमेन चौकाचे प्रकरण झाले आणि चीनच्या खुलेपणास बाधा आली. अखेर गेल्या दशकात पाश्चिमात्य जगाला चिनी बुद्धिवंतांची थोडीफार ओळख झाली.

तरीसुद्धा पाश्चिमात्यांनी उचललेले ज्ञान बरेच निवडक होते. काही चिनी बुद्धिवंतांनी (जे बीजींगमध्ये राहत होते,) आपले लिखाण इंग्रजीत भाषांतरीत किंवा संकलित केलेले होते. त्यांमध्ये नवमार्क्सवादी वाँग हुआी, नव कन्फ्युशियन चेन लाय व सुधारणावादी यू केपिंग यांचा समावेश आहे. पण हे तीनही बुद्धिवादी 'चीनचा विचार काय आहे?' अशा प्रकारचे मथळे आपल्या लिखाणाला देऊन चीनच्या बौद्धिक विचारधारेतील विविधतेचे एवढ्याच प्रमाणात प्रतिनिधित्व करतात, जेवढे भारतीय विचारधारांतील विविधतेचे प्रतिनिधित्व स्थानिक भारतीय, माओचे समर्थक, खुल्या बाजारपेठांचे समर्थन करणारा सुधारणावादी असे सर्व दिल्लीमध्ये बसून करू शकतील!

मी ज्या परिषदेला चीनमध्ये उपस्थित होतो, ती अधिक प्रातिनिधिक होती. देशाच्या सर्व भागांतून आलेले अभ्यासक त्या परिषदेला उपस्थित होते. तीस-पस्तीस ते जवळजवळ सत्तर अशी त्यांची वयोमर्यादा होती. काहीजण विद्यापीठांत महत्त्वाच्या पदांवर होते. काही पक्षकार्याशी संबंधित, तर काही मुक्त पत्रकार-लेखक. ते अनुभवावर आधारित बोलत होते, पुस्तकी ज्ञानावरून नव्हे. त्यांच्यात चर्चा चालू होती, मी- एकमेव भारतीय फक्त न बोलता शांत बसलो होतो. माझ्याबरोबरचे जर्मनही तसेच होते. आमची उपस्थिती किरकोळ, अनपेक्षित आणि निरुपद्रवी अशी वाटत असावी. कारण आम्ही अमेरिकन नव्हतो, तसे जपानीही नव्हतो! खरे तर आमच्याकडे दुर्लक्ष केल्यामुळे ते सर्व चिनी अभ्यासक एकमेकांशी अत्यंत मोकळेपणाने आणि मनापासून बोलू शकत होते.

माझ्या या असाधारण, खास अनुभवातून मी काय निष्कर्ष काढू शकतो? पहिली गोष्ट अशी की, हे सर्व अभ्यासक विद्वान आणि एनजीओ कार्यकर्ते यांच्या अंत:करणातील सखोल, विवेकी देशभक्तीचे दर्शन मला घडले. चीनमधील एकूणच स्पर्धात्मक देशप्रेमाच्या वारंवार होणाऱ्या प्रदर्शनापेक्षा मला त्यांची अभिव्यक्ती फार वेगळी वाटली. चीनमधील मध्यमवर्ग आणि कम्युनिस्ट पक्ष यांना सांस्कृतिक विविधता आणि भूगोल यांची चर्चा करण्यापेक्षा इतिहासाचा

सखोल आधार घेऊन वेगवेगळ्या घोषणा आणि दावे करीत राहणे सोयीचे वाटते. म्हणूनच तिबेटी स्वायत्तता आणि दलाई लामांबद्दलचा अपप्रचार या गोष्टी वेडसरपणाच्या अत्युच्च पातळीवरून केलेल्या आढळतात. तथापि, फूझौ येथे भेटलेल्या लोकांची राष्ट्रनिष्ठा व कळकळ ही संशयातीत होती. त्यांना देशी एकत्र ठेवण्यासाठी 'हान' राष्ट्रवादाचे वर्चस्व वाढविण्याची आणि त्यानुसार त्यांच्या देशाचे एकत्रीकरण करणाऱ्या पद्धती यांची काही गरज नाही; अल्पसंख्यांचे जमीन, त्यांच्या संस्कृती आणि थोड्या प्रमाणात का होईनात, त्यांच्या भाषा यांच्यावरील त्यांच्या हक्कांचे रक्षण करूनसुद्धा राष्ट्रीय ऐक्य जराही धक्का न लावता चांगल्या प्रकारे सांभाळता येईल, अशी या अभ्यासकांची भूमिका होती.

अल्पसंख्यांच्या हक्कांबद्दल वाढत चाललेल्या या संवेदनशीलतेला पर्यावरण रक्षणाबद्दलच्या वाढत्या जागरूकतेची जोड मिळाली आहे, याचेही प्रत्यंतर त्या परिषदेमध्ये आले. एका वक्त्याने 'पर्यावरण-संस्कृती' (इको-सिव्हिलायझेशन)च्या निर्मितीची तातडीची आवश्यकता व्यक्त केली. दुसऱ्या एका वक्त्याने बेलगाम बाजारपेठेच्या विकासातून मानवी प्रतिष्ठा, पर्यावरण आणि नैतिक मूल्ये यांचा प्रचंड ऱ्हास होत असल्याबद्दल खंत व्यक्त केली. 'सांस्कृतिक क्रांतीमध्ये झालेल्या नुकसानीपेक्षा अधिक उद्ध्वस्तता बाजारपेठेच्या अतिरेकामुळे आली आहे,' असे उद्‌गार त्यांनी काढले.

चीनमधील बुद्धिवंतांच्या या देशप्रेमात 'हान' वर्चस्वाची तरफदारी किंवा केंद्र सरकारच्या धोरणांच्या समर्थनाचा हेतू नव्हता. एका वक्त्याने २०१० च्या यूशू येथील भूकंपानंतरच्या परिस्थितीचे वर्णन करताना सांगितले की, त्या घटनेमध्ये केलेले बचावकार्य आणि पुनर्वसन यांचे सर्व श्रेय लष्कराने घेतले. स्थानिक जनतेने, काही ठिकाणी तर देवभोळ्या आणि कर्म आचाराच्या व्यक्तींनीही या कामात भाग घेऊन खूप सहाय्य केले. तरीही त्यांची नावेही पुढे येऊ न देता चिनी सरकार व लष्कर यांनीच या आपत्ती निवारणाचे सर्व श्रेय स्वत:कडेच घेतले.

चीनमध्ये अद्यापही औपचारिकपणे हुकूमशाही राजवट चालू आहे, असे म्हणावे लागेल. त्यांची राजकीय संस्कृती भारतासारखी किंवा अमेरिकेसारखी मुक्त नाही. पण ती पूर्वीपेक्षा अधिक सच्छिद्र आणि साधारणपणे समजली जाते, त्यापेक्षा चर्चेसाठी अधिक सुलभ व सहिष्णु झालेली आहे. परिषदेत उत्तरदायित्व (अकौंटेबिलीटी), पारदर्शकता (ट्रान्स्फरन्सी) अशा शब्दांचा वापर वरचेवर होत होता; त्यामुळे भारतीयांप्रमाणेच चिनी बुद्धिवंत आणि विचारवंतांकडून तशा प्रकारच्या वैचारिक स्वातंत्र्याच्या थोड्याफार अपेक्षा व्यक्त केल्या जात असणार, या तर्काला पुष्टी मिळते.

– ८ –

परिषदेच्या आधी आयोजित केलेल्या एका जेवणाच्या वेळी प्रा.लाइ हेरॉंग माझ्यासोबत होते, त्यावेळी त्यांनी भारतात घालविलेल्या काही दिवसांच्या आठवणी मला सांगितल्या. ते म्हणाले, 'तुम्ही एकूण संरचनेत (इन्फ्रास्ट्रक्चर) आमच्या मागे असाल, पण आम्ही तुमच्याकडून मोकळेपणा आणि अभिव्यक्ती स्वातंत्र्य (फ्रीडम ऑफ एक्स्प्रेशन) यांच्या बाबतीत मार्गदर्शन मिळवू शकतो.' त्याच मनस्थितीत त्यांनी मला (मी बीजींगला जाईन) तेव्हा त्यांच्या संस्थेत व्याख्यानासाठी आमंत्रण दिले.

मीही तसेच केले. त्या ठिकाणी मी दिलेल्या व्याख्यानामध्ये माझे लक्ष मी भारताच्या राष्ट्रबांधणीवर केंद्रित केले होते, आणि चीनशी असलेली विसंगती केवळ सूचित केली होती. त्यानंतर झालेल्या चर्चेत भारताचे ऐक्य आणि अभंग राहण्याची ताकद यांच्या मुळाशी असलेल्या भाषिक बुद्धिमत्तेचा उल्लेख मी केला होता, तो स्वीकारण्याची मानसिकता फारशी दिसली नाही. एक तरुण अभ्यासक म्हणाले, 'अनेक प्रकारच्या भाषा ही राष्ट्राच्या भक्कमपणाला बाधा आणणारी गोष्ट आहे.'

'जर एखाद्या अल्पसंख्य गटाचा त्यांच्या मातृभाषेत बोलण्याचाच आग्रह असेल, तर देशाला त्यासाठी एका विशेष भाषेला प्रोत्साहन देऊन ती वेगवेगळ्या प्रदेशांना जोडण्यासाठी आणि आर्थिक उत्कर्ष व व्यावसायिक प्रगती यांच्यासाठी एक वाहन म्हणून वापरावी लागेल.' असे दुसऱ्या एका वक्त्याचे मत होते.

'भारतात आर्थिक उत्कर्षाची संधी मिळवून देणारी एक तरी भाषा अस्तित्वात आहे काय?' या त्यांच्या प्रश्नाला उत्तर देताना मी सांगितले, ''इंग्रजी भाषेवरील माझे प्रभुत्व मी यशस्वी बुद्धिवादी होण्यास कारणीभूत आहे. पण आता मला राजकारण प्रवेश करायचा असेल, तर ते निरुपयोगीच ठरणार आहे. त्या क्षेत्रात मला हिंदी भाषाज्ञानाचे साहाय्य होईलच, तरीही माझ्या राज्यात दुसऱ्या एका भाषेचे प्राबल्य व्यवहारात असेल तर मला तीही भाषा शिकून घ्यावी लागेल. फक्त इंग्रजी किंवा हिंदीवरील प्रभुत्वामुळे तुमचे आर्थिक किंवा राजकीय यश निश्चित होत नाही. दुसरे उदाहरण द्यायचे तर

एखाद्याला हिऱ्याच्या व्यापारात यश मिळवायचे असेल, तर त्याला गुजराती भाषेचे थोडेफार ज्ञान तरी आवश्यकच आहे.''

ही सर्व चर्चा बीजींगमध्ये चाललेली होती. या ठिकाणी राजकीय आणि बौद्धिक वातावरण बहुविधतेच्या प्रसरणाला थोडे विसंगतच होते. म्हणून मला असे ऐकावे लागले, की भाषा भिन्नतेमुळेच प्रशासकीय कार्यक्षमतेला बाधा येते. 'भारतात सर्व सरकारी पत्रके (नोटांवर छापलेल्या) सतरा भाषांत छापली जातात की नाही?' या त्यांच्या प्रश्नाला उत्तर देताना मी सांगितले, ''सरकारच्या कामकाजाची अधिकृत पत्रके फक्त त्या राज्यातील भाषेतच छापली जातात. जर ते पत्र केंद्र सरकारच्या कचेरीतून आले असेल तर मात्र ते दोन भाषांत- (हिंदी व इंग्लिश) छापलेले असेल.

त्यांच्या सहकाऱ्यांचा नसला तरी प्रा.लाइ यांचा माझ्या निवेदनावर विश्वास बसला. भारत आणि त्याच्या शेजारी राष्ट्रांमधील परिस्थितीबद्दल बोलताना मी त्यांना सांगितले, की पाकिस्तानचे दोन भाग झाले आणि सिलोनमध्ये यादवी युद्धाने देश घायाळ झाला आहे, याचे कारण दोनही राष्ट्रांत सरकार आणि राजकीय उच्चभ्रू मंडळी यांनी एकाच भाषेचा आग्रह धरला हे आहे. त्याचा परिणाम देशातील दोन भाषिक गटांतील संघर्षात झाला. माझे हे 'भाषिक' विवरण ऐकून प्रा.लाइ एकदम गंभीर झालेले दिसले. नंतर ते मला जेवणासाठी बरोबर घेऊन गेले. तिथे मला शेवटचे चिनी आश्चर्य भेटले- संपूर्ण शाकाहारी भोजन आणि त्यातील विविधता! प्रा.लाइ आणि मी एक आठवडा बरोबर होतो- दक्षिण चीनमध्ये आणि राजधानीतही. निरोप घेताना ते मला म्हणाले, ''भारत जर आर्थिक बाबतीत इतका मागासलेला नसता तर या देशाने लोकशाही आणि विविधता यांची सांगड किती कुशलपणे घातली आहे, याबाबत त्याने जगाला चांगले मार्गदर्शन केले असते.''

बंगलोरमध्ये परत आल्यावर माझे अनुभव पडताळून पाहण्यासाठी ज्या चिनी विचारवंताचे नाव मी प्रथम ऐकले होते, त्या फेई शिओतोंग यांच्या 'टोवर्डस् अ पीपल्स ॲन्थ्रॉपॉलॉजी' या पुस्तकाचा शोध सुरू केला. पण मला ते सापडले नाही. १९८५ मध्ये कोलकाता सोडल्यानंतर मी जे अनेक मुक्काम केले, त्यात ते कुठेतरी गहाळ झाले. मग मी ते नेटवर शोधायला सुरुवात केली, त्यात मला पुस्तकाच्या शीर्षकाच्या नावाचा एक निबंध सापडला. त्याचे मूळ फेई शिओतोंग यांनी डेन्व्हरमध्ये 'मॉलिनोव्हस्की लेक्चर्स' जानेवारी १९८० मध्ये दिली होती, त्यात सापडले.

फेईंनी आपल्या व्याख्यानाची सुरुवात अतिशय हळुवारपणाने केली होती. आयुष्यातील अनपेक्षित वळणे, ज्यामुळे त्यांना अनेक दशके युद्ध साहित्याच्या (ॲकॅडेमिक) विश्वात राहावे लागले, त्यांचा उल्लेख त्यांनी केला होता. त्यातून मुक्त होऊन फिरण्याची संधी मिळाल्यावर ते पश्चिमेकडे म्हणजे अमेरिकेत संवादासाठी आले होते, 'साचलेला गाळ काढून टाकून वैचारिक प्रवाहांचा मार्ग मोकळा करून आपली भावी ॲकॅडेमिक (युद्ध साहित्य विषयक) देवाण-घेवाण सुलभ करणे' हा उद्देश त्यांनी सांगितला. फेईंनी नंतर त्यांच्या अल्पसंख्य जमातींविषयक चीनमध्ये केलेल्या संशोधनाची माहिती दिली. अल्पसंख्यांना सुद्धा प्रगतीचा अधिकार आहे; पण त्यासाठी त्यांनी स्वत: पुढाकार घेऊन योजना उभ्या करून त्या साकार कराव्यात, असा फेईंचा उद्देश आहे. पण हे सोपे नाही. कारण त्यांच्या लोकांमध्ये जाऊन केलेल्या संशोधनात, काही अल्पसंख्यांना 'हान' या बहुसंख्य जमातीने वर्णभेद उभे करून ज्या जखमा केल्या आहेत, त्यांतून ते अद्याप सावरलेले नाहीत, असे दिसले. फेई शिओतोंग या पुरातत्त्ववेत्त्यांना आता ही पूर्ण खात्री पटली होती की चीन हा एक बहुराष्ट्रीय देशच होता, ज्यामध्ये प्रत्येक राष्ट्रीय एकक हे स्वत:ची लेखी किंवा तोंडी भाषा स्वत:ची भाषा म्हणून वापरण्यास स्वतंत्र होते आणि त्या राष्ट्राच्या प्रथा, परंपरा आणि धार्मिक श्रद्धा या त्यांना आदरणीयच होत्या.

चीन हा आजही एका पक्षाच्या नियंत्रणाखाली आहे. राजकीय बहुविधतेचा तर प्रश्नच नाही. तरीही सांस्कृतिक हक्कांच्या संबंधात 'हान' वर्चस्व कमी करण्याचा प्रयत्न सावधपणे होत आहे. भर तारुण्यात छळवाद सोसून वृद्ध म्हणून 'माफी' मिळून सुटलेला फेई हा सुजाण पुरातत्त्ववेत्ता आज नाव मिळवून अनेक चिनी अनुयायांचा नेता बनला आहे. देशाच्या कायद्यांच्या चौकटीत मिळेल ती जागा अडवून तो आपल्या विचारांचा प्रसार अत्यंत जिद्दीने करीत राहिला आहे.

(अनुवाद : कुमुद करकरे)

रामचंद्र गुहा

# सौजन्यमूर्ती : कृष्णराज आणि ई.पी.डब्ल्यू




**रामचंद्र गुहा यांचे** 'Patriots and Partisans' **हे पुस्तक पेंग्विन ॲलन लेन प्रकाशन संस्थेकडून अलीकडेच प्रकाशित झाले आहे या पुस्तकात** The Gentle Colossus ; Krishna Raj and the EPW **या शीर्षकाचा दीर्घ लेख आहे. कृष्णराज आणि ईपीडब्ल्यू यांचे नाते ३५ वर्षांचे होते. हा लेख वाचणाऱ्यांनी 'मराठी'पुरता विचार केला तर 'यदुनाथ थत्ते आणि साधना' अशी जोडी त्यांच्यासमोर येईल. 'साधना'च्या ६५ वर्षांच्या काळातील ३० वर्षे यदुनाथजी संपादक होते. साधनाची ओळख ठळक करण्यात त्यांचा सर्वांत मोठा सहभाग राहिला आहे. आता हा लेख पुनर्मुद्रित करण्यामागे तीन कारणे आहेत. एक- पुढील आठवड्यात (१० मे) यदुनाथांचा स्मृतिदिन आहे, दुसरे- या आठवड्यात (२३ एप्रिल) जागतिक वाचकदिन आहे आणि तिसरे- साधनाचे स्तंभलेखक असलेल्या रामचंद्र गुहा यांचे नवे पुस्तक प्रकाशित झाले आहे.**

एक वैचारिक नियतकालिक एकाधिकार वृत्तीने चालवले नाही, तर ते अस्तित्वातच राहणार नाही. त्यातील आवश्यक मजकूर निवडण्याची अंतिम जबाबदारी ही एका आणि फक्त एकाच व्यक्तीच्या हाती असायला हवी.

*– एच. एल. मेन्केन*

ब्रिटिश इतिहासकार इ.पी.थॉम्पसन यांनी एकदा असे म्हटले होते की, ''भारत हा आज महत्त्वाचा देश नाही; पण जगाच्या भवितव्यासाठी तो कदाचित सर्वांत महत्त्वाचा ठरू शकेल. हा असा देश आहे, जो कोणाच्याही मेहेरबानीवर जगत नाही. जगावर प्रभाव टाकणारे सर्व विचारप्रवाह या देशातून वाहतात; हिंदू, मुस्लिम, ख्रिश्चन, निधर्मी, स्टॅलिनवादी, उदारमतवादी, माओवादी, लोकशाही समाजवादी, गांधीवादी... जगात असा एकही विचार नाही, जो पश्चिम किंवा पूर्वेकडील देशात आहे आणि भारतातल्या कोणत्याही समूहात कार्यरत नाही.''

ही प्रतिक्रिया वाचून मला असे वाटले, की थॉम्पसन बहुतेक मुंबईत प्रसिद्ध होणारे 'इकॉनॉमिक ॲण्ड पोलिटिकल वीकली' (ईपीडब्ल्यू) नियमितपणे वाचत असावा; कारण त्यामध्येच अशा प्रकारच्या विचारांच्या प्रभावांची मांदियाळी अनुभवाला येते. माहितीने समृद्ध आणि वेगवेगळ्या विषयांवर आणि प्रकट झालेल्या मतांवर चमकदार टीकेने भरलेली या साप्ताहिकाची पाने भारतीयांच्या आयुष्याची सूची आहे असे म्हणता येईल. अर्थव्यवस्था, जातींचे राजकारण, धार्मिक हिंसा आणि मानवी हक्क यांसारख्या विविध व महत्त्वाच्या विषयांवर 'ईपीडब्ल्यू'ने अत्यंत अधिकृत, मर्मभेदी आणि तपशीलवार वृत्तांत व विश्लेषण असलेले लेखन प्रसिद्ध केले आहे. या नियतकालिकाला केवळ अभ्यासक आणि पत्रकार यांचेच लेखन मिळते असे नाही; तर वेगवेगळ्या क्षेत्रांतील कार्यकर्ते, प्रशासकीय अधिकारी आणि काही राजकारणीही या नियतकालिकाच्या लेखकसूचीमध्ये आहेत.

जगातल्या अन्य काही नियतकालिकांप्रमाणेच 'ईपीडब्ल्यू'चा आपल्या वर्गणीदार संख्येच्या व्यस्त प्रमाणात (म्हणजे फारच मोठ्या प्रमाणात) वाचकांवर प्रभाव आहे. भारतामधील बौद्धिक चर्चेला या साप्ताहिकाने आकार देऊन इतक्या वरच्या पातळीवर नेले आहे, की ध्येयधोरणविषयक विचारांवर तिचा फार मोठा प्रभाव पडतो. म्हणूनच 'ईपीडब्ल्यू' हा न्यूयॉर्कमधील 'नेशन' या प्रख्यात साप्ताहिकाचा भारतीय अवतार आहे असे आपण समजायचे काय? दोहोंमध्ये तसे अनेक गोष्टींत साधर्म्य दिसते. पहिली बाब अशी, की दोहोंचेही बाह्यरूप ओबडधोबड आहे. 'नेशन'बाबत कॅल्व्हिन ट्रिलिनने अशी टिप्पणी केलेली आहे की 'नेशन हे बहुधा देशातील असे एकच नियतकालिक असावे, ज्याची झेरॉक्स काढली तर मूळ नियतकालिकापेक्षा झेरॉक्स प्रत अधिक देखणी असेल!' त्यातील आशयाबद्दल अधिक नेमकेपणाने बोलायचे तर तत्त्वज्ञान किंवा उद्दिष्टांबद्दलच्या त्यांच्या घोषणा सारख्याच आहेत. म्हणजे 'नेशन'चे भूतपूर्व संपादक व्हिक्टर नावास्की यांच्या शब्दांत सांगायचे तर 'पारंपरिक सुज्ञपणास प्रश्न विचारणे, सनातन विचारांबाबत संशय निर्माण करणे, विविध प्रकारच्या मतभेदांना आणि ते मांडणाऱ्यांना आश्रय देणे, त्यांच्याबद्दल विशेष संवेदनशील बनणे आणि हे सर्व करताना अधिक चांगल्या जगाचे स्वप्न पाहणे.'

वृत्तलेख प्रसिद्ध करणारी नियतकालिके ही अनुभवी पत्रकार आणि पूर्णवेळ वार्ताहर यांच्यामार्फत चालविली जातात. तर वैचारिक जडणघडण करणारे लेख प्रसिद्ध करणाऱ्या नियतकालिकांकडे स्वतंत्रपणे लेखन करणारे लेखक आणि विद्यापीठांतील अभ्यासक-प्राध्यापक यांचे साहित्य येत असते. ख्रिस्तोफर लॅश या इतिहासकाराने नमूद केल्याप्रमाणे टेलिव्हिजनच्या उदयानंतर आणि प्रसारमाध्यमांच्या थैमानानंतर अशा प्रकारची नियतकालिके हीच अभ्यासू आणि विद्वान मंडळींना एकमेकांशी संपर्क साधण्याची माध्यमे राहिली आहेत. बुद्धिवादी मंडळींना एकत्र आणून त्यांच्यामध्ये शिल्लक असलेली थोडीफार एकजूट आणि एकात्मता दृढ करण्याचे काम ही नियतकालिके करीत आहेत. 'नेशन' नियतकालिकाबाबत हे जेवढे खरे आहे तेवढेच, किंबहुना त्यापेक्षा अधिक 'ईपीडब्ल्यू'बाबत खरे आहे.

नफा मिळवणारी गुळगुळीत कागदावरील आकर्षक नियतकालिके आणि विचारप्रसार करणारी निवडक वाचकांसाठी चालविली जात असलेली साधी व अनाकर्षक दिसणारी नियतकालिके यांच्यात आणखी एक मोठा फरक आहे. ड्राइट मॅक्डोनाल्ड या समीक्षकाच्या मते, मोठ्या व व्यावसायिक नियतकालिकांपेक्षा ही विचारप्रसार करणारी नियतकालिके अधिक आतुरतेने वाचली जातात; कारण त्यातील व्यक्तिगत प्रकटीकरण हे समविचारी लोकांना उत्कट आवाहन करीत असते. ही नियतकालिके त्यांचा जनमतावर किती परिणाम होतो यावरून ओळखली जात नाहीत, तर त्यांचा शासनाच्या ध्येयधोरणावरील प्रभाव, सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नांवरील वाद-संवाद आणि वाचकांचे प्रेम व निष्ठा यावरून ओळखली जातात.

'ईपीडब्ल्यू'ची तुलना ढोबळमानाने न्यूयॉर्कमधील 'नेशन' किंवा लंडनच्या 'न्यू स्टेटस्मन'शी करता येईल; पण खोलवर विचार केला तर 'ईपीडब्ल्यू'चे पारडे जड झालेले दिसेल. पहिली गोष्ट म्हणजे कोणत्याही राजकीय पक्षाशी या नियतकालिकाने बांधिलकी ठेवलेली नाही. (अमेरिकेतील 'नेशन'चे वाचक डेमोक्रॅटस् आहेत आणि ब्रिटनमधील 'न्यू स्टेटस्मन' हे लेबर पक्षाकडे झुकले आहे असे मानले जाते). दुसरी गोष्ट म्हणजे 'ईपीडब्ल्यू'चा पालक कोणी धनवान नाही. तुटपुंज्या निधीवर आणि वर्गणीदारांच्या पाठिंब्यावर चाललेले हे साप्ताहिक आहे. पण तिसरा विशेष फरकाचा मुद्दा म्हणजे त्याचा बौद्धिक भारदस्तपणा. 'ईपीडब्ल्यू'मध्ये भारतातील जगदीश भगवती, कृष्ण भारद्वाज, आन्द्रे बेतेल, अमर्त्य सेन, एम.एन. श्रीनिवास आणि इतर अनेक विद्वानांचे अतिउत्कृष्ट लेख प्रसिद्ध झाले आहेत आणि आजही होत आहेत. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे इपीडब्ल्यूचा दर्जा व प्रभाव पन्नास वर्षांपेक्षा अधिक काळ टिकून आहे.

'ईपीडब्ल्यू'च्या अंकात राजकीय पूर्वग्रह, नि:पक्ष वृत्तांतकथन आणि बौद्धिक कसोट्या लावून केलेले मार्मिक पृथक्करण या तिन्हींचा अनोखा संगम आढळतो. अंकाची सुरुवात मागील काही दिवसांच्या घटनांवर जाणीवपूर्वक दिलेल्या प्रतिक्रिया आणि त्यावरील टिकाटिप्पणी यांनी होते. हे लेखन निनावी असते. साप्ताहिकाचा दुसरा भाग देशभरातून मिळवलेल्या (वृत्तसंकलकांच्या नावासहित) बातम्यांनी भरलेला असतो. या वृत्तांताच्या सावध वाचनाने आपण 'बातम्यांमागील बातम्या' समजावून घेऊ शकतो. उदाहरणार्थ, बिहारमधील जमीनदार आणि शेतमजूर यांच्यामधील संघर्षाच्या कथा, ईशान्य भारतातील फुटीर हालचाली इत्यादी. सर्वसाधारणपणे हे वृत्तांत दैनिक वृत्तपत्रांच्या क्षमतेपेक्षा मोठे आणि अधिक माहितीपूर्णही असतात. अंकाच्या शेवटच्या भागात अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या काही पुस्तकांची परीक्षणे आणि दोन-तीन अभ्यासपूर्ण माहिती लेख (साधेपणाने लिहिलेले व भरपूर तळटीपा असलेले) वाचकांसाठी पुरवलेले असतात.

बाह्यस्वरूपाने नाही तर आतील मजकुरामुळे महत्त्व प्राप्त झालेल्या 'ईपीडब्ल्यू'ने एक विशेष विक्रम केलेला आहे. या नियतकालिकाच्या मुखपृष्ठाइतके सपक मुखपृष्ठ मी इतर कोणत्याही नियतकालिकाचे पाहिलेले नाही. पांढऱ्या पार्श्वभूमीवर काळी अक्षरे, डाव्या कोपऱ्यात टाकायचा म्हणून टाकलेला केविलवाणा तिरका लाल पट्टा. आतला मजकूर : नाइन पॉईंट आकारातील अक्षरांत, पानात साठ ओळींत गच्च भरलेला व रकाने असूनही वाचण्यास कठीण झालेला! आता अलीकडेच साप्ताहिकाची पुनर्रचना झाली असे ऐकले, पण नवा अवतारही बहुतांशी जुन्यासारखाच आहे. अक्षरांचा टाइप लहान, कागद आणखीच जुनाट दिसणारा, मुखपृष्ठाचे रूप अद्यापही चिंताजनकच, पण आत छापला गेलेला मजकूर मात्र अन्प्रेडिक्टेबल आणि विविधतापूर्ण; अगदी पूर्वीसारखाच!

०

१९४९ मध्ये 'ईपीडब्ल्यू'ची सुरुवात 'इकॉनॉमिक वीकली' या नावाने झाली. एका प्रतिभावान बंगाली कुटुंबातील सचिन चौधरी या व्यक्तीने या नियतकालिकाची सुरुवात केली. त्यांचा एक भाऊ यशस्वी चित्रपटनिर्माता होता; तर दुसरा एक विख्यात शिल्पकार होता. सचिन चौधरी यांनी प्रथम राष्ट्रीय चळवळीतील कार्यकर्ता, नंतर हिमालयातील एक साधक, अर्थशास्त्रातील पीएच.डी.चा विद्यार्थी आणि मार्केट रिसर्च असे अनेक उद्योग केले होते. कधी काळी त्यांनी 'बॉंबे टॉकीज' या आद्य फिल्म कंपनीत जनरल मॅनेजर म्हणूनही काम केले होते.

सचिन चौधरींनी साप्ताहिक सुरू करण्याचा निर्णय घेतला तेव्हा त्यांना आपल्या आधीच्या अनुभवांचाही उपयोग झाला. भारत नुकताच स्वतंत्र झाला होता, त्यामुळे नवीन साप्ताहिक सुरू करण्यास ती योग्य वेळ होती. त्यामुळे नव्या राष्ट्राची घडण कशी असावी याबाबत देशात चाललेल्या बौद्धिक चर्चेचे हे साप्ताहिक

एक केंद्र बनले. त्या वेळेच्या गरजा लक्षात घेता, त्या साप्ताहिकातील बऱ्याचशा चर्चा आर्थिक नियोजन आणि विकास या विषयांवर असत. पण धूसर शास्त्रीय अंदाजांपलीकडे जाऊन वास्तवाचा शोध घेण्याचे प्रयत्न करणारे लिखाण 'ईपीडब्ल्यू'मध्ये सुरुवातीपासूनच प्रसिद्ध होत होते. पहिल्या काही वर्षांतच या साप्ताहिकातून भारतीय राजकारणावरील जातीसंस्थेचे वर्चस्व दाखवणारे अनेक लेख प्रसिद्ध झाले होते, त्या लेखांचे नंतर एक पुस्तकही प्रकाशित झाले आहे.

ऑगस्ट १९६६ मध्ये या साप्ताहिकाचे नामांतर होऊन 'इकॉनॉमिक ॲन्ड पोलिटिकल वीकली' हे नाव रूढ झाले. त्याच वर्षाच्या अखेरीस सचिन चौधरी यांचे निधन झाले. त्यांच्यानंतर प्रख्यात अर्थशास्त्रज्ञ आर.के.हजारी यांनी या नियतकालिकाची सर्व सूत्रे हाती घेतली. पण दोन वर्षांतच 'रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया'मधील नेमणुकीमुळे त्यांना ती सोडावी लागली. मग ते काम अनेक उपसंपादकांपैकी एक असलेल्या श्री.कृष्णराज यांच्याकडे सोपविण्यात आले. कृष्णराज केरळमधील ओट्टापालम या गावचे. 'दिल्ली स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स'मध्ये त्यांचे शिक्षण झाले आणि १९६० पासून सचिन चौधरींबरोबर काम करण्यास त्यांनी सुरुवात केली. संपादक म्हणून त्यांची कारकीर्द साप्ताहिकाच्या संस्थापकांच्या कारकिर्दीपेक्षा मोठी म्हणजे १९६९ पासून २००४ साली त्यांचा मृत्यू होईपर्यंत अशी ३५ वर्षे राहिली.

'ईपीडब्ल्यू'शी माझा प्रत्यक्ष परिचय माझा मित्र बर्नार्ड डिमेलो याने करून दिला. त्याआधी दिल्ली विद्यापीठातील एक विद्यार्थी म्हणून ते साप्ताहिक माझ्या नजरेखालून गेले होते; पण त्या काळात मी ते कधीच उघडले नाही. १९८० मध्ये मी समाजशास्त्रातील पीएच.डी. पदवीसाठी कलकत्त्याच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट (आयआयएम) या संस्थेत प्रवेश घेतला. त्याच वर्षी बर्नार्डनेही त्याच संस्थेत अर्थशास्त्रातील डॉक्टरेट मिळविण्यासाठी अभ्यास सुरू केला. त्याआधी काही वर्षे तो 'ईपीडब्ल्यू'चे वाचन करीत असे. त्या साप्ताहिकाची त्याची प्रत एकाकडून दुसऱ्याकडे अशी फिरत आलेली असे. त्या प्रतीचे पहिले वाचक मुंबईत राहणारे बर्नार्डचे वडील असत. नंतर ती बर्नार्डकडे पाठविली जाई आणि त्यानंतर ती प्रत त्याच्याकडून माझ्या हाती येत असे.

मला नंतर 'ईपीडब्ल्यू' वाचनाची एवढी चटक लागली, की मी उन्हाळ्याच्या सुट्टीत डेहराडूनला माझ्या घरी गेलो की ते अंक वाचायला न मिळाल्याने मला अस्वस्थता येई. काही दिवसांनी बरीच शोधाशोध केल्यानंतर एका वृत्तपत्रविक्रेत्याकडे ते साप्ताहिक मिळते असे मला कळले. गावाच्या खूप आत पलटन बझार रस्त्यावर आणि इमारतींच्या कंटाळवाण्या गर्दीत मला ते दुकान सापडले. माझ्या घरापासून गावाच्या थेट दुसऱ्या टोकाला ते ठिकाण होते. तिथे पोहोचण्यासाठी मैल-दीडमैल चालत जाऊन मला बसस्टँडवर जावे लागे. त्यानंतर बसची वाट पाहणे, बस आल्यानंतर तिच्यातून वीस मिनिटांचा प्रवास आणि शेवटच्या थांब्याशी उतरून बाजारच्या त्या गर्दीतून पुस्तक दुकानापर्यंतची अडखळत वाटचाल, असा तो सर्व प्रवास होता. पण मला या प्रवासाचा त्रास होत नव्हता. कारण नवनवीन कल्पना- विचार माझ्या डोळ्यांसमोर तरळत असायचे, त्याचबरोबर भारताचाही शोध चालू असायचा. आणि ईपीडब्ल्यूपेक्षा आणखी कोण मला भारताचे समृद्ध व सर्वांगीण दर्शन घडवू शकले असते? पलटन बझारच्या रस्त्यावरून जाताना ईपीडब्ल्यूचा नवीन अंक माझ्या हाती पडणार या कल्पनेने मला विशेष तरतरी येई, आणि तो अंक घेऊन परतताना त्यातील मजकुराच्या औत्सुक्याने मी भारावून जात असे.

सुट्टी संपल्यानंतर मी आयआयएममध्ये परतलो तेव्हा पहिली गोष्ट मी केली असेल ती म्हणजे स्वत: 'ईपीडब्ल्यू'चा वर्गणीदार झालो. त्यामुळे साप्ताहिकाची प्रत आधी माझ्याकडे आणि नंतर बर्नार्डकडे, असे चालू झाले. बर्नार्डला वडिलांकडून तो अंक मिळेपर्यंत माझा अंक येऊनही तीन-चार दिवस उलटून गेलेले असत. आणि त्यात त्याच्या संशोधनासाठी उपयुक्त ठरणारा एखादा निबंध अगर राजकीय चर्चाविषयक लेख हमखास असे. त्यामुळे टपालातील 'ईपीडब्ल्यू'चा अंक हाताळण्यासाठी आम्ही दोघेही अतिशय उत्सुक असू. आमच्यासारखेच असे बहुसंख्य वर्गणीदार व वाचक त्या वाचनासाठी हपापलेले असत.

मी आयआयएममध्ये प्रवेश घेतल्यानंतर जवळजवळ दोन वर्षांनी एक घटना घडली. मी कॉलेजच्या कॉरिडॉरमधून जात असताना प्रो.निर्मल चंद्रा यांच्या कक्षासमोरून चाललो होतो. प्रो.निर्मल चंद्रा हे अर्थशास्त्राचे प्राध्यापक पण अनेक युरोपियन भाषांवर- अगदी रशियन भाषेसह- त्यांचे प्रभुत्व होते. आणि लेनिनच्या साहित्याचा व त्याच्या कार्याचा त्यांचा सखोल अभ्यासही होता. त्या दिवशी त्यांच्या खोलीचा दरवाजा उघडा होता. त्यांच्या हातात पुस्तक होते आणि डाव्या हाताच्या बोटांत अर्धी पेटलेली सिगारेट धरून ते पुस्तक वाचत होते. मी कॉरिडॉरमधून जात असताना त्यांनी अचानक वर पाहिले आणि मला आत येण्याची खूण केली. चकित होऊन मी आत पाऊल टाकले (तोपर्यंत त्यांच्याशी मी क्वचितच चार शब्द बोललो असेन!). त्यांनी टेबलावरचा एक कागद शोधला आणि तो माझ्या हाती देत ते म्हणाले, 'हा घे. हा कदाचित तुझ्यासाठीच असावा.' मी कागद हातात घेऊन खोलीबाहेर पडलो. त्या कागदाचा रंग हिरवट होता. उलटसुलट करून पाहिल्यावर ते आंतर्देशीय पत्र आहे असे कळले, त्यावरचा टाईप केलेला मजकूर असा होता.

प्रिय निर्मल,

जिम बॉइस नुकताच येथे येऊन गेला. त्या भेटीत त्याने मला भारतातील वनप्रदेशांच्या इतिहासावर संशोधन करणाऱ्या एका तरुण अभ्यासकाशी झालेल्या परिचयाबद्दल सांगितले. नॅशनल

लायब्ररीमध्ये ते दोघे शेजार-शेजारच्या डेस्कवर काम करीत असत; त्याचे नाव जिम विसरला. पण तो तुमच्याच संस्थेचा विद्यार्थी असावा, असा त्याचा अंदाज आहे. तुम्ही त्याला शोधू शकाल का? 'ईपीडब्ल्यू'साठी काही उपयुक्त मजकूर त्याच्याकडे असल्यास पहावा.

अनेक धन्यवादांसह,

आपला

कृष्णराज



*मध्यभागी कृष्णराज : कार्यालयीन सहकाऱ्यांसोबत ( मुंबई, : १९८३)*

हे पत्र वाचून मी पुन्हा प्रो.चंद्रा यांच्या कार्यालयात गेलो. त्यांना मी थोड्याशा हताशपणेच विचारले, 'सर, मी या पत्राचे काय करू?' ते म्हणाले, 'तू स्वत:च उत्तर लिही आणि त्यात तुझ्या कामाबद्दल त्यांना सर्व माहिती दे.' त्यांनी सांगितल्याप्रमाणेच मी केले. त्याला उत्तर म्हणून कृष्णराज यांचे हिरवे पत्र मला मिळाले. त्यात त्यांनी म्हटले होते, की ते स्वत:च कलकत्त्याला पुढील महिन्यात येत आहेत आणि मला भेटण्यात त्यांना रस आहे.

कृष्णराज यांच्याबरोबरची माझी पहिली भेट अशी अनपेक्षित ठिकाणी झाली, ग्रेट ईस्टर्न हॉटेलमध्ये! ते पश्चिम बंगाल सरकारचे पाहुणे म्हणून आले होते. ते ज्या परिसंवादासाठी कलकत्त्यात आले होते तो पश्चिम बंगाल सरकारनेच आयोजित केल्यामुळे त्यांची राहण्याची सोय त्या अलिशान हॉटेलमध्ये करण्यात आली होती. पण मला जाणवले, त्या एकूण वातावरणाच्या विरोधी असणारे त्यांचे व्यक्तिमत्त्व. मला तीव्रपणे जाणवली ती त्या वातावरणातली त्यांची तटस्थता. त्यांची वागणूक, त्यांचे बोलणे, त्यांची भाषा हे सर्वच त्यांच्या सौम्य आणि संकोची स्वभावाचे द्योतक होते. त्यांना भेटून मी बुचकळ्यात पडलो. आपल्या साप्ताहिकातून तीक्ष्ण आणि झणझणीत अग्रलेख लिहिणारा हाच का तो माणूस, ज्याने आपल्या साप्ताहिकाचा लौकिक (त्यातील प्रकाशित लेखांमधून) थेट ओरखडे ओढणारे नियतकालिक असा मिळवला? कृष्णराज यांची माझ्यावर अशी पहिली छाप पडली, ती पुढेही तशीच कायम राहिली. नंतर मी कधीतरी कृष्णराज यांना मुंबईत त्यांच्या ऑफिसमध्ये भेटलो. या जागेचे एकूण रंग-रूप आणि तेथील साधेपणा कृष्णराज यांच्या ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वाला साजेसाच होता. या भेटीत ते थोडे अधिक बोलले, पण तसेच खालच्या स्वरात, सौम्यपणे. इतक्या सौम्य आणि शांतपणे की हा माणूस आपल्या बायको-मुलांवर कधीतरी चिडत असेल का; किंवा हाताखालील लोकांना रागावून बोलत असेल का असा प्रश्न मला पडत असे. या प्रश्नांचे उत्तर 'नाही, त्रिवार नाही' असेच मिळाले. तरीही त्यांच्या वागणुकीतील हा सौम्यपणा थोडा गैरसमज निर्माण करणारा आहे. त्यांच्या व्यक्तिगत स्वभावाचे ते प्रकटन असेलही; पण व्यावसायिक कर्तव्यांमध्ये ठामपणाच्या आड त्यांचा स्वभाव येऊ शकत नाही. अनेक प्रकारचे लेखक आणि आश्रयदाते यांच्यातील विविधता सांभाळून अशा प्रकारचे वैशिष्ट्यपूर्ण साप्ताहिक चालवणे आणि आठवड्यामागून आठवडे त्याचे अंक नियमितपणे प्रकाशित करणे यासाठी लागणारी अधिकृतता एका विशेष प्रकारच्या अधिकारभावनेतूनच निर्माण होत असावी.

हिरवट दिसणारी ती आंतरदेशीय पत्रे कृष्णराज यांच्या पत्रव्यवहाराचे महत्त्वाचे साधन होती. त्यावर 'हितकरी हाऊस, २८४ फ्रीअर रोड, मुंबई ४०००३८ हा त्या नियतकालिकाचा पत्ता होता. त्यानंतरच्या काळात रस्त्याचे नाव बदलून 'शहीद भगतसिंग मार्ग' झाले आणि पिनकोड नंबर ४००००१, एवढाच बदल त्या हिरव्या पत्राच्या बाहेरील बाजूला झाला. आतल्या बाजूला संपादक मात्र तोच, तसाच! त्यांच्या ऑफिसमध्ये त्यांना भेटणे ही एक प्रकारची धर्मनिरपेक्ष तीर्थयात्रा होती. व्ही.टी.स्टेशनची इमारत आणि रिझर्व्ह बँकेचे मुख्य कार्यालय यांच्यामध्ये हे हितकरी हाऊस होते. मुंबईचा हा सर्व भाग अनेक प्रकारचे ऐतिहासिक संदर्भ आणि त्यांच्या स्मृती- इतकेच नव्हे तर मानवतेच्या कहाण्यांनी भरलेला

आहे. व्ही.टी.स्टेशन आणि रिझर्व्ह बँक या दोन भव्य इमारती, यांच्यामध्ये भरगच्च दुकानांनी भरलेला आणि त्यावरून गाड्या, सायकली आणि पादचारी यांनी गजबजून गेलेला असा तो रस्ता दिसत असे.

त्या इमारतीत शिरण्यापूर्वी रस्त्यावरून आत वळले म्हणजे हायसे वाटे. या इमारतीच्या सहाव्या मजल्यावर ईपीडब्ल्यूचे ऑफिस होते. लिफ्टचे दार उघडून बाहेर आले की समोर ओळीने छोट्या क्यूबिकल्सची रांग एका अरुंद पॅसेजच्या बाजूने लागलेली असे. या रांगेच्या टोकाला तसेच एक संपादकाचे क्यूबिकल, सहा फूट बाय चार फूट याच आकाराचे. त्यात एक लहान डेस्क आणि दोन-तीन खुर्च्या. तिथे एअर कंडिशनरचा काही संभव नव्हता. खोलीची एक उघडी खिडकी हीच चैन, जिच्यामधून एखाद्या चांगल्या दिवशी येणारी वाऱ्याची झुळूक वातावरण सुखकारक बनवून जाई.

हा साधेपणा इतर न दिसणाऱ्या अनेक गोष्टींमध्ये दिसून येई. कृष्णराज यांचा हा आग्रह होता, की त्यांच्या नियतकालिकात नोकरीला असलेल्या कनिष्ठ कर्मचाऱ्याला मिळणाऱ्या पगाराच्या पाचपटीपेक्षा अधिक पगार ते घेणार नाहीत. २००२ मध्ये तीस वर्षे संपादकपदाची जबाबदारी निभावल्यानंतर त्यांचा मासिक पगार १२००० रुपये होता. त्यावर्षी 'ईपीडब्ल्यू'च्या विश्वस्तांनी त्यांचे मानधन दुप्पट म्हणजे २४००० रुपये केले; विद्यापीठाच्या प्राध्यापकाला मिळणाऱ्या पगाराएवढे. तरीही ते त्या काळात अपुरेच होते. त्या कामाचा आवाका आणि महत्त्व लक्षात घेता, एखाद्या विद्वानाने किंवा अभ्यासकाने आपल्या संशोधनासाठी घेतलेल्या श्रमांच्या किमान दुप्पट मेहनत कृष्णराज यांनी घेतलेली असे.

कृष्णराज यांच्याकडे लिहिणाऱ्या अनेक लेखकांप्रमाणेच पत्रव्यवहारातून मला कृष्णराज चांगलेच समजले. वर्गणीदार म्हणून त्या साप्ताहिकाचा अंक दर आठवड्याला हाती पडणे ही तर एक चेतना देणारी घटना होतीच, पण त्याचबरोबर आपल्या पत्रपेटीत ते हिरवे पत्र- संपादकाने पाठवलेले- येऊन पडणे ही थरारून टाकणारी गोष्ट होती. त्यांच्या पिढीतील इतर लोकांना न जमलेली एक गोष्ट म्हणजे, इलेक्ट्रॉनिक संपर्क साधनांशी त्यांनी पटकन आणि कार्यक्षमतेने केलेली दोस्ती. ही त्यांची उपलब्धी त्यांच्या परदेशी लेखकांना दिलासा देणारी ठरली; पण या देशातील वाचक-लेखकांच्या वतीने बोलायचे झाले तर वेगळ्या रंगात उठून दिसणारी ही आंतरदेशीय पत्रे आणि त्याहीपेक्षा अद्भुततेचा आनंद देणारा आतील मजकूर यांची उणीव मला भासू लागली होती. त्यांच्या सहीचा पत्रव्यवहार त्यांच्या बिनसहीच्या संपादकीयाइतकाच मोजक्याच शब्दांत पण आशयपूर्ण असे, जी गोष्ट इंग्रजीमधून लिखाण करणाऱ्या बहुसंख्य भारतीयांमध्ये अभावानेच आढळते.

कृष्णराज यांच्याशी परिचय झाल्यानंतरच्या वीस वर्षांत आम्ही फार तर आठ-नऊ वेळाच भेटलो असू. पहिल्या वेळी माझ्या आठवणीप्रमाणे कलकत्त्यात आणि शेवटी बंगलोरला त्यांच्या निधनाच्या आधी काही महिने. (तिथे राहणाऱ्या त्यांच्या मुलीला भेटण्यासाठी ते आलेले होते). इतर वेळी आम्ही मुंबईलाच त्यांच्या ऑफिसमध्ये भेटलो होतो. लांबट चेहऱ्याचे, शुभ्र केस असलेले कृष्णराज उमदे व्यक्तिमत्त्व होते. त्यांच्या चष्म्यामागील शोधक दृष्टीने ते समोरच्याचा वेध घेत. त्यांच्यासमोरील डेस्कवर दोन-तीन फूट उंचीचा कागदांचा ढीग असे. स्वीकारायच्या किंवा नाकारायच्या लेखांचा ढीग. शेजारच्या शेल्फवर पुस्तकांची रांग असे. त्यातील एक-दोन पुस्तके भेटायला येणाऱ्या एखाद्या व्यक्तीकडे परीक्षण लिहिण्यासाठी दिली जात.

हितकरी हाऊसच्या लिफ्टमध्ये मी पहिल्यावेळी शिरलो तेव्हा आणि शेवटच्या भेटीतही माझा मलाच अचंबा वाटायचा तो हा, की याच 'ईपीडब्ल्यू'चा एक अंक विकत घेण्यासाठी आटापिटा करीत मला पलटण बझारला जावे लागे; तेव्हा याच साप्ताहिकाच्या कचेरीत जाऊन आपण त्या संपादकांना भेटू आणि जवळजवळ बरोबरीच्या नात्याने विचारांची देवाणघेवाण करू असे आपल्याला त्यावेळी वाटले तरी होते काय? किंचित कल्पना तरी होती काय?

माझे वय वाढत गेले तेव्हा मला अभिमान वाटावा असा सन्मान ईपीडब्ल्यूने मला दिला. 'कॉंट्रिब्यूटर' या पदापासून 'कॉंट्रिब्यूटर अँड टॅलेन्ट स्पॉटर' अशी बढती मला मिळाली. ज्या नियतकालिकात माझा प्रवेश जेम्स के. (जिम) बॉयस हे अर्थशास्त्रज्ञ आणि प्रो.निर्मल चंद्रा यांच्या शिफारसीमुळे झाला त्याच मला आता 'ईपीडब्ल्यू'साठी आजूबाजूच्या समाजातील बुद्धिमान तरुण मुले-मुली शोधून त्यांची नावे सुचविण्याची कामगिरी करायची होती. माझ्यासारखे अनेकजण त्यांच्या 'ईपीडब्ल्यू'मधील कामाचा पाठपुरावा करीत करीत वरच्या रांगेत जाऊन बसले होते; आणि हळुवार शाबासकीने माझ्याप्रमाणे त्यांना प्रोत्साहनही मिळत होते. पण कृष्णराज यांनी यासाठी केवळ स्तुती हे एकच साधन वापरले नाही, त्यांनी खास व्यावसायिक दृष्टीने या नवोदितांना उभे केले. त्यामुळेच त्यांना 'ईपीडब्ल्यू'चा दर्जा इतकी वर्षे कायम ठेवता आला. त्यासाठी त्यांच्याजवळ असलेला असाधारण गुण (जो त्यांनी त्यांच्या पूर्वसुरींकडून) सचिन चौधरी यांच्याकडून उचलला होता. तो असा की त्या साप्ताहिकासाठी सामाजिक शास्त्रांत प्रावीण्य मिळवलेली उगवत्या पिढीतील बुद्धिमान युवक मंडळी हेरून त्यांना साप्ताहिकात आणायचे.

मी कृष्णराज यांना 'जंटल कलोसस' (सौजन्यमूर्ती) असे म्हटले आहे. या उपाधीत आंतर्विरोध आहेच. हिरेन मुखर्जी या कम्युनिस्ट संसदपटूने जवाहरलाल नेहरूंवर लिहिलेल्या पुस्तकाला हे शीर्षक दिलेले आहे आणि मी ते जाणीवपूर्वक उचललेले आहे. नेहरूंचे राजकारण मुखर्जींना मान्य नसे. काही वेळा तर नेहरूंच्या राजकीय भूमिकांवर ते कडक टीकाही करीत. पण नेहरूंच्या व्यक्तिमत्त्वातील सभ्यपणा, सहृदयता आणि कळकळ, त्याचबरोबर स्वतंत्र भारतात लोकशाही परंपरा रुजविण्यासाठी त्यांनी घेतलेले परिश्रम यांबद्दल

मुखर्जींनी नेहरूंना धन्यवाद दिले आहेत. त्याचप्रमाणे 'ईपीडब्ल्यू'च्या मित्रमंडळीत, साप्ताहिकाला मार्क्सवाद्यांमध्ये चाललेल्या वाद-विवाद आणि चर्चांत जो विशेष रस वाटतो, त्यामुळे माझ्याप्रमाणेच वैतागणारे इतरही आहेत. तरीही 'ईपीडब्ल्यू'च्या संपादकांच्या व्यक्तिमत्त्वातील गोडवा, त्यांच्या वर्तणुकीतील सभ्यता आणि विशेष म्हणजे प्रतिकूल परिस्थितीतही जवळजवळ एकहाती साप्ताहिक चालवून भारतातील बुद्धिवादी संस्कृतीची जोपासना करण्याचा ध्यास हा सर्वांच्याच प्रेमाचा विषय होता.

सचिन चौधरी आणि कृष्णराज या दोघांनीही भारतीय समाजात विचारप्रसार करून बुद्धिनिष्ठ नागरिक निर्माण करण्याचा उद्देश ठेवला होता. आपल्या सहयोगी मित्रांच्या कार्याची खबर घेण्यासाठी आणि विरोधकांचे इरादे समजावून घेण्याचे साधन हे नियतकालिक होते. या साप्ताहिकाच्या संदर्भात एक वस्तुस्थिती अशी आहे, की त्याचे संपादक बंगाल आणि केरळ या राज्यांतून आलेले आहेत. हा अपघात नसून त्याचे सुदैव आहे. कारण ही दोनही राज्ये बौद्धिकदृष्ट्या फार क्रियाशील आहेत आणि विवादपटु (जराशी भांडखोर)सुद्धा. दोनही राज्यांत कम्युनिस्टांनी दीर्घकाळ सत्ता राबविलेली आहे, सार्वत्रिक मतदानातून ती सत्ता त्यांना मिळाली आहे. त्यामुळे अति डाव्या मंडळींचा त्यांना कडवा विरोध आहे, कारण क्रांतीचा मार्ग सशस्त्र लढ्यातूनच उजळतो अशी त्यांची श्रद्धा आहे. दुसऱ्या बाजूने कम्युनिस्टांनी स्वातंत्र्य, मालमत्ता व परंपरा यांच्याविरोधी घेतलेल्या भूमिकांमुळे उदारमतवादी आणि सनातनीही, सचिंत होऊन त्यांना विरोध करीत असतात. केरळ आणि पश्चिम बंगाल यांच्यामध्ये होणाऱ्या राजकीय चर्चांचे अगर संघर्षांचे पडसाद देशभर उमटतात. त्याचे वाहक म्हणून 'ईपीडब्ल्यू'ची भूमिका महत्त्वाची राहिली आहे. जर त्याचे संपादक देशातील अन्य कोणत्याही राज्यातील असते तर कदाचित हे साप्ताहिक अधिक सौम्य झाले असते, पण मग ते तितके वाचनीयही झाले नसते.

'इकॉनॉमिक वीकली'चे प्रकाशन सुरू झाले त्यावेळी जवाहरलाल नेहरू देशाचे पंतप्रधान होते. नेहरूंचा आर्थिक दृष्टिकोन समाजवादी होता, पण राजकीयदृष्ट्या ते उदारमतवादी होते. बहुतेक वेळा त्यांची लोकशाहीप्रती असलेली बांधिलकी त्यांच्या समाजवादी विचारसरणीला डोईजड होताना दिसे. तरुण भारतीय बुद्धिवाद्यांना हे आवडत नसे. त्यामुळे आपले विचार व्यक्त करण्याचे त्यांचे साधन 'इकॉनॉमिक वीकली' हे होऊन बसले. उद्योगधंद्यांवरील खाजगी मक्तेदारीबद्दल ते टीका करीत. जमीन सुधारणा कायद्याची मंद गती ही नेहरूंच्या काँग्रेस पक्षाचे जे वर्गीय स्वरूप आहे त्यामुळे आहे, असे त्यांना वाटे; कारण त्यांच्यामते श्रीमंत शेतकऱ्यांचे हितसंबंध काँग्रेस सांभाळत होती आणि सधन मंडळींकडून पक्षासाठी पैसा गोळा करीत होती.

मी आधीच म्हटल्याप्रमाणे 'ईपीडब्ल्यू' हे कोणत्याही पक्षाशी जोडलेले नव्हते. पण मुळातच त्याचा राजकीय आविष्कार प्रखर होता. सचिन चौधरींच्या संपादकीय कारकिर्दीत या साप्ताहिकात लिहिणारे लेखक स्वच्छपणे दोन गटांत विभागलेले होते. उदारमतवादी आणि डावे असे त्यांचे दोन गट होते. 'आम्ही नेहरूंचे प्रशंसक आहोत, पण त्यांचे अनुयायी आहोत असे मात्र नाही' ही भूमिका स्वत: चौधरी यांची होती. १९६६ साली सुरू झालेल्या 'इकॉनॉमिक ॲण्ड पोलिटिकल वीकली'च्या ऑगस्ट महिन्याच्या पहिल्याच अंकात त्यांनी नेहरूंविषयी लिहिले. त्याआधीच नेहरूंचे निधन झाले होते, पण त्यांचा करिष्मा शिल्लक होता. चौधरींनी या अंकात लिहिले, 'दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात अनेक अविकसित देशांच्या जीवनात एखाद्या पुढाऱ्याच्या नेतृत्वामुळे आणि करिष्म्यामुळे त्याचप्रमाणे थोड्याफार सकारात्मक परिस्थितीमुळे अभिमान वाटावा असा कालखंड आला असणे स्वाभाविक आहे; पण त्या मार्गावरची वाटचाल किती देशांना पुढे चालू ठेवता आली, आणि किती त्या मार्गावरून बाजूला गेले? परिस्थिती अशा प्रकारच्या 'नेहरू'ना घडवून समाजासमोर आणते. पण विचारी आणि महत्त्वाकांक्षी स्त्री-पुरुषच, समाजाला आकार देऊन लोकांचे 'राष्ट्र' बनवतात आणि त्यांची वाटचाल चालू ठेवतात....'

काही वर्षांतच नेहरूंच्या उदारमतवादाला त्यांच्या कन्येनेच गंभीर आव्हान दिले. भारताच्या प्रधानमंत्री झाल्यावर इंदिरा गांधींनी पक्षामधील आणि पक्षाबाहेरील मतभेदांना उत्तेजन दिले. अर्थव्यवस्थेतील राजकीय हस्तक्षेप वाढवला. न्यायमूर्ती आणि प्रशासनातील अधिकारी यांच्या नेमणुकीत पक्षपात केला. या सर्व एककेंद्री कारभाराचा कळस १९७५ ते १९७७ या काळातील आणीबाणीत झाला.

श्रीमती गांधींचे टीकाकार जुन्या जमान्यातील उदार लोकशाहीवादी आणि उजवे हिंदू परंपरावादी असे दोनही प्रकारचे होते. कृष्णराज यांच्या संपादकीय कारकिर्दीत त्यात मार्क्सवादी या तिसऱ्या गटाची भर पडली. स्वत: कृष्णराज चीनच्या प्रभावाखाली असलेल्या तरुण नक्षलवाद्यांच्या ध्येयवादामुळे फार प्रोत्साहित झाले होते. येथील प्रस्थापित कम्युनिस्ट पक्षांनी जो संसदीय मार्ग निवडला होता, त्याला ही नवोदित कम्युनिस्ट तरुणाई सतत आव्हान देत होती. या साप्ताहिकाने डाव्यांच्या राजकारणाकडे जो झुकाव दाखवला त्याचा एक फायदा असा झाला की, राज्याराज्यांमध्ये मानवी हक्क व अधिकार यांवर राज्यकर्त्यांकडून जे आक्रमण होत होते त्याचे तपशीलवार वृत्तांत 'ईपीडब्ल्यू'मध्ये प्रसिद्ध होऊ लागले होते; पण त्याचबरोबर तोट्याची बाजू ही की मार्क्स, लेनिन किंवा माओ यांच्या एखाद्या विधानाचा सैद्धांतिक अर्थ लावण्यासाठी झालेल्या काथ्याकुटापायी साप्ताहिकाची पानेच्या पाने खर्ची पडत.

१९८० च्या दशकात मी 'ईपीडब्ल्यू' प्रथम वाचायला सुरुवात केली तेव्हा नव्या आणि जुन्या दोनही डाव्यांना साप्ताहिकाने

सारखीच जागा दिलेली होती. नंतर लवकरच त्यांना पर्यावरण आणि स्त्रीवादी चळवळींच्या स्वरूपात पुढे येणाऱ्या नव्या लोकांची विशेष दखल घेणे भाग पडले. यामुळे साप्ताहिकाचे पूर्वीचे निष्ठावान आश्रयदाते नाराज झाले व काहीजण साप्ताहिकापासून दूरही झाले. १९९१ मध्ये धर्माकुमार या इतिहाससंशोधिकेने– जी सचिन चौधरींची स्नेही होती– 'ईपीडब्ल्यू'मधील मार्क्सवादी मक्तेदारीचा शेवट करून पुन्हा वस्तुनिष्ठ वैश्विक भूमिका संपादकांनी घ्यावी असे पत्र लिहिले आणि ते 'ईपीडब्ल्यू'मध्ये प्रसिद्ध झाल्यानंतर त्यावर संतापयुक्त प्रतिक्रियांचा खच पडला. त्यात विशेष म्हणजे अटलांटिक पलीकडून चिथावणी मिळालेल्या जवळजवळ दोन डझन पाश्चिमात्य अभ्यासकांनी एक लांबलचक पत्र लिहून असे सूचित केले होते की, 'प्रा.धर्माकुमार यांचा विरोध हा आयएमएफ व वर्ल्ड बँक यांच्या भारताला अस्थिर करणाऱ्या कटाचाच एक भाग असावा!' पण धर्माकुमार यांना पाठिंबा देणारीही काही पत्रे साप्ताहिकात प्रसिद्ध झाली, त्यांमध्ये भारतातील डाव्यांनी पूर्व युरोपात वाहणाऱ्या उदारमतवादी वाऱ्यांची दखल घ्यावी असे म्हटले होते.

नेहमीप्रमाणे 'ईपीडब्ल्यू'कडे येणारी पत्रे आणि इतर लेख यांची जागा सैद्धांतिक चर्चा, काथ्याकूट यांच्यासाठी देण्याचा पवित्रा साप्ताहिकाने घेतला. ही चर्चा अनेक महिने चालली. पण त्याचा शेवट स्वागतार्ह झाला. कारण कृष्णराज यांनाच ही जाणीव झाली की बदल फक्त रशियातच होतो आहे असे नाही; तर तो चीन व भारतामध्येही होतो आहे. विसाव्या शतकाने हे दाखवून दिले आहे की, सत्तेच्या तुलनेत आर्थिक परिवर्तनाचा वेग वाढविण्यात बाजारपेठेची कार्यक्षमता अधिक आहे. 'ईपीडब्ल्यू'मध्ये नंतर उदार दृष्टिकोन बाळगणाऱ्या अर्थतज्ज्ञांचाही आवाज उठू लागला. त्याच काळात या साप्ताहिकाची पोच तरुण इतिहास–अभ्यासक आणि समाजशास्त्रज्ञ यांच्यापर्यंत गेली होती. या तरुणांच्या खांद्यावर त्यांच्या शिक्षकांप्रमाणे पक्षाच्या तत्त्वज्ञानाचे ओझे नव्हते. पण 'ईपीडब्ल्यू'सुद्धा मजकुराचा रोख दुसऱ्या टोकाला जाणार नाही याबद्दल सावध होते, म्हणूनच त्यात जागतिकीकरणाच्या समर्थकांना त्यांची बाजू मांडण्यास जागा दिली तर त्यांच्या भूमिकेच्या विरोधकांनाही उत्तर देण्याची संधी लगेच मिळे.

'ईपीडब्ल्यू' हे भारतातील बौद्धिक चर्चेचे एक व्यापक व्यासपीठ आहे. याची पाने आपल्या लेखनाने सजविणाऱ्यांत मुक्त बाजारव्यवस्थेचे समर्थन करणाऱ्यांपासून ते नक्षलवाद्यांची वकिली करणाऱ्यांपर्यंत सर्वांचा समावेश आहे. तथापि, या नियतकालिकाने एक प्रकारचा दृष्टिकोन मात्र चर्चेत न आणण्याचा सतत प्रयत्न केला, तो म्हणजे धार्मिक दहशतवाद. या दृष्टीने पाहिले तर या देशाच्या राजकीय विचारांचे पूर्ण प्रतिबिंब या साप्ताहिकात पडले आहे असे म्हणता येत नाही; कारण आजच्या भारतात हिंदुत्वाचा प्रभाव फार मोठा आहे, पण धार्मिक उग्रवादी 'ईपीडब्ल्यू'मधून आपले विचार मांडण्यास उत्सुक नसतात. या बाबतीत जगातील त्यांच्याच धार्मिक भूमिकेशी साम्य असलेल्यांची सर्वत्र हीच कथा आहे. तसेही हिंदू मूलतत्त्ववादी आपल्या विचार प्रसारासाठी 'ईपीडब्ल्यू'सारख्या नियतकालिकाचा अस्सल इंग्रजी भाषेतील मजकुरासाठी वापर करण्याऐवजी तोंडी पसरवलेल्या गप्पा आणि अफवा यांचा प्रभावी उपयोग करतात.

कृष्णराज यांचे निधन झाल्यावर 'ईपीडब्ल्यू'च्या विश्वस्तांनी त्यांच्या जागी अर्थशास्त्रज्ञ राममनोहर रेड्डी यांची नियुक्ती केली. आणीबाणीमध्ये अटक झालेल्या सोशलिस्ट रेड्डींचे हे सुपुत्र. रेड्डींचे शिक्षण चेन्नईमध्ये, कोलकाता व थिरुअनंतपुरम्‌मध्ये झाले. त्यांच्या संचालकत्वाखाली 'ईपीडब्ल्यू'ने आपला दर्जा आणि सच्चेपणा टिकवून धरला आहे. नवीन संपादकांनी काही महत्त्वाचे बदल या साप्ताहिकात सुरू केले आहेत. त्यांपैकी दोन गोष्टी संपादकांच्या पूर्वसुरींचा सन्मान करणाऱ्या आहेत. त्यांतील एक म्हणजे चालू अंकामधल्या मजकुराशी संबंधित किंवा संदर्भ असलेले जुन्या अंकांतील उतारे, स्तंभ किंवा लेख वा संपादकीय यांचे पुनर्मुद्रण. दुसरी गोष्ट म्हणजे साप्ताहिकाच्या पहिल्या पानावर त्याच्या नावाखाली ठळक अक्षरांत दर आठवड्याला प्रसिद्ध केला जाणारा मजकूर... ''१९६६ साली प्रसिद्ध झालेल्या पहिल्या अंकापासून 'ईपीडब्ल्यू' हे भारतातील चालू घटनांचे परीक्षण करणारे आणि सामाजिक शास्त्राचे संशोधन करणारे एक महत्त्वाचे नियतकालिक आहे. १९४९ ते १९६५ या काळात सचिन चौधरी यांनी स्थापन करून चालविलेल्या 'इकॉनॉमिक वीकली' या पत्राचे ते आणखी प्रगत व सुधारित रूप आहे. त्यानंतर १९६९ पासून २००४ पर्यंत हे पत्र कृष्णराज यांनी कसोशीने चालवून या पत्राला आजची प्रतिष्ठा मिळवून दिली आहे.''

माझ्यासाठी कृष्णराज हे मित्र आणि अतिशय भरवशाचे सल्लागार अशा दोनही भूमिकांत राहिले. आमच्या वीस–बावीस वर्षांच्या सहवासांत दोन वेळा एकमेकांपासून दूर होण्याचे प्रसंग आले. १९९१ मध्ये व १९९९ मध्ये असा दोन वेळा 'ईपीडब्ल्यू'शी मला संघर्ष करावा लागला. मला स्वत:ला अत्यंत तात्त्विक वाटणाऱ्या पण इतरांना केवळ सैद्धांतिक म्हणून जुजबी वाटणाऱ्या काही गोष्टींवरूनच आमच्यात बेबनाव निर्माण झाला. त्या घटनांच्या खूप नंतर कृष्णराज यांनी मला कळवले होते. 'तुम्ही ज्या लढायांचा किंवा संघर्षांचा उल्लेख केला त्या 'ईपीडब्ल्यू'साठी फार हिताच्या ठरल्या.' पण प्रत्येक वेळी समेटाचा हात मीच पुढे केला ही गोष्ट मला इथे नोंदवावीशी वाटते; कारण 'ईपीडब्ल्यू'चे माझ्याशिवाय निभावेल, पण मी मात्र त्याशिवाय राहू शकत नाही.
(मराठी अनुवाद : कुमुद करकरे)

**Ramachandra Guha**
ramguha@gmail.com
22-A, Bruntan Road, Bangalore 560025.